# परशियन नैट्स

अथवा

# किश्वरासिता.



मनोरंजक कल्पित कादंबरी



## भाग पहिला.



लेखक,

रावजी मनोहर ताकभाते.



मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर,

जगद्धितेच्छु प्रेस, ४३२ शनवार पेठ, पुणें शहर.



सन १९१७.



किंमत पावणे दोन रुपये.

आपले लोकप्रिय

श्रीमंत राजश्री रामचंद्रराव

ऊर्फ

आप्पासाहेब जमखिंडीकर यांस,

त्यांचे ठायीं

स्त्रीशिक्षणाविषयीं उत्सुकता व विद्येची अभिरुचि आणि
परोपकारादि स्तुत्य कृत्यांस उदारता इत्यादि
अनेक सद्गुणांचें वास्तव्य जाणून
व त्यांचे परवानगीवरून,

कर्त्यानें,

हें लहानसें पुस्तक कृतज्ञतापूर्वक परमादरानें

नजर केलें असे.

रा० म० ता०

या पुस्तकास रा० रा० **रामचंद्र मोरेश्वर राजे** व **गोविंद गणेश राहतेकर** आणि **विष्णु भगवंत मांडे** यांनीं स्तुत्य मदत केल्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

रा० म० ता०

# प्रस्तावना.

——:०:——

कोणतेंही पुस्तक वाचण्यापूर्वी त्याची प्रस्तावना वाचावी हें फार सयुक्तिक आहे, यांत संशय नाहीं. कारण, तसें केल्यानें पुढें पुस्तकांत कोणता विषय आहे, व तें कशाविषयीं आहे वगैरे सारांश, पुस्तक वाचण्यापूर्वींच वाचकांच्या लक्षांत येतो. आणि मग तें वाचण्यास योग्य किंवा अयोग्य ह्याचा मनास निश्चय करितां येतो.

प्रस्तुत जें हें तुम्ही पुस्तक वाचणार आहां, याचें नांव "पर्शियन नाईटस्" असें ठेविलें आहे. कारण, यांतील गोष्टी, पराशियादेशांत "किश्वरसिता म्हणून जें शहाजाद्याचें नांव तुम्हीं आरंभीं वाचलें आहे, त्यानें, "मेहरवश" नांवाच्या दुराग्रही राजकन्येस सहा महिनेपर्यंत त्या रात्रीं सांगितल्या आहेत" अशी एक मनांत कल्पित भावना करून वरील नांव पुस्तकास ठेविलें आहे.

या ग्रंथाचे एकंदर सहा भाग तयार केले असून त्यांत एकवीस गोष्टींचा समावेश केला आहे, आणि त्यांपैकीं दोन तीन गोष्टी या प्रथम भागांत घातल्या आहेत.

स्वभावतः पुरुषजात इमानी किंवा स्त्रीजात इमानी ह्या विषयवार यांतील गोष्टींचा कटाक्ष ठेविला आहे. तसेंच, हास्य, वीर, करुणा इत्यादि रस साधवतील तितके साधून मुख्यत्वें शृंगार-प्राधान्य ठेविलें आहे. आतां आपापल्या जातीचा स्वभावतः अभिमान सर्वांसच असतो, तेव्हां बहुतकरून हें पुस्तक उभयपक्षीं अभिमान कारण होऊन, सर्वत्रांस वाचण्याच्या उपयोगीं पडेल अशी माझी आशा आहे.

═══════

जुनी एक म्हण आहे कीं, " अकलेचें मूळ विद्या " आणि ही म्हण जर खरी आहे, तर वर लिहिलेलें सर्व प्रकारचें ज्ञान होण्यास प्रथम तिच्याच द्वारें यत्न करावा हें उघड आहे. आणि हल्लींच्या शककर्त्या प्रभूनेंही हाच विचार दृढ धरून विद्या उदयास आणली आहे, असें मला वाटतें. हें माझें म्हणणें केवळ बिनआधार आहे असें नाहीं पहा, या दयाळू सरकारचें राज्य झाल्यास सुमारें पन्नासांवर वर्षें होत आलीं, इतक्या कालांत ह्या हिंदुस्तानांतील बरेच लोक विद्येचें सुख भोगूं लागले आहेत. किंबहुना एक अष्टमांश प्रजा विद्यासुखाच्या अधिकारास योग्य झाली असेल ह्यांत संशय नाहीं.

विद्येपासून कोणकोणते लाभ व सुखाचे मार्ग किती दृष्टिगोचर होतात हें सर्व स्पष्ट करीन म्हटल्यास दुसरें एक पुस्तकच पृथक् केलें पाहिजे. हल्लीं आमचे बरेच देशबांधव विद्यानुभवाचा लाभ भोगीत आहेत, तेव्हां त्याविषयीं जास्त पृथक् लिहिण्याचें कारण दिसत नाहीं.

आतां, सर्व व्यवहाराचें ज्ञान होण्यास विद्या हेंच जर मूळ साधन आहे, तर ईश्वरी ज्ञान होण्यास, व त्याचे आपणावर असलेल्या उपकाराबद्दल त्याचे आपणास आभार दर्शविण्यास विद्या हें साधन साहाय्य होणार नाहीं काय ? खचितच होईल.

असें असून आपल्या हिंदुस्थानांत अद्यापि व्हावा तसा विद्यासाधनाचा विस्तार व प्रीति पूर्णपणें झाली नाहीं. कोठें कोठें पुरुषांना विद्येची रुचि थोडीबहुत लागली आहे, पण स्त्रियांकडे मुळींच अंधार ! कोठें नवीन तरुणांस उमेद येते, तों घरांतील वृद्ध मनुष्यांस तिचा तिटकारा ! आणि या कारणामुळेंच अद्यापि हिंदुस्थान अर्धपक्क राहिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांत बहुतकरून पुरुषांस कसानकसा तरी विद्येचा टिळा उगीच निमित्ताला तरी लागतो; पण आमचे जुने वळणाचे लोक वडिलोपार्जित चाल दृढ धरून बसलेले आहेत. व ते स्त्रियांना मुळींच विद्येचा वारा देखील लागूं देत नाहींत. मग त्याविषयीं त्यांना काय दुःख वाटतें कोण जाणे ! त्यांना विचारलें असतां ते सहस्रावधि त्याचीं कारणें सांगतात; पण त्यांतील एकही कारण श्लाघ्य नसतें. असो. हा प्रकार लिहितांना जरी दुःख वाटतें, तरी तें पूर्णपणें वाटूं नये म्हणून आमच्या कित्येक देशबांधव जनांनीं सुज्ञपणानें यत्न करून आजपर्यंत हें

दुःख कमी करण्याच्या कामांत बरेंच श्रेय घेतलें आहे, आणि आमच्या दयाळू इंग्रज सरकारांनींही बरेंच या कामीं लक्ष्य पोहोंचविलें आहे. परंतु स्त्रियांकडे विद्येचा ओघ अजून सपाट्यानें वाहाता झाला नाहीं, व तो व्हावा ह्मणून अद्यापिही बरेच परोपकारी विद्वान् या कामीं श्रम घेत आहेत. कित्येकांनीं तर हट्टी मनाच्या व उनाड मुलांना विद्येची रुचि लागावी ह्मणून, व विशेषेंकरून स्त्रियांना ज्ञान व्हावें ह्मणून मनोरंजक गोष्टी, कल्पित कांदबऱ्या, रसिक नाटकें वगैरे बरींच गद्यपद्य पुस्तकें तयार केलीं आहेत. तेणेंकरून बहुतेक कुलीन स्त्रिया व मुलें विद्येची रुचि समजण्यास तिच्या प्रथम पायरीस लागलीं आहेत. ही मोठी स्तुत्य गोष्ट कर्त्यांनीं केली यांत संशय नाहीं. कारण, " कडू औषध घेण्यास लहान मुलें हट्ट करतात, म्हणून मातोश्री कडू औषधाच्या तोंडीं प्रथम साखरेचें किंवा मधाचें बोट लावीत असते, तेणेंकरून मुलांस तें औषध प्रथमतः जिभेस गोड लागून पुढेंही असेंच गोड असेल म्हणून तीं सर्व औषध पिऊन जातात. आणि त्या योगें रोगमुक्त होतात. "

वरील उदाहरण आळशी मनाच्या तरुण मुलांस बरोबर साजलें जातें, हें लक्षांत आणूनच चतुर विद्वानांनीं नाना प्रकारचीं शृंगारिक पुस्तकें तयार केलीं, आणि स्त्रियांचीं मनें गोष्टीकडे फार वेधत असतात; म्हणून तशींही पुस्तकें बरींच तयार केलीं आहेत. पुस्तककर्त्यांचा हेतु हाच कीं, तरुण मुलांनीं शृंगाराच्या नादानें व स्त्रियांनीं गोष्टींच्या नादानें तरी वाचण्याचा नाद धरावा, आणि थोडी थोडी विद्येची रुचि समजून त्यांनीं पूर्ण अधिकारास पोहोंचावें. मग दैववशात् त्यांना विद्येचें जर पूर्ण ज्ञान झालें तर ते प्रापंचिक व पुढें पारमार्थिक सुखाच्या कळसास कां न पोहोंचतील ?

स्त्रियांना व पुरुषांना विद्येची गोडी लागावी याबद्दल अलीकडे परोपकारबुद्धीच्या विद्वान् लोकांचे प्रयत्न चालले आहेत, हें पाहून माझेही मनांत या कार्यास यथाशक्ति हात लावावा असें आलें, आणि हा हेतु फार दिवस मनांत घोळतच होता; परंतु या कामास किती नडी ? एक तर स्वतः मोठें विद्वान् असावें लागतें, दुसरें प्रपंचांतील सहस्त्रावधि व्यवसायांतून मस्तक स्थिर केलें पाहिजे, व तें होण्यास मूळचे तरी आह्मी गर्भश्रीमंत असलों पाहिजे. आतां यांतून कोणतीच जर अनुकूलता नाहीं तर मग वर लिहिलेला हेतु आमचा कसा सिद्धीस जावा ? बरें, अशा कामास कोणाची

मदत मिळेल म्हटलें, तर आमच्या स्नेही बांधवांस स्वतःचे उद्योग पराकाष्ठेचे; मग पुढें विचार काय? एखाद्यास एखादा विषय जुळवून दे म्हटलें, किंवा कमी जास्ती शुद्ध करून दे म्हटलें, कीं तो अगोदर कपाळास आंठ्या घालणार! मग एवढ्या यत्किंचित् कामाकरतां महिना पंधरा दिवस धक्के घेण्यास लावून व्यर्थ आमचा वेळ मात्र मोडणार; तेव्हां सर्व मदत मिळून एखादी गोष्ट पूर्णतेस येण्यास बहुधा आयुष्याचा बराच हिस्सा त्यांत खर्च केला पाहिजे. अहो, आपल्यास स्वतः विद्येचें ज्ञान कमी असल्यामुळें एखाद्या विद्वानाचें आर्जव करावयास जावें, तों तो उलटे दिवसगत मात्र लावणार. कारण, आमच्या लोकांचें नांव जरा विद्वानांमध्यें मोडूं लागलें, कीं लागलीच चैनबाजी आणि आळ्यता आपली छाप त्यांवर बसवून टाकतात. मग आम्हांसारख्या अविद्वानास कोठची मदत, आणि कोठची भेट? आतां सर्वच गृहस्थ तसे आहेत असें नाहीं. बरेच खरे विद्वान्, गुणी, नम्र व परोपकारी असेही आहेत. पण त्यांच्या मागें खरोखरीच आम्हांसारख्या गरिबांचीं शेंकडों कामें, तेव्हां मग त्यांनीं कोणकोणांस मदत करावी.

आतां नुसती विद्येची मदत मिळण्याची ही हकीगत, तेव्हां ह्यावरून आमच्या मनांतील हेतूस द्रव्याची मदत कोण करणार? बरें, एखादा श्रीमान् गृहस्थ गांठावा, तर तो बहुधा अक्षरशत्रु असणारा; तेव्हां पुस्तक प्रसिद्ध करणें म्हणजे काय हें त्याला समजून सांगण्यासच अगोदर सहा महिने लागणार, मग त्यावरून पुढचें अनुमान करा.

मित्र हो, वर लिहिलेल्या सर्व प्रकारची माझी मींच मनाची समजूत केली न केली इतक्यांत आणखी एक महा संकट येऊन पुढें उभें राहिलें. तें हेंच कीं "अयुक्तं स्वामिनो युक्तं युक्तं नीचस्य दूषणं ॥ अमृतं राहवे मृत्युर्विषं रुद्रस्य भूषणम् ॥ १ ॥

एकदां ज्याचें थोरांच्या पटांत नांव पडलें, कीं तो थोर; मग त्यानें कांहीं केलें आणि कसेंही केलें, तरी तो लोकप्रियच होतो; आणि हलक्या प्रतीच्या मनुष्यानें एखादी गोष्ट स्तुत्यर्ह जरी केली, तरी तो निंदेस पात्र होतो.

हा प्रकार जेव्हां पुढें येऊन उभा राहिला, तेव्हां मात्र खचितच माझी उमेद खचली, आणि अशाच घोटाळ्यांत कांहीं दिवस गेले. शेवटीं मींच

माझा दृढ निश्चय केला कीं, " कोणी श्रीमान् गृहस्थ लाखों रुपये खर्चून आरसेमहाल बांधतात, म्हणून आपण आपले शक्तीप्रमाणें झोंपडी बांधण्यास लाजावें काय? कविवर्य मोरोपंताच्या शक्तीप्रमाणें उंदीर आणि घुशी पुढें त्रास देतील, म्हणून घरच बांधूं नये काय? तसें विद्वज्जन उपहास करतील म्हणून लज्जेनें आपल्या बुद्धीस कोंडूनच ठेवावें काय? नाहीं. मूळचें जर आपणास खरें ज्ञान नाहीं, तर अज्ञानपणानें ज्ञान्याबरोबर वाद घालून आपलें अज्ञान दवडून त्यांचें ज्ञान मिळवून घ्यावें, हेंच योग्य, आणि याच बुद्धीनें मनाचा धडा करून हा अज्ञान धडा घेऊन ज्ञान्यासमोर ' धडा घालून द्या ' ह्मणण्यास हजर झालों आहें.

ग्रंथकर्ता.

---

# विशेष सूचना.

या ग्रंथाच्या या आवृत्तीपासून सर्व प्रकारें हक्क ग्रंथावर **रा० रा० रावजी मनोहर ताकभाते** यांनीं आम्हांस योग्य मोबदला घेऊन दिला आहे. आतां या ग्रंथाच्या हल्लीं प्रती दुर्मिळ असल्याकारणानें तो छापला आहे. सर्वांस याचा उपयोग व्हावा म्हणून पहिल्यापेक्षां याची किंमतही कमी केली आहे. याचा खप बराच झाल्यास पुढील पांच भागांचा आम्हींच हक्क घेतला आहे; तेही भाग लौकरच छापून प्रसिद्ध करूं.

**केशव रावजी गोंधळेकर.**

**आवृत्ति ४ थी.**

# परशियन् नाईट्स

अथवा

## किश्वरसिता.



पूर्वी परशिया देशांत अश्रताबादनामें मोठी प्रसिद्ध राजधानी होती. हा देश विस्तीर्ण व सुपीक असून यांतील प्रजाही सुखी असे. हें शहर सुरेख रीतीनें वसविलें असून सभोंवतीं मजबूत चिरेबंदी तट असे. तसेच, मोठमोठे दरवाजे चोवीस, व तटाबाहेर आसपास चोहोंकडे दोन दोन मैलपर्यंत गर्द आंबराई व बागबागाईत होती. यामुळें दुरून पाहाणारास मोठी रमणीय शोभा दिसत असे. शहरांत जिकडे तिकडे सुंदर व रुंद अशा बांधीव सडका असून प्रत्येक रस्त्यावर दुतर्फा रांगेनें एकसारखीं तऱ्हतऱ्हेचीं दुकानें लागून गेलीं असत. मनुष्यांची वस्ती जरी पुष्कळ दाट होती, तरी येथील बादशहाची कारकीर्द उत्तम असल्यानें या शहराची वसाहत फार निर्मळ होती. अश्रताबाद शहरीं सावसावकारी व व्यापारधंदा नेहमीं सचोटीनें चालत असे. येथें चोरी, चहाडी, दगाबाजी वगैरे प्रकार फारच कमी होते.कारण, सर्व लोक सुखी; जो तो उदमी व व्यापारी; तसेच, बहुतेक सरकारी व सावकारी नौकर असल्या कारणानें सर्व शहरांतील प्रजा आबादीआबाद असे.

अशा या सुंदर शहराचा व मोठ्या सुपीक देशाचा पालन करणारा जो बादशहा, त्याचें नांव ऐकण्यास आमचे वाचक उत्सुक झाले असतील यांत संशय नाहीं. त्याचें नांव अख्तरशहा. हा स्वाभावानें शांत व गंभीर मनाचा, शूर व न्यायी, तसाच धूर्त आणि विलक्षण शहाणा असा होता. अख्तरशहा दिसण्यांतही सुंदर पुरुष असे. यास दोन लग्नाच्या बायका होत्या. त्याही स्वरूपानें त्याच्या संपत्तीस शोभणाऱ्या व आवडत्या अशा होत्या. या बादशहास आसपासचे बहुतेक राजे करभार देत असत. सारांश, पृथ्वीतील एक चतुर्थांश भाग याचे स्वाधीन असून यास

व बलवान् राजा त्या वेळीं किंबहूना दुसरा कोणी नव्हता असें म्हटलें तरी चालेल. असें सर्व सौख्य या बादशहास असतांही परमेश्वरानें एक वैगुण्य त्या ठिकाणीं ठेविलें होतें, आणि त्या कमीपणामुळें हीं सर्व वर सांगितलेलीं सुखें **अखूतरशहास** व्यर्थ वाटत. " जगीं सर्व सूखी असा कोण आहे ? " या **रामदास**स्वामींच्या वाक्याप्रमाणें बादशहास पोटीं कांहींच पुत्रसंतति नव्हती. यानें आपल्या धर्माप्रमाणें पुत्रसंतानाकरितां दानधर्म वगैरे हरतऱ्हेचे प्रयत्न चालू केले होते. हजारों मशिदी बांधून त्या ठिकाणीं फकीर लोकांस सदावर्तें वगैरे ठेविलीं. तसेंच शहरांतील आंधळे, पांगळे, लुले, इत्यादिकांस गरम कपडे, व सायास न पडतां मिष्टान्न मिळावें याकरितां मोठमोठ्या धर्मशाळा बांधून तेथें त्या लोकांची बरदास्त ठेविली होती. शिवाय प्रत्येक मशिदींतून मुजावर ठेवून, त्यांकडून रोज सकाळीं व संध्याकाळीं ईश्वरास प्रार्थना करवीत असे. याखेरीज पीरपैगंबरांस मक्का वगैरे योग्य ठिकाणीं नवसही केले होते. तात्पर्य, लक्षावधि रुपये दानधर्माकडे खर्च चालविला असून, जे जे कांहीं कोणी उपाय सांगितले, ते ते बादशहानें, शरिराकडे व पैशाकडे न पहातां केले; परंतु कांहींच साफल्य झालें नाहीं. वजिरादिक मंडळींच्या आग्रहामुळें राजानें एकामागून एक अशा अकरा बायका केल्या, तरी इच्छा पूर्ण झाली नाहीं. या दुःखानें **अखूतरशहा** दिवसेंदिवस झुरत चालला, आणि त्याचें वयही बरेंच उतार झालें; तेव्हां संतान होण्याची त्यास अगदीं निराशा झाली.

एके दिवशीं बादशहा आपले दिवाणखान्यांत संध्याकाळचे पांच वाजतां बसून रस्त्यावरील बाजाराची मजा पहात होता. त्या वेळीं संध्याकाळचा सुमार असल्यानें, राजवाड्यापुढील मोठा रस्ता फार गजबजून गेला होता; तसाच, झाडून व पाणी शिंपडून चहूंकडे गार केला होता. दुतर्फा जीं दुकानें होतीं त्यांत सर्व प्रकारें सुंदर आरास केली होती. हलवाई, माळी, सुगंधी, कापडवाले ह्यांची एकच गडबड होऊन गेली आहे. रस्त्यानें माणसांची गर्दी इकडून तिकडे आणि तिकडून इकडे अशी एकसारखी दाट चालली आहे; पागोट्यांशीं पागोटीं लागलीं आहेत काय असा थाट दिसत होता. तशांत श्रीमान लोकांच्या गाड्याघोड्यांची गर्दी उडाली आहे. कोणी गाडींत, कोणी घोड्यावर, कोणी हत्तीच्या अंबारींत बसून जात असल्यानें, ती एक पहाण्यासरखी शोभा दिसत

होती. रस्त्यावर मनुष्यांची दाटी फार असल्यानें, ' चलो, बाजू, पैस असा श्रीमान लोकांच्या नौकरांचा आवाज एकसारखा लागून राहिला आहे; सरकारी नौकर आपापल्या कचेरींतून सुटल्यानें रस्त्यावरून मंडळींचे थवेचे थवे चालले आहेत; कोणी सुगंध्याचे दुकानीं, कोणी गटारयंत्रावर शिळोप्याच्या गप्पा झोंकीत बसले आहेत; कोठें मेजवानीच्या जेवणाच्या गोष्टी व कोठें राजदरबारी गोष्टी चालल्या आहेत. सुगंधीच्या व माळ्याच्या दुकानांतून मंद मंद सुवासाची झुळूक सर्व रस्त्यावर पसरून गेली आहे. अशा वेळीं बादशहा आपल्या महालांतून तो प्रकार पाहून फार खुश झाला, आणि किंचित् त्याला त्याचे दुःखाचा विसरही पडला. इतक्यांत एक फकीर शरीरानें तेजःपुंज, भव्य व गंभीर चेहऱ्याचा, असा सवाल ह्मणत ह्मणत त्या रस्त्यातें येत होता. तो सुंदर दिसत होता. सबब शेंकडो लोक त्यासभोंवते मिळून, त्याचे मधूर कंठांतील सवाल ऐकण्यास एकावर एक पडूं लागले. बादशहाची दृष्टि तिकडे होतांच, इतक्यांत तो फकीरही थेट त्या बादशहाच्या महालाखालीं येऊन वर आकाशाकडे तोंड करून सवाल ह्मणत आला, व बादशहा वरून महालांतून तो ऐकत आहे;—

"जिसको के कुच ख्याल ना रोजे सुमार है ॥ किसमतमे उसके गर्दसे लायलो बहार है ॥ हस्तिये गुलपे देखेतों गिरिया बहार है ॥ अश्रत सराये दै दारसे हरसु पुकार है ॥ नैरंगे जमानेका क्या इतबार है ॥ शादाहै कुई और कुई सो गवार है ॥ दुनिया है वेसोबातका है विसकूं इतवार ॥ करती है बेनवाकुं जहामें ए ताजदार ॥ और ताजदारको करे चाहे ए खाकसार ॥ फगफुर चिनकीन न ज्याहामें रही बहार ॥ हरएक बसरका रोजे अजलसे करार है ॥ फॉनी ज्याहे सब जहान खुदापर करार है॥ "

याप्रमाणें फकिराचे मंजूळ कंठांतील सवाल बादशहाचे कर्णरंध्रांत पडतांच डोळ्यावाटें अश्रुपात निघाले. पश्चात्ताप होऊन तसाच महालाखालीं उतरला; आणि धांवत धांवत येऊन फकिराच्या पायांस घट्ट मिठी मारली. कंठ सद्गदित होऊन अंगावर रोमांच उभे राहिले; नेत्रांतून जलधारा लोटून फकिराच्या पायांस स्नानच झालें, आणि तोंडांतून एक शद्बही निघेना. हें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. फकिरानें राजास हात धरून उठविलें आणि ह्मणालाः—" मो आद्ब हो दु-

जानु शहा अख्तर ॥ रखा शिर शहा साहेबके कदंपर ॥कहा दुर वेषनें सरकूं उटाकर ॥ नहो मायुष तूं यादे खुदाकर ॥ खुदा तुजको हमेषा षाद रखे ॥ दरे दवलत तेरी आबाद रखे ॥ तेरा नखले तमन्नबार लावे ॥ मुरादे दिल तेरी गुफ्फार लावे ॥ खुषिकी धुम हो शादी मुबारख धुलनका शहेरा मालन हार लावे. ॥ ”

असें ह्मणून फकीर एकाएकीं नाहींसा झाला. अखूतरशहानें डोळे उघडून पाहिलें तों फकीर नाहीं. मग काय विचारतां ! राजा हंबरडा फोडून मोठ्यानें रडूं लागला.

तेथें जमलेल्या हजारों लोकांच्याही डोळ्यांतून पाण्याच्या धारा चालल्या, आणि ह्मणतात कीं, फकीर इतक्यांत नाहींसा कसा झाला ! मग वजीर वगैरे सर्व मुत्सद्दी मंडळी तेथें येऊन त्यांनीं राजाचें शांतवन केलें. ते ह्मणाले, “ तो फकीर नव्हे. तर आज साक्षात् पैगंबरानेंच सर्वांस दर्शन दिलें. कारण तुमची निष्ठा फार; तसाच तुह्मीं दानधर्म अपार केलांत; त्याप्रमाणेंच अनाथांचे आजपर्यंत पालन करीत आहां; तेव्हां या सर्वांनीं दुवा दिल्यानें व आपल्या पुण्याईच्या जोरानें आज साक्षात् खुदानेंच आपणावर मेहरबानी केली, तर आजपासून आपल्या ज्या ज्या इच्छा असतील, त्या त्या सर्व ईश्वरेच्छेनें पूर्ण होतील. ” असो. अशी सर्व प्रकारें बादशहाची समजूत करून त्यांस वाड्यांत नेलें. त्या दिवशींच जी राजाची मुख्य पट्टराणी ‘ हूसन ऑफरोज ’ नामें होती, तिला गर्भ राहिला. नंतर चंद्रकलेप्रमाणें उत्तरोत्तर गर्भ वाढून दिवस पूर्ण होतांच पुत्र झाला. त्या वेळेस संध्याकाळचे सहा वाजले होते. सरकारांस पुत्ररत्न झालें असें कळतांच हजारों तोफांचे धडधडाट, लक्षावधि बंदुकांचे कडकडाट, ताशामरफ्यांचा घडघडाट, वाड्यांत लाखो मुत्सद्दीमंडळी आली त्यांच्या गाड्याघोड्यांचा गडगडाट, जिकडे तिकडे, रोषनाईचा चकचकाट, रस्त्यानें मशालीचा लखलखाट, या प्रकारें शहरांत चहूंकडे आनंदी आनंद भरून गेला. तसेंच, लाखो हत्ती, घोडेस्वार-शिबंदी आणि गांवांतील शेटसावकार, संभावित व राजमित्र वगैरे मंडळींची राजवाड्यासमोर एकच गर्दी होऊन गेली. अशीच इतर ज्ञातींचीही बरीच दाटी झाली. त्यांत कोणी कामाचे, कोणी गैर कामाचे लोक उगीच इकडून तिकडे हिंडताहेत, कित्येक वाड्यांत जाण्याकरितां झटपट्या घेत

आहेत, कोणी धक्के खाऊन एकमेकांस उर्णी उत्तरें बोलत आहेत, कोणी पागोटें गेलें ह्मणून हांका मारीत आहेत, मूल चुकलें ह्मणून कित्येक शोध करीत आहेत, कोणी ह्मणतात, ‘ वाहवा ! काय दारू चांगली सुटत आहे,’ ह्मणून आकाशीं पाहतात. ‘ भाजलें भाजलें, जळलें जळलें,’ असेंही कोणी ओरडताहेत, त्यांत ‘ बरें झालें ’ ह्मणून कोणी हंसताहेत. इतक्यांत एकमेकांचे स्नेही एकमेकांस भेटून बोलत उभे आहेत, तों मागून मानकऱ्यांच्या बायका पालखींत बसून येताच, त्यांच्या पुढचे भालदार, चोपदार बोलत उभे राहणाऱ्यांस काठ्या लगावीत आहेत, अशी एकच गडबड होऊन जाऊन त्या दिवशीं पुत्रोत्साहाचा मोठा सोहळाच झाला. बादशहानें हजारों बंदीवान सोडून देऊन, लाखो रुपये दानधर्म केला.

मोठ्या आनंदानें पुत्राचें नांव **किश्वरासिता** असें ठेविलें. **किश्वरासिता** जसजसा मोठा होत गेला, तसतशी त्याची बुद्धि व गुण दिसूं लागले. त्याला लहानपणीं राज्यनीति, न्यायशास्त्र, युद्धप्रकार, शारीर कसरती वगैरे विद्या राजानें पुष्कळ द्रव्य खर्चून व शिक्षक ठेवून शिकविल्या. त्याला अंगची बुद्धि असल्यानें, व लहानपणापासून शिक्षण चांगलें मिळाल्यानें, नऊ दहा वर्षांतच तो राज्यकारभार पाहूं लागला. त्या वेळीं **अख्तरशहाचें** बरेंच ह्मातारपण झाल्यामुळें, बहुतेक राजकीय काम हाच करूं लागला. आपल्या बुद्धिकौशल्यानें एक दोन वर्षांतच त्यानें प्रजा व राज्यमंडळ वगैरे आपलेंसें करून घेतलें. न्याय बरोबर करीत आसल्यानें सर्व देशांतील लोकांस **किश्वरासिता** फार प्यारा झाला, आणि थोड्याच दिवसांत **किश्वरासिताची** दिगंतरीं कीर्ति होऊन शत्रूंस चहूंकडे धाक बसून गेला.

**किश्वरासिताचे** मातोश्रीस व बादशहास **किश्वरा**वांचून क्षणभर देखील चैन पडत नसे; त्याचें वय जेव्हां सोळा वर्षांचें झालें, तेव्हां शरीर सडपातळ, बांधा उंचट; डोळे मोठे, भिंवया धनुष्याकृति, नासिका सरळ, वर्ण गौर आणि त्यांत तारुण्याचा भर, मग काय विचारावें ? वृद्ध बादशहा जेव्हां जेव्हां त्याच्या मुखाकडे पाही, तेव्हां तेव्हां तो गुडघे टेंकून ईश्वराची प्रार्थना करी, आणि त्या फकिराचे फार आभार मानीत असे. **किश्वरासिताचें** लावण्य स्वरूप पाहून बादशहाचे डोळ्यांत आनंदाश्रु येत. तो नित्य खुदाची विनंति करी कीं, “ हे खुदावंत, हल्लीं

तुझ्या कृपेचा केवळ मेघच मजवर वर्षाव करीत आहे. आजपर्यंत कोणत्याही सुखाची या दासास कमतरता पडली नाहीं, व शेवट तर फारच गोड केलास. मदनाप्रमाणें ज्याचें स्वरूप असा तुझ्या कृपेंतील ओतलेला पुतळा, मला पुत्र म्हणून दिलास. तर आतां इतकी प्रार्थना करतों, व वारंवार पदर पसरून तुजजवळ मागतों कीं, **किश्वरास** चिरायु करून त्याजकडून बहुत दिवस प्रजापालन करीव." **किश्वरसिताच्या** स्वरूपावरून आलाबला घेऊन त्याच्या मातोश्रीनें नेहमीं त्याची दृष्ट काढावी.

**किश्वरसितानें** स्वरूप पाहण्याकरितां, लांबलांबच्या राजे रजवाड्यांनीं त्याच्या तजबिरा मागून नेल्या होत्या, व कित्येक राजांनीं आमची कन्या स्वीकारून आम्हांस पदरांत घ्यावें म्हणून विनंति-पत्रें पाठविलीं होतीं. त्यामध्यें कोणी **मनोवरशहा** एक प्रसिद्ध मांडलीक राजा होता. त्याला **माहेजहा** नामें फारच सुंदर कन्या होती. तिचें स्वरूपही फार वर्णनीय होतें. ही आपणास मिळावी म्हणून कैक राजांनीं तिचे बापाशीं बोलणें लाविलें होतें. परंतु **मनोवरशहा** यानें कोणासही रुकार न देतां, त्याचे मनांतून या देशाचा सार्वभौम राजा, जो **अखूतरशहा** त्याचे मुलास आपली कन्या द्यावी असें होतें. एक तर सार्वभौम राजा. दुसरें उत्तम शहाणा आणि स्वरूपानें आपल्या कन्येपेक्षां किंबहुना जास्त, तेव्हां असें स्थळ आपल्या कन्येस जर मिळालें तर तिचें मोठें प्रारब्धच समजलें पाहिजे. असा विचार करून त्यानेंही एक विनंति-पत्र **अखूतरशहास** पाठविलें. एक हुशार व चतुर वकील **मिरजाशातेर** नामें त्याचेच पदरीं होता, त्याजबरोबर तें पत्र देऊन त्याची रवानगी **अश्रताबादेस** केली.

तो वकील मोठ्या जलदीनें **अश्रताबादेस** येऊन दाखल झाला, व शहराबाहेर डेरा देऊन तेथें राहिला. दुसरे दिवशीं भेटीस यावें म्हणून बादशहाचा हुकूम आल्यानंतर **मिरजाशातेर** कचेरींत येऊन हजर झाला. त्या वेळीं **अखूतरशहा** मुख्य ठिकाणीं बसला असून त्याचे शेजारींच **किश्वरसिता** बसला होता. भोंवतालीं दोहीं बाजूंस सर्व वजिरादिक अमीरउमराव मंडळी बसली होती. दोहींकडचे भालदार, चोपदार उभे असून कचेरींचें काम मोठ्या थाटानें चाललें होतें. अशा वेळीं **मिरजाशातेर** यानें मोठ्या अदबीनें बादशहास मुजरा करून व रुमालानें हात बांधून रिवाजाप्रमाणें उभा राहिला. वजिरानें, ' कोण, काय कोठून आलां. व-

गैरे मजकूर विचारून घेऊन बादशहास कळविला. नंतर वकिलानें आणलेलें पत्र वाचण्याविषयीं हुकूम घेऊन वजीर पत्र वाचतो. बादशहा आदिकरून सर्व मंडळीचें लक्ष्य पत्र ऐकण्याकडे आहे, त्यांत विशेषेंकरून **किश्वरसिताचें** लक्ष्य फार आहे. तें पत्र असें:—

" खुदावंत मेहरबान सब राजनकू सिरताजराज **अख्तरशहा** महाराज आपके चरन कदमपर बहोत निगारखये दोजवाब लिखनेकू रजा लेताहूं. आबके मेहरबानीसें आबका ताबेदार मे आजदीनतलक बहूत खुशीहूं कुच फिकीर नहीं है. लेकीन एक बडी जबरदस्त कटचार हमारे दिलकूं लग रही है. ए दुःखके मारें मै बहोत बेजार हूं. उसकू कूच अच्छा दवा नहीं मिलता. बडे बडे हकीम हमारे दर्दको देखकर खुदाका नाम लेतेहै. उसवास्ते, आबके निगापर शरन आयाहूं. तो मेरे मोहबतपर निगा रखो सुनो खाविंद, आपकेपास हमारा वकिल **मिरजाशातेर** उसकू भेजाहै. और उसकेसात **माहेजहा**की तसबीर बी भिजाई है. तो ये देखकर जलदी आपका जो उचा और मौलवान् दवा जो **किश्वरासिता**, उसको देना. आब मै आपना दर्दका खुलासा लिखता हूं. माहेजहा करके हमारी जी बेटी है, उसकू खुदानें बहोत तसदी लेकें बनवाई है. तो उस्से सरुपके मारे मे बहोत लाचार हूं. और अव्वल मैनें काहाके दिलकु कट्यार लगी है, ते एही कट्यार. तो एक **माहेजहा**सारिखा उसकू मरद खुदानें आबका **किश्वरासिता** बनवाया है, उस खातर आपआपना सब् लवाजमा लेकर मेहरबानी करकर **किश्वरके** शादीके वास्ते, हमारे शहरको आकर हमारी दर्द अछी करो. आब मै आपनी संदेसकी आखेरी कर्ता हूं. तसदी माफ करो." ता० ६ ( चांदरात. )

असें वजिरानें पत्र वाचून वकिलानें आणलेली **माहेजहा**ची तसबीर बादशहाजवळ दिली. तसबीर पाहतांच **अख्तरशहा** फार खूष झाला, आणि म्हणाला, " ईश्वरी लीला अगाध आहे. कारण, अलीकडे **किश्वरास** योग्य नवरी कशी मिळेल, याविषयीं मला रात्रंदिवस काळजी लागली होती. परतु सर्वांची काळजी करणारा जो परमेश्वर त्यानें अगोदरच सर्व तयारी केली आहे. " असें म्हणून कचेरींतील सर्व मानकऱ्यांस ती तसबीर दाखविली. वधू योग्य आहे' असा त्या सर्वांचा रुकार पडल्यावर ती तसबीर राजानें महालांत पाठवून दिली. तिकडे तर ती **माहेजहा** फारच

पसंत झाली. कारण बादशहाच्या जनानखान्यांत जरी उत्तम उत्तम स्त्रिया होत्या, तरी त्या सर्वजणी आपापल्या स्वरूपास धिक्कार करून तसबिरींतील स्वरूपास पाहून लाजल्या. ह्याप्रमाणें सर्वांचा सल्ला पाहून बादशहानें **मिरजाशातेर** वकिलास मोठें बक्षीस व उंची पोषाक देऊन त्याची परत रवानगी केली. त्याबरोबरच एक **किश्वरसिताची** तसबीर व एक पत्र दिलें. तें पत्र असें— " आपलें पत्र वाचून फार आनंद झाला. आपण केलेला सर्व बेत आह्मांस मान्य आहे, आम्ही या महिन्याचे पहिल्या तारखेस निघून येतों, आपण सर्व तयारी ठेवावी. यामप्रमाणें वकिलाबरोबर **मनोवरशहास** पत्र देऊन कचेरी बरखास्त झाली. जातेसमयीं **माहेजहाची** तसबीर बादशहाजें **किश्वरसिताचे** स्वाधीन करून, आपण आपल्या राणीच्या महालांत गेला.

**किश्वरसितानें** ती तसबीर मोठ्या आनंदानें घेऊन, आपल्या महालांत जाऊन एकांतीं पहात बसला. तिची ती मनोहर मोहक मूर्ति पाहून त्याचें सर्व चित्त आकर्षण झालें. पायाच्या नखापासून तों मस्तकापर्यंत तिला न्याहाळून पाहून मनांत म्हणतो, " प्रिये, या तुझ्या सुंदर स्वरूपास व टवटवीत तारुण्यास पाहून माझें मन फारच वेडें झालें. खरेंच सांग, मला पाहून तुला असें झालें काय ? नसेल झालें. कारण, पुरुषाचें अंतःकरण फार कोमल असल्यानें स्त्रियांकडे जलद वळतें; तसेंच, स्त्रियांचें मन कोठें कोमल असतें ? याविषयीं मीं पुष्कळ ग्रंथ पाहिले आहेत, त्यांत बहुधा पुरुष सदयअंतःकरणी व स्त्रिया निर्दय, घातकी असेंच वारंवार आढळलें आहे. आपल्या मोहजालांत पुरुष-मन-मीन आकर्षण करून, मग त्याच्याशीं त्या निष्ठुरतेनें घातकपणा करतात, आणि विश्वासी पुरुषांस विश्वासघातानें ठार मारितात, असेंही पुष्कळ माझ्या वाचण्यांत आलें आहे. खेरीज स्त्रियांचीं फार विलक्षण चरित्रें असतात, म्हणून मी ऐकतों; परंतु तुझे चेहऱ्यावरून तूं घातकी स्त्री नसावीस अशी माझी खात्री होते, तर आतां मनांत संकोच न धरितां एकदा माझ्याशीं प्रिय भाषण बोल. हा **किश्वर** इतका शहाणा व शोधक असतां तुला वश झाला. तर विलंब न लावितां या चातकपक्ष्याची तृषा शांत कर. हा तुला कधींही अंतर देणार नाहीं " " असें म्हणून हात पुढें करून तिला आलिंगन देण्यास जातो, तों तेथें तसबिरीचा धक्का बसतो. "

अंगास धक्का बसतांच सावध झाला, आणि इकडे तिकडे पाहून म्हणाला, " कायहो मी वेडा आहें ! कांचेंतील चित्र जिवंत स्त्री समजून धरावयास गेलों ! बरें झालें, हें माझें मूर्खपणाचें कृत्य कोणी पाहिलें नाहीं, नाहींतर या किश्बरास कोणीं वेडा म्हटल्यावांचून राहतें काय ? " असें म्हणून पुनः तसबीर पाहूं लागला; आणि खूष होऊन म्हणतो " शाबास त्या काढणाराची ! कारण कांचेंतील स्त्री असतांही प्रथम पाहिल्याबरोबर हुबेहुब स्त्री दिसावी काय ? आणि मजसारख्या शहाण्यानें चकावें काय ? तसबीर काढणार मोठा चतुर कारागीर होता यांत संशय नाहीं. आतां जिची तसबीर इतकी सुरेख, ती स्त्री अर्थातच मला नवरी योग्य आहे. आतां माझा बाबा लग्नास जाण्याची जर लवकर तयारी करील तर बरें होईल. कारण तिची भेट केव्हां होईल असें मला होऊन गेलें आहे. " या प्रकारें किश्बरासितास माहेजहाचें वेड लागलें.

पुढें आठ चार दिसांतच बादशहानें लग्नास जाण्याची तयारी केली. बरोबर अकरा राण्या, तसेच वजीर, काजी, अमीरउमराव, हत्ती, घोडे, पालख्या, म्याने, स्वार, शिंबंदी आणि लक्षावधि फौज मोठ्या थाटानें निघाली आहे. गांवांतील शेटसावकार, व मोठमोठे संभाविक गृहस्थ आपआपल्या इतमामासह बादशहाबरोबर निघाले. तसाच तऱ्हतऱ्हेचा बाजार, व शिकारखाना वगैरे इतर जातीचेही हजारों लोक निघाले आहेत. या प्रकारें सर्व लवाजम्यासुद्धां अख्तरशहा मोठ्या आनंदानें शहरांतून निघून मजल दरमजल हळूहळू मुनोवराबादेस चालता झाला. दरकूच दर मजल जातां जातां मुनोवराबाद सुमारें दोनशें मैल पुढें राहिलें तों मध्यंतरीं एक मोठी गर्द झाडी लागली. त्या झाडींतून पुढें जाण्यास मार्ग फार भयंकर होता. झाडी सुमारें वीस मैल लांबीची असून आठ मैल तिची रुंदी होती, व एकसारखे गगनचुंबित वृक्ष लागून जाऊन दिवसास सूर्यकिरण दिसणें कठिण, अशी दाट छाया होती. शिवाय वाघ, लांडगे, आस्वलें वगैरे हिंसक पशूंच्या आरोळ्या एकावर एक ऐकूं येत होत्या. आसमंताद्भागी, दोन चार नद्या, व कांहीं ओढे असे मैलामैलांच्या अंतरावर भरपूर वाहत होते.

अशी रमणीय झाडी पाहून व दिवसही एक घटकाभर राहिला आहे,

आतां पुढें जाण्यांत फायदा नाहीं, असा विचार करून बादशहानें तेथेंच त्या दिवशीं तळ दिला.

रात्रौ जिकडे तिकडे लोक आपापल्या डेऱ्यांत विसावा घेत आहेत. कोणी निजले आहेत, कित्येक गप्पा झोंकीत बसले आहेत, कित्येक स्वयंपाक करताहेत, कोणी दाणापाणी जनावरांस घालण्याच्या कामांत गुंतले आहेत. कित्येक जनावरांची चाकरी करीत आहेत, कोणी हुक्का ओढीत आपापल्या मंडळीसुद्धां चैनीत बसले आहेत;—असें सर्व लष्कर बेफाम व अस्ताव्यस्त असून बादशहा आवडत्या राणीच्या डेऱ्यांत विलासांत आहे आणि **किश्वरसिता** स्वस्थ पलंगावर पडून " **माहेजहाचें** " ध्यान लागून गेल्यामुळें तळमळत आहे.

अशा वेळीं, एकाएकीं एकदम चहूंकडून तोफा सुटल्या, व बंदुकांचे लाखो बार होऊन एकच अवाज झाला कीं, ' पकडो, पकडो, कत्तल करो, दीन् दीन् ' म्हणून पांच पन्नास हजार लोक यांच्या छावणींत शिरले, मग काय विचारतां ? धर कीं मार. कोणी बंदुकीनें, तरवारीनें, कोणी धोंडे व सोटे एकसारखे मारीत सुटले. तेंव्हां एकच कल्होळ झाला. एकाएकीं गडबड झाल्यानें बादशहाचे लोक सावध होऊन त्यांनींही आपल्या तोफा सुरू केल्या, कोणी बंदुका सोडूं लागले, कैक आपली तरवार काय झाली म्हणून पहात आहेत, कोणी म्हणतात, आमचे घोडे कोठें आहेत, अशा धांदलींत कोण कोणास कां मारतो याचा पत्ता नाहीं. आपआपसांत एकमेकांस ठार मारीत सुटले. कोणी कोणाचा हुकूम ऐकेना, जें सांपडेल तें घेऊन एकमेकांस मार देत आहेत, कैकांचे मुडदे पडून रक्ताचा पूर चालला. कोणाचें डोकें उडालें, कैकांचे कान तुटले, कित्येकांचें नासिक त्रिंबकास गेलें, कोणी पाणी पाणी म्हणतात, धनी पडला म्हणून कैक घोडे मोकळे पळताहेत, हत्तीहत्तीच्या टकरा लागून मोठा प्रलय झाला. आधींच रात्र अंधारी, त्यांत झाडी दाट, तशांत तोफांचा धूर व जमिनीवरील धूळ उडून चहूंकडे दिशा भरून गेल्याकारणानें अगदींच दिसेनासें झालें. लेंक बापास ओळखूं येईना; लढाई होण्याचें कारण काय ? शत्रू कोण व कोठून आला ह्याचा कांहींच पत्ता नाहीं. सर्व बेबंद कारभार होऊन गेला. अशा धांदलींत **किश्वरसिता** आपल्या घोड्यावर बसून स्वतः आपल्या वृद्ध बादशहाचा व मातोश्रीचा शोध करीत फिरत आहे, परंतु

कोठें शोध लागेना अशा कठिण प्रसंगांत असतांही या शूरानें हजारों लोक आपल्या तरवारीनें छाटले, पण आपल्या अंगास एक देखील वार लागूं दिला नाहीं. **किशबरासिता** जरी शूराच्या नात्यानें लढाई करीत होता, तरी त्याचे पंचप्राण वृद्धबादशहाकडेस लागले होते. इतक्यांत अशी हूल उठली कीं, " बादशहा तो मरगया लेकीन **किशबरासिता** नहीं मिलता. उसकु पकडो. " असा एकच शब्द कानीं पडतांच **किशबरासिताची** कंबर खचली आणि हातांतून तरवार खालीं पडली. मग मनांत विचार करतो कीं, " ज्या माझ्या ममताळू तातानें मजकारितां नवस व सायास करून मला मिळविलें, आणि मोठ्या लोभानें आजपर्यंत वाढवून पालनपोषण केलें त्या माझ्या प्रियकर म्हाताऱ्यास, आज मी जवळ असतां या दुष्टांनीं मारावें काय? तस्मात् धिक्कार असो माझ्या जीवितास! मीं वांचून काय केलें? आतां माझी आई कोठें असेल? तिला कोणी दुष्टांनीं काय दुःख दिलें असेल कोण जाणे! या गर्दींत त्यांचा कसचा शोध लागतो! मला तर पित्याचा व आईचा आजपर्यंत कधींच वियोग झाला नव्हता, व त्यांसही मी डोळ्यां-आड झालों म्हणजे चैन पडत नसे. माझ्या बादशहाचा सर्व जीवप्राण तर मजवर होता. मरते वेळेस माझें स्मरण केलें असेल, तेव्हां त्यांस कसें वाटलें असेल? मी चांडाळ त्या वेळेस जवळ नव्हतों. शेवटीं एकवार तो माझ्या दृष्टीस पडला नाहीं. अंतकाळाची भेट मज अभाग्यास झाली नाहीं. आतां पुनः मला माझा बाबा भेटेल काय? " असें म्हणून **किशबरासिता**चे डोळ्यांतून आश्रुधारा वाहून तो धाय धाय रडूं लागला आणि त्या गर्दींत मातापितरांचा शोध करीत दीनमुखानें हिंडूं लागला.

अशा वेळीं दुष्ट लोकांनीं, हा **किशबरासिता** आहे, असें न ओळखतां, त्याचेही अंगावर कांहीं वार केले. मग काय विचारतां! **किशबरसितावर** मोठा दुःखाचा गहजबच गुदरला. बापाच्या तपासाची जेव्हां निराशा झाली, तेव्हां आतां आपणही या ठिकाणीं मरावें असा विचार करून तेथून लांब जरा झाडींत जाऊन तेथें घोड्यावरून खालीं उतरला, आणि आपल्या जोडगोळीच्या पिस्तुलांत बार भरून तो आपल्या मानेसमोर लावून घेतला, व पिस्तुल उडवून प्राण देण्यास सिद्ध झाला.

पिस्तुल उडविणार इतक्यांत कांहीं स्मरण होऊन आपल्या

घोड्यास म्हणतो:—“ आज तुझ्या धन्यावर आपल्या हातानें मरण्याचा प्रसंग आला आहे. तर आतां तूं जा, तुला रजा दिली आहे. तूं माझा आवडता असून आजपर्यंत माझी चाकरी इमानानें केलीस; म्हणून आतां शेवटचे एक काम तुला सांगावें असा माझा हेतु आहे. तें काम हेंच कीं, मी मेल्यावर तूं ही गर्दी सामसूम होईपर्यंत येथेंच बसून पुढें मुनोवराबाद शहरीं जा; आणि माहेजहाच्या महालासमोर जाऊन झालेला मजकूर तिला कळीव ” असें म्हणून एका विस्तीर्ण झाडाच्या पानावर कांहीं मजकूर लिहून तें पान त्याच्या मस्तकावर बांधलें, व गळ्यांतही एक [illegible] लखोटा करून दोरीनें बांधला, आणि सांगितलें, “ तूं तेथें गेल्यावर ती लखोटा वांचून पाहून तुला आपले घरीं ठेवून घेईल. तूं जशी माझी चाकरी आजपर्यंत इमानानें केलीस तशीच तिची कर; ती तुला अंतर देणार नाहीं. ” किरबरासिताचें असें बोलणें ऐकून, ता घोडा मुकें जनावर असतांही, त्याच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा चालल्या; आणि पुढचे दोन पाय टेंकून व आपलें मस्तक धन्याच्या चरणीं ठेविलेसें करून तसाच उडी मारून लांब झाडींत गेला.

घोडा गेल्यावर किरबरासिता पिस्तुल उडविणार इतक्यांत एक स्वार धांवत धांवत येऊन मोठ्या आदबीनें मुजरा करून ह्मणाला:—

“ आब तो मै तुमकू पछानें महाराज, तो जरा धीर धरो और आबके बाप हमारे सरकार उंने कुच आबकू संदेशा भेजा है ओ सुनकर जो चाहेसो करो. ”असें म्हणून पत्र दिलें.

हें पत्र आपल्या बापाचेंच असें ओळखल्यावर त्यास एकदम हर्ष झाला, आणि हातांतील हिऱ्याची आंगठी त्या स्वारास बक्षीस देऊन म्हणाला, “ शाबास ! असलेच इमानी नोकर असतात. ” नंतर पत्र वाचतो.

“ ये मेरा जाव प्रानसे प्यारा बेटा किरबर ! खुदानें आपनेपर बहोत घुस्सा करकर ये दुसमानके हातमें आज हामकू और तुमारे सब माकूं दिये है. उसे दुःखसे मारें मै और तुमारी मा बहुत बेजार हूं. क्या करना कुच इलाज नही है. ये दुसमान कोन ? और लढाई कैसी हुई, वजीर और आपन सब लोक कैसे बैमान हुवे, ये बात कुच् मालूम नही पडी. अखेर इस बखत हामारे पास जानकादोस्त कुई नथींथा. एक आपना जुना और बुड्ढा जमादार हमारे सामने खडाथा. उसकू देखकर मेरे आखमेसें

पानी निकला. और उसकू पुछे, क्यौ जमादार, हमारे **किश्वरका** कुच संदेशा है ? उंने जबाब दिया. जी सरकार, ये धांदलमे छोटे सरकार कुच हमारे नजरमे नै आये. ये सुनकर मेरा जान निकल गया; और उसबखत जमारदाके पास एक खत देकर उसकू आबके तपासके खातर भिजाया है, ये जमादार बहोत इमानी आदमी है, उसवास्तें तू आपनी हकीगत जलदी भेज देना, और हामकू ऐसी कैद हुई; उसखातर तुमने दम नही छोडना और आपनी ज्यानकी खैराब नही करना, तो मै लिखता हू वैसा करो.

हमारी पट्टरानी तुमारी मा **हुसनआफरोज**, इसका बाप उत्तरदेस का बडा जबरदस्त सरदार है. उसके पास ज्याकर आपनी सब हकीगत फरमावो, ओ सुनकर आबकू सब दुःखमेसें निकालेगा. आब ये दुःखमेसें निकालनेवाला सगा दुसरा कुई नही है. उसवास्ते तूं जलदी व्हां ज्याकर इलाज करना. इसका नाम **सुलेमानशहा**. आब इसबखत और कुच लिखनेकू मै नही सकताहूं, तुम आपनी हकीगत जलदी फरमावो. नही तो मेरी ज्यान जायेगी. "— तारीख १३. आबका बाप **अख्तरशहा.**

पत्र वाचल्यावर बाबा मेला, असें जें पूर्वीं त्यास वाटलें होतें तें दुःख जाऊन किंचित् आनंद झाला, आणि त्याच जमादाराबरोबर उत्तर दिलें कीं, " आणखी कांहीं वेळ आपलें पत्र पोंचलें नसतें तर हा **किश्वर** दुनयेंतून नाहींसा होणार होता. आपल्या पत्राप्रमाणें उत्तर दिशेस चालता झालों. आपण लिहिल्याप्रमाणें सर्व तजवीज होणार ह्यांत संशय नाहीं. आपण दम सोडूं नये, परमेश्वरकृपेनें लवकरच बंदमुक्त व्हाल. " असें उत्त-
त्या जमादाराबरोबर देऊन आपण सुलेमानशहाकडे जाण्यास

इकडे जमादारानें तें पत्र आणून बादश...
सितारचें पत्र वाचून **अख्तरशहा** व हुस...
झालें. आणि त्या जमादारास अंगावरी...
बक्षिस दिली. इतक्यांत उजाडलें
त्यांनीं आपले प्रभू शत्र...
शरण गेल आणि
निघून बादश...
थील राज्य अ...
गेला. तेथें

राज्य करूं लागला.—प्रिय मित्र हो, आतां जरा मागें वळूं या.

इकडे **मिरजाशातेर** वकील **मुनोवराबादेस** पोंचल्यावर **मुनोवरशहास अख्तरशहाचें** पत्र देऊन झालेला सर्व वृत्तांत निवेदन केला. बादशहानें आपला विचार मान्य केला असें पाहून **मुनोवरशहास** फारच संतोष झाला, आणि त्यानें लग्नाची तयारी केली. मोठा मंडप तयार करून सर्व शहर शृंगारिलें. भिंतींस तऱ्हेतऱ्हेचे रंग देऊन रोषनाईचा चकचकाट करून दिला. नानाप्रकारचे वाजंत्री आणवून वाद्यें सुरूं केलीं होतीं. देशोदेशींचे सरदार व राजे रजवाडे येऊन शहरासभोंवतीं लष्कर उतरलें आहे, व त्यामुळें शहर गजबजून शोभिवंत दिसत आहे. घरोघरीं **माहेजहाच्या** स्वरूपाची व तिला योग्य स्थळ मिळाल्याची प्रशंसा चालली आहे. सरकारवाड्यांत तर फारच गडबड असून कडेकोट लग्नाची सिद्धता झाली आहे. अशा आनंदांत **किष्बरासिताची** तसबीर आणलेली दिली नाहीं, असें **मिरजाशातेर** यास स्मरण होऊन त्यानें ती तसबीर आणून सरकारापुढें ठेविली आणि म्हणाला, " मला स्मरण नव्हतें, गुन्हा माफ असावा " तसबीर पहातांच **मुनोवरशहा** अगदीं खुष झाला; आणि तसाच आपली राणी **जिनतआरा** हिजकडे ती दाखविण्याकरितां गेला. तो तेथें राणी **जिनतआरा** व कन्या **माहेजहा** दोघीही महालांत बसलेल्या होत्या. इतक्यांत सरकार आलेले पाहून दोघीही झटकन् उठून उभ्या राहिल्या. **मुनोवरशहानें** आणलेली तसबीर राणीस दाखविली. [illegible] राणीस अतिशय हर्ष होऊन म्हणाली, " महाराज, आपल्या [illegible] नें ठेवील ? आपण जें कराल तें योग्यच कराल. " असें [illegible] धीन केली.

[illegible] हा धांवत धांवत मोठ्या घाईनें आपल्या [illegible] न आंत बसली. आपण आ[illegible] चित्रविचित्र सुंदर म[illegible]ाली [illegible] तसबीर ठेविली, आणि [illegible] मूर्ति [illegible]हिच्या न[illegible] [illegible]घला असून [illegible] तिचें तेज [illegible]री शो-

ला लपेटून पाठीशीं ढाल व हातांत समशेर चमकत होती. हाताची सर्व बोटें रत्नखचित मुद्रिकांनीं भरलीं असून एके हातांत एक उत्कृष्ट गुलाबी रुमाल शोभत होता. आधींच ज्याचा गौरवर्ण तशांत भरज्वानीची टवटवी सर्व मुखावर जशी काय सांडत आहे! तसेंच सुकुमार ओंठांवर नवीन काळसर रंग दिसण्याचा सुमार भासतो आहे. असा तो सुरेख व मनोवेधक भ्रमररूपी चेहरा,- हिचे प्रफुल्ल हृदयकमलांत पूर्ण बिंबून गेल्यामुळें, हा प्रत्यक्ष पुरुष नव्हे, तसबीर आहे, असें भान न रहातां **माहेजहा** अगदीं वेडी होऊन गेली. आणि आपणाशींच मनांत म्हणते —" महाराज, हा वेळपर्यंत मीं आपले स्त्रीधर्माचे लज्जेस्तव दम धरला; परंतु आतां माझ्यानें धीर धरवत नाहीं. कारण सुमारें एक तास झाला, आपण माझे महालांत मजसमोर उभे असून या दीन दासीबरोबर एक शब्दही बोलत नाहीं, याचें कारण काय? हीं स्त्री आपल्या मनायोग्य नाहीं वाटते? कीं या मूर्ख अज्ञानी स्त्रीपासून कांहीं अन्याय झाला काय? आपलें हास्यवदन पाहून आपल्यास कांहीं रोष आला असावा असाही तर्क पोहोंचत नाहीं, तर मग माझ्याशीं एकदां प्रिय भाषण बोला. आपण दूर आहांत, हा वियोग माझ्यानें सोसवत नाहीं. अंमळ जवळ या; मी बसलें आहे. या पलंगावर येऊन बसा. इतके दिवस मी आपली वाट पहात हे तारुण्याचे दिवस काढतें; आणि अजूनहीं अंत पाहतां यास काय म्हणावें? सरकार, हं आतां मीं ओळखलें, आपले मनांत मीं आपले जवळ यावें असें आहे काय? हं, तरच मनांतले मनांत हंसतां, आणि बोलत नाहीं, तर मींच येतें, मला कोठें दम धरवतो आहे?" असें म्हणून आपण त्यास हातीं धरून आणावयास जाते, तों एकदम मेजास धक्का बसून तसबीर खालीं पडली आणि भेगा पडून ती अगदीं फुटून गेली. आवाज होतांच **माहेजहा** चपापली आणि सावध होऊन तोबा तोबा करूं लागली. नंतर आपला धिक्कार करून म्हणते: " काय मीं हें निंद्य कर्म केलें? आतां अशी मूर्ति पुनः स्वप्नांत सुद्धां पहाण्यांत मिळणार नाहीं. आग लागो माझे हातास! आणि माझे बुद्धीस तरी काय भ्रम झाला? खरोखर प्राणनाथ वाटून ह्या प्रतिबिंबाचा नाश केला; परंतु हें कांही तरी दुश्चिन्ह झालें, ह्यांत संशय नाहीं. आतां काय करावें याविषयीं तिला चटपट लागून गेली.

इकडे **मुनोवरशहा** लग्नाच्या तयारींत आहे, व सर्व शहर आनंदानें गजबजलें आहे तों त्याच पहांटेस सहा वाजतां **किष्बरसिताचा** घोडा येऊन **माहेजहाच्या** महालाखालीं खिडकीसमोर उभा राहिला.

एक्या दासीनें महालाखालीं घोडा उभा पाहून, असा तर्क केला कीं, कोणी आपल्या धनिनीकडे भेटावयास आलें असावें. पुनः वाटलें, छी ! भेटावयास आलें ह्मणावें' तर घोडा एकटा कां ? एक तरी नौकर किंवा खिजमतगार असता, घोडा तर मोठा तेजस्वी आणि कोण्या तरी श्रीमंताचा असावा असें वाटतें. शिवाय याच्या मस्तकावरही कांहीं लिहिलें आहे. परंतु तें मला वाचतां येत नाहीं. तर कसेंही असो; सरकारांस जाऊन सांगावें हें बरें. असें ह्मणून धांवत धांवत महालांत जाऊन ह्मणते, बाईसाहेब उठा उठा लवकर. आपल्या महालाखालीं कोण उभा आहे, हें एकदां खिडकी उघडून पहा बरें " असें तें घाईचें व घाबरल्यासारखें बोलणें ऐकून **माहेजहानें** पलंगाखालीं उडी मारली, व जलद खिडकीजवळ येऊन पाहिलें:—

तो सफेत रंगाचा खुपसुरत घोडा; वर जरजरी जीन, गळयांत मोत्यांच्या व मोहरांच्या माळा, पायांत पैंजण, मस्तकावर तुरा, अंगानें उंचट असून तेज केवळ सांडतें आहे, असें पहातांच चपापून ती मनांत म्हणते, काय आश्चर्य हें ! ! हा घोडा येथें एकटा कसा आला ? आणि त्याचा धनी कोठें आहे, मीं तर पक्कें ओळखिलें कीं, कांहीं दिवसांपूर्वीं हें अश्वरत्न माझ्याच मंदिरामागें अश्वशाळेंत माझे कांहीं खाजगी अश्व आहेत त्यांत होतें; परंतु आज दोन तीन वर्षांपूर्वीं माझ्या बापानें आमच्या प्रदेशाचा जो बादशहा **अख्तरशहा**, ह्याचा स्नेह संपादन व्हावा व आपल्या कन्येस तें स्थळ मिळावें, अशा हेतूनें दोन अपूर्व वस्तु नजराणा पाठविल्या होत्या त्यांपैकींच हा एक अमोल्य अरेबियन घोडा; व दुसरें—" सूर्यप्रकाशनी " या नांवाची एक मोठ्या किंमतीची कांच असते कीं, जेणेंकरून रात्रीस कितीही अंधार असला, तरी ती कांच डोळ्यास लावून पाहिलें असतां दिवसाप्रमाणें स्वच्छ दिसावें, अशा कांचेच्या दोन लहान डोळ्यास लावण्यासारख्या दुर्बिणी. अशा दोन अपूर्व वस्तू माझ्या बापाच्या संग्रहास होत्या; त्या बादहाकडे पाठवून त्याचा स्नेह संपादन केला; व त्याप्रमाणें आज दोन तीन वर्षें माझ्या बापाचा व **अख्तरशहा**चा स्नेह चालून शेवट त्यानें बापास मजविषयीं रुकार दिला आणि हल्लीं

लग्नाकरितां आपलें शहर सोडून ते इकडे येण्यास मार्गस्थ झाले. येथपर्यंत मला खबर आहे. असें असतां हा घोडा एकटा येथें कसा आला ? " **माहेजहा** असा विचार करीत आहे, इतक्यांत तिची दृष्टि त्याच्या मस्तकावर कांहीं लिहिलें होतें, तिकडे गेली. तेव्हां तें वाचण्यासाठी आपण खालीं जाऊन घोड्यास वाड्यांत आणविलें आणि त्याचे मस्तकावरील मजकूर वाचते—" हा घोडा ह्या देशाचा जो **अखूतरशहा** नामें बादशहा त्याचा पुत्र **किश्वरसिता** ह्याचा आहे. परमेश्वरमर्जीनें मार्गात जो आह्मांवर गहजब गुदरला, त्याचा संदेश **मुनोवराबादेस** कळविण्याकरितां हा घोडा जासूद जात आहे, तर मार्गातील, शूर व इमानी सर्व लोकांस माझी हतभाग्य मनुष्याची इतकीच प्रार्थना आहे कीं, या जासुदास कोणी अडथळा करूं नये. " याप्रमाणें तिनें वाचलें; तेव्हां एकटा वारू येथपर्यंत कसा आला ह्याविषयीं तिची खात्री झाली. परंतु वरील मजकूर वाचून कांहीं तरी घात झाला असावा ह्यांत संशय नाहीं असें समजून, **माहेजहा** मोठ्या घोंटाळ्यांत पडली. तों तिची दृष्टि गळ्यांतील लखोट्यावर गेली. तेव्हां तो लखोटा फोडून वाचूं लागली.—" आपली तसबीर पाहिल्या दिवसापासून या **किश्वरसिताची** तब्यत बिघडलीच होती; परंतु बादशहानें माझ्या औषधाची तजवीज जलद योजून तें घेण्याकरितां बादशहासुद्धां आह्मी सर्व मंडळी तुमचे शहरीं येत होतों, तों मार्गांत एका मुक्कामीं शत्रूंनीं आह्मांवर भयंकर हल्ला केला व सर्व दाणादाण केली. हा प्रकार जरा आतां लिहिण्यास सवड नाहीं, तरी तो थोडक्यांत सांगणें भाग आहे. प्रसंगीं जेव्हां सर्वच मला नाहींसे झाले तेव्हां मींही आपल्या पिस्तुलाचा बार भरून या ठिकाणीं मरावें या बुद्धीनें तें गळ्याशीं लाविलें. तें सोडणार इतक्यांत तुझें स्मरण होऊन एकवार तुला पहाण्याची इच्छा माझ्या मनांत घोंटाळूं लागली; परंतु उपाय काय ? तें सारें मनांत ठेवणें प्राप्त झालें. निदान तुला ही हकीगत तरी कळवावी याकरतां जीव तळमळूं लागला; ह्मणून तुझ्या बापानें दिलेल्या दुर्बिणीनें न्याहाळून चहूंकडेस पाहिलें, परंतु ह्या वेळेस शत्रूंचीं व आमचीं माणसें मिसळलीं आहेत, ह्मणून आपलें माणूस कोण ? हें लवकर ओळखतां येत नाहीं. एक घोडा मात्र जिवाचा आहे, असें पाहून खिशांतील माझी सोनेरी शाईची लहान कुलपाची दऊत व लेखणी काढून येथील ह्या विस्तीर्ण झाडाच्या पानावर लिहून मजकूर

कळवितों आहे. आतां तुला प्राणसखी ह्मणण्यास एकदां परवानगी दे; जरी तुझें माझें अद्यापि तसें नातें नाहीं, तरी निदानच्या वेळीं प्राणसखी अशी हांक मारण्याची इच्छा माझी तशीच राहिली. काय करावें ? कांहीं उपाय नाहीं. तूर्त माझा प्रिय बाप जो बादशहा तोच मेला अशा आरोळ्या माझ्या कानांवर पडत आहेत; तेव्हां आतां माझ्यानें धीर धरवत नाहीं. सबब हा लाखोटा घोड्याचे गळ्यांत बांधतों; हा घोडाही तुझ्या बापानेंच दिलेला आहे. तेव्हां हा **मुनोवराबादे**चा माहीतगार आहे. या अश्वानें माझ्या इकडे आल्यापासून माझी चाकरी इमानानें केली. ह्या अरेबियन विश्वासू घोड्याचें शहाणपण माझ्यानें येथें वर्णन करवत नाहीं. असो; यांचेंही संरक्षण तूं करशीलच. पत्रावरून माझें लक्ष्य तुजकडे किती होतें, याविषयीं तुझी खात्री होईल. आतां चिरकालिक सुखी महालांत जाण्यास मीं परवानगी घेतों. या हतभाग्य **किश्वरास** तुजसारखें सुंदर रत्न कोठून मिळणार ? तुझ्या कोमल कराचा स्पर्श होणें माझे प्रारब्धीं नाहीं. असो. परमेश्वरसत्तेपुढें उपाय नाहीं. कळावें. आपली इच्छा तशीच राहून स्वर्गीं जाणारा **किश्वरासिता.**

असें पत्र वाचतांच **माहेजहा**ला धाडकन् एकदम मूर्च्छना आली आणि खालीं पडली. डोळ्यांतून अश्रुधारा चालून सर्वांगास दरारून घाम आला आणि बेसावध झाली. अशी अवस्था झाल्याबरोबर जवळील सर्व दासी घाबऱ्या होऊन धांवत आल्या, आणि एकीनें तिचें मस्तक मांडीवर घेऊन दुसरीनें मैलागिरी चंदनाचें व गुलाबपाण्याचें अंगावर सिंचन केलें. कोणी वारा घालिताहेत, कोणी काय काय झालें ह्मणून थरथरा कांपताहेत, कैक राजास बातमी सांगावयास गेल्या. वाड्यांत ही बातमी समजल्याबरोबर मग काय विचारावें, **मुनोवरशहा**चें देहभान नाहींसें होऊन प्रधानासह मंडळी **माहेजहा**च्या महालीं आली. **जिनत्अरा** कन्येस मांडीवर घेऊन छाती बडवूं लागली. एकदम कन्येची दशा अशी कां झाली ह्मणून **जिनत्अरा** व **मुनोवरशहा** हीं घाबरीं झालीं, व त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, इतक्यांत एका दासीनें तें पत्र व तो घोडा हातीं धरून आणून राजापुढें उभा केला आणि पत्र स्वाधीन करून झालेली हकीगत सांगितली. **मुनोवरशहा**नें तें पत्र वाचल्यावर **माहेजहा**च्या दुःखाचें कारण सर्वांस माहित झालें. तेव्हां आनंदाच्या समुद्रांत

दुःखरूप नदीचा संगम होऊन तिच्या प्रवाहानें सर्व शहर भिजून गेलें. लहानापासून मोठ्यापर्यंत सर्वांस **माहेजहाच्या** दुःखाचा वांटा सारखाच मिळाला. यापूर्वीं सर्व शहरांत आनंदमय वायूची जी सुखदायक हवा भरून राहिली होती, ती सर्व नाहींशी होऊन चोहींकडे दुःखोजीपंतानें आपला अंमल बजावून टाकला.

याप्रमाणें सर्व शहरची शोभा एकदम नाहींशी होऊन घरोघरीं लोक हळहळ करूं लागले. राजानें मोठ्या प्रयासानें **माहेजहास** थोडी सावध केली. तेव्हां तिनें किंचित् डोळे उघडून पाहिलें. आणि आपले प्रियकर बापाचे कंठास मिठी मारून हळूच शब्द काढले:—" प्राणसख्या, **किश्वरा**; या दीन दासीविषयीं एकदां आपण जो रुकार दिलांत, तो मोडून व मला टाकून आपणास एकटेंच चिरकालिक सुखकारक सदनीं जाण्यास रुचलें काय ? ही चकोरपक्षीण आपल्या मुखचंद्रोदयाची मार्गप्रतीक्षा करीत बसली असतां दुःखरूपी वर्तमान-अभ्र येऊन गर्द अंधकार केला. या अंधारांत मज अनाथास मार्ग कोण दाखवील ? मीं जन्मपर्यंत आतां या अंधारांतच दिवस काढावे काय ? अहो, एकवार आपला मुखचंद्र दाखवून या चकोरपक्षिणीचें शांतवन करा, माझे पंचप्राण आपल्या भेटीवांचून व्याकूल होत आहेत, तर आपण पुढें जाऊन माझी मैत्रीण जी आपली इच्छा मजकरतां मागें ठेविली आहे, तिचे बरोबर मी आपल्या भेटीस येतें. " असें ह्मणून तिची खेळावयाची लहान कट्यार पलीकडेसच पडली होती, ती घेऊन आपले उरांत खुपसणार इतक्यांत **मुनोवरशहा** जवळ होता त्यानें ती हिसकावून घेतली, आणि कन्येचें शांतवन केलें.

याप्रमाणें **मुनोवराबाद** शहरीं दुःखाचा गहजब गुदरला आहे, तों बादशहाकडील कांहीं लोक दंग्यांतून पळाले होते, तेही फिरत फिरत **मुनोवराबाद** शहरीं येऊन पोहोंचले. त्यांत बादशहाचा मुख्य वजीरही होता. त्यानें **मुनोवरशहा**ची भेट घेऊन मार्गांत झालेलें सर्व वृत्त निवेदन केलें. नंतर **मुनोवरशहा**नें आलेल्या लोकांची बरदास्त ठेऊन आपण पुष्कळ प्रकारें कन्येचें समाधान केलें व दुसरे दिवशीं वजिरास एकांतीं बोलावून प्रश्न केला कीं, " आपले सरकार **अख्तरशहा**, त्याचे पदरीं आपल्यासारखे शूर व शहाणे लोक असतां व लक्षावधी फौज असतांही हा असा प्रसंग येण्याचें कारण काय ? आणि असा एकाएकीं घाला घालणारा शत्रु तरी

कोण असावा ? तसेंच, इतक्या गर्दींत बादशहाची व **किश्वरसिताची** स्थिति खरोखर काय झाली ? हा प्रकार आरंभापासून आपणास विदित असेल; तो कृपा करून सांगावा. असें ह्मणतांच वजीर ह्मणाला:— " महाराज, काय तो प्रसंग सांगावा ! त्याची आठवण झाली, ह्मणजे थरारून अंगावर कांटा येतो. तसा प्रसंग वैऱ्यावरही नसावा. अशा गर्दींतून बचावून आपल्या चरणाजवळ येऊन पोहोंचलों, ही मोठी आश्चर्याची गोष्ट. मी जगेन आणि हा दिवस दृष्टीस पडेल, असा भरंवसा नव्हता; परंतु ईश्वरकृपेनें आह्मी कांहीं असामी बचावून आपल्याजवळ आश्रयाकरितां आलों. आतां आपण ' शत्रु कोण ' ह्मणून विचारिलें. तर महाराज मी त्या सपाट्यांतून निभावल्यावर फकिराच्या वेषानें पुनः **अश्रताबाद** शहरीं परत गेलों. तों तेथें तर त्या शत्रूंनीं शहरांतील लोकांस फारच दुःख दिलें होतें; व तेथील लोकांची धुळधाणी केली, ती पाहून मला फारच वाईट वाटलें; परंतु उपाय काय ? सत्तेपुढें शहाणपण कोठें चालणार ! असो मीं तेथें गेल्यावर फकिराच्या वेषानें दोन तीन दिवस सर्व शहरांत फिरून तेथलि सर्व हालहवाल पाहिली. नंतर तेथें उतरलेल्या शत्रूच्या लष्करांत मीं आपला गरीब भिकाऱ्याच्या नात्यानें प्रवेश केला. पुढें त्या छावणींत हिंडतां हिंडतां नेहमींचा जो विश्वासूक, शूर, म्हातारा व आमच्या प्रांतींतील जमादार तेथें उतरला होता त्याची माझी नजरानजर झाली, आणि जरी मी फकीर बनलों होतों, तरी त्या इमानी मनुष्यानें मला ओळखलें. मी दूर उभा होतों, तरी त्यानें मला उघड रीतीनें हांक मारली. तो ह्मणाला.—

" फकीरबाबा, इदर आव, इदर आव, ये जरा आधी रोटी हमारे पास रहींहै ये लेव. " अशी त्यानें हांक मारल्याबरोबर मीं त्यास ह्मणालों.— " आतां हूं, धर्मीदाता आता हूं " असें ह्मणून त्याजजवळ गेलों. नंतर त्यानें माझ्या पदरांत अर्धी भाकरी टाकली, व त्यसरसाच एक लाखोटा टाकला. तो घेऊन मीं पुनः पूर्वींप्रमाणें छावणींत हिंडून, नंतर दरग्यांत रोटी खाण्याकरितां गेलों. तेथें गेल्याबरोबर तें पत्र मीं वाचून पाहिलें. त्यांत लिहिलें होतें कीं, " झालेल्या प्रसंगांत ईश्वरेच्छेनें आपले सरकार जेव्हां शत्रूच्या स्वाधीन झाले तेव्हां त्यांचे जवळ जिवाचें माणूस कोणी नव्हतें. एकदम अशी घांदल झाल्यानें सरकारचा धीर अगदीं खचून गेला,

आणि आतां कसें करावें ? काय करावें ? आपण तर राणीसुद्धां शत्रूचे स्वाधीन झालों, अशा वेळीं वजीर वगैरे मंडळी कोठें आहेत ? हा शत्रू कोण ? एकदम त्यानें हल्ला केला असें त्याच्या आमच्यांत वैमनस्य तरी कोणतें ? आतां येथून सुटका कोण करील ? तें सारें असो. पण माझा किश्वरसिता कोठें आहे, ह्याचा कांहींच पत्ता नाहीं. किश्वराचा शोध कसा लागतो ? त्यास कोणी दुष्टांनीं काय दुःख दिलें असेल न कळे. माझा एकुलता एक आवडता पंचप्राण मला पुनः या गर्दींत आतां भेटेल काय ? अरे, या सर्व गर्दींत मायेचें माणूस मजजवळ कोणीच नाहीं काय ? अरे, जो मी सार्वभौम राजा, ज्या मजसभोंवतीं हजारों लोक नेहमीं हांजी हांजी करणार, तों मी आज दीनमुखानें सर्वांची विनंति करितों आहे कीं, माझ्या किश्वराचा कोणी समाचार सांगा. तो कोठें आहे; ह्याचा तपास करा. मी इतका आक्रोश करीत आहें परंतु कोणीच ऐकत नाहीं. अरेरे ! काय प्रसंग हा ! ! ज्या किश्वरास मीं कधीं दृष्टि-आड केला नाहीं, आणि ज्याकरितां कोट्यावधि द्रव्याचा व्यय केला, व साक्षात् फकिरानें मला प्रासादिक ह्मणून पुत्र दिला, तो आज ह्या प्रसंगीं मला अंतरलाना ? आतां काय करूं ? एकवार किश्वरास पाहिल्यावांचून जीव रहात नाहीं. असें ह्मणून राणीसह सरकार शोकार्णवांत पडले. असें असतां परमेश्वरकृपेनें त्या वेळेस सरकारच्या पहाऱ्यावर मलाच त्या शत्रूंनीं ठेविलें होतें. कारण, त्यांस असें वाटलें कीं, हा कोणी आपल्याच जमादारांपैकीं जमादार आहे, असें समजून मला तेथें ठेविलें. ही वरील सरकारची करुणावाणी ऐकून, माझा त्या वेळेस अगदीं नाइलाज असतांही मीं निश्चय केला कीं, प्राण गेला तरी चिंता नाहीं; परंतु ह्या वेळेस स्वामिभक्तीच्या परीक्षेची वेळ आहे. असें समजून सरकारचे पुढें जाऊन मीं मुजरा केला, आणि म्हणालों, " सरकार, मीं आपला गुलाम ताबेदार सेवेस हजर आहें. काय आज्ञा असेल ती ह्या दासास सांगावी, हा दास जिवाकडेही न पाहतां आपला हुकूम बजावील, ह्यांत संशय नाहीं. " असे माझ्या तोंडचे शब्द बादशहानें ऐकतांच माझे तोंडाकडे पाहिलें. व त्या वेळेस सरकारास जो गहिंवर आला, तो माझ्यानें पत्रीं लिहिवत नाहीं. नंतर त्यांनीं मला एक पत्र देऊन किष्वराच्या तपासास पाठविलें. त्या पत्रांतलि सारांश इतकाच कीं, " झाल्या गोष्टीस उपाय नाहीं, तूर्त मी तुझे आईसुद्धां कैदेंत आहें.

तसेंच, सर्वांच्या पायांत बेड्याही आहेत. व असा प्रसंग एकाएकीं येण्याचें कारण समजलें नाहीं. आमची अशी दशा झाली म्हणून तूं अन्य विचार न करितां तुझा आजा जो **सुलेमानशहा** त्याजकडे जलदी जाऊन आमची सुटका करीव."

याप्रमाणें लिहिलेलें पत्र देऊन **मुनोवरशहा** यानें पाठविलेली दुर्बिण आपल्या डोळ्याची काढून बादशहानें माझ्या स्वाधीन केली. ती डोळ्यास लावून व तें पत्र लपवून घेऊन, मी छोटे सरकारचा शोध करीत करीत त्या सर्व धांदलींत पुष्कळच हिंडलों परंतु कोठें शोध लागला नाहीं. शेवटी ते आसपास कोठें असतील असे समजून झाडींत फिरत असतां, एकदम दुरून माझे नजरेस छोटे सरकार पडले, परंतु ते तर पिस्तुलास बार भरून घेऊन तें गळ्याशीं लावून, उडवून घेण्याच्या बेतांत होते. तेव्हां माझा घोडा जरी त्यांजपासून बराच जवळ होता तरी तेवढेंच अंतर त्याच्यानें तोडवणार नाहीं असें पाहून मीं तथूनच आरोळी टोकली कीं, " जरा धीर धरो महाराज, धीर धरो." अशी आरोळी मारीतच मीं घोड्यास टांच मारून जवळ जाऊन पोहोंचलों. नंतर सलाम करून पत्र स्वाधीन केलें. तें पत्र वाचून छोटे सरकार आपल्या आज्याकडे जाण्यास चालते झाले. आणि मीं नेहमीं शत्रूंच्या तर्फेचा खरा; परंतु बादशहाचे जवळ त्यांचे प्राणरक्षण करण्याकरितां राहिलों आहें. आतां हा शत्रु कोण ह्याचा खुलासा सांगतों. आपले सरकारचे कनिष्ठ बंधु **शाहेजमान** म्हणून सर्वांस माहितच आहेत. हे लहानपणापासून दुरावृत्त आचरणानें वागून **आश्रताबाद** शहरांतील लोकांस व सर्व प्रजेस यांनीं जर्जर करून सोडलें. त्या दुराचरणामुळें आपल्या सरकारचा व **शाहेजमान**चा आपसांत पुष्कळच विरोध वाढला. पुढें बराच द्वेष उत्पन्न होऊन आपल्या सरकारांनीं **शाहेजमाना**स एकदम कैद करून **फरुख** शहरीं नेऊन ठेविलें होतें, व तेथें त्यांचे स्वाधीन तो मुलूखही केला होता. आणि त्या उत्पन्नांतून त्यांचा खर्चवेंच चालत असे. आणि असें जरी झालें होतें, तरी **शाहेजमानास** कोणत्याही गोष्टीची कमताई नसे; तरी त्यास तें सर्व विषतुल्य वाटत असून त्याची दृष्टि गादीवर बसण्याकडे होती. त्याचे मनांत असें वाटत होतें कीं, बादशहास कांहींच पुढें पुत्रसंतान नाहीं. तेव्हां त्याचेमागें सर्व आपलेंच आहे, अशी त्यानें आपल्या मनाची समजूत करून, त्या थोड्या मुलखाचे उत्पन्नांत तो

दिवस काढीत होता. परंतु त्याचे मनांतील विचार परमेश्वरास न आवडून त्यानें बादशहास ( **किश्वरासिता** ) रूपगुणसंपन्न पुत्र दिला तेव्हां मग **शाहेजमान**ची कंबर खचून त्या दिवसापासून तो यांचा नाश करण्याची संधि पहात होता; परंतु ह्या वेळेपर्यंत त्यास तें साधलें नव्हतें. शेवटीं आपण लग्नास गेला तेव्हां मार्गांत त्यानें हा सूड उगविला आहे.

वजीरसाहेब, याप्रमाणें हकीगत झाली; आतां पुढें उपाय करणें हें आपलें काम आहे. मी तर त्या दिवसापासून आपल्या जिवाचा कोणी माणूस पहात होतों, कीं जेणेंकरून हें वर्तमान **मुनोवराबाद** शहरीं पोहोंचतें होऊन बादशहाच्या मुक्ततेविषयीं कांहीं विचार होईल. शेवटीं आपणाला काल रोजीं छावणींत हिंडतांना पाहिलें, तेव्हां आपण वजीरच ह्मणून पक्कें समजलें. आणि ताबडतोब मीं हें पत्र लिहून दिलें. हें पत्र वाचून, सर्व मजकूर **मुनोवराबाद** शहरीं कळवून कांहीं तरी इलाज करा. आतां बादशहाविषयीं आपण अगदीं काळजी करूं नये. त्यांचे प्राणाचें संरक्षण करणें मजकडे लागलें. तूर्त मला **किश्वरासिता**विषयीं मात्र थोडी काळजी आहे; परंतु ते सुखरूप आपल्या आज्याकडेस पोहोंचोत अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. कळावें. वजीरसाहेब, मीं आपल्या सेवकधर्माप्रमाणें कामगिरी बजाविली. तसदी माफ करा."

वजीर म्हणतो–**मुनोवरशहा** महाराज, याप्रमाणें हकीगत झाली हें त्या जमादाराचें पत्र पहा. **अख्तरशहाचे** अथवा **किश्वरासिताचे** प्राणास कांहीं धक्का नाहीं, काळजी करूं नये. फक्त त्यास सोडविण्याचा मात्र विचार केला पाहिजे. याप्रमाणें वजिरानें खरी हकीगत सांगून त्या जमादाराचें पत्रही दाखविलें. आपण मात्र **मुनोवरशहा** व **माहेजहा** वगैरे सर्वांची बादशहा व **किश्वरासिता** मेला नाहीं, अशी खात्री झाली, तेव्हां थोडें दुःखांत सुख झालें. आणि आतां झालेल्या कृत्यांस कांहीं उपाय करावा. ह्याचा विचार करीत **मुनोवरशहा** व वजीर वगैरे सर्व मंडळी बसली.

प्रिय वाचक हो, ह्याप्रमाणें **मुनोवराबाद**ची व **अश्रताबाद**ची हकीगत सांगितली आतां थोडें **किश्वरासिता**कडे लक्ष्य देऊं या.

**किश्वरासिता** उत्तर दिशेस चालता झाल्यावर मार्गांत घोडा नाहीं, ह्मणून तो पायांनींच चालत आहे. तशांत भर उन्हाळ्याचे दिवस; वैशाख मास पूर्ण भरीस आलेला; आणि तें रान शुद्ध सपाटीचें असून दोन दोन

कोशपर्यंत एखादें झाड किंवा पाणी पिण्यास सुद्धां मिळत नसे. वाट मोठी बिकट असून खडकाळ होती. अशा रस्त्यानें **किश्वरासिता** एकटाच चालला आहे रस्त्यांत कोणीं एकही मनुष्य सोबतीस मिळेना; एखादा पक्षी सुद्धां दृष्टीस पडेना अशी दशा झाली. उत्तर दिशेस **सुलेमानशहाच्या** राज्याकडे जाण्यास कोणीकडून रस्ता आहे हेंही **किश्वरसितास** माहीत नाहीं. तेव्हां तो तसाच सपाट मैदानांतून जातां जातां दोनप्रहरपर्यंत सुमारें दोन तीन कोश चालून गेला; परंतु कोठेंच छाया मिळेना. तशांत **किश्वराचे** प्राण तृषेनें व्याकुळ झाले. वरून ऊन लागून तो कोमल गौरवर्णी चेहरा गुलाबाचे फुलाप्रमाणें सुकून गेला. तोंडास कोरड पडली, क्षुधेनें पोटांत पेट घेतला, तेव्हां मग काय विचारावें ! त्यास अगदीं ग्लानि येऊन तो भुमीवर पडला. त्याच्यानें पुढें एकही पाऊल टाकवेना. परंतु पायाखालील भूमि विस्तवाप्रमाणें लाल तापली होती, ह्मणून त्याचे अंगाची आग होऊन तो तसाच उठून बसला. खालील जमीन तापलेली, वरून उन्हाचा तडाका, छाया कोठेंच नाहीं, पाणी तर डोळ्यांतल्या खेरीज मिळण्याचा संभव नाहीं, तेव्हां मग काय विचारावें ! **किश्वराच्या** डोळ्यांतून पाण्याच्या धारा लोटून तो धाय धाय रडूं लागला; परंतु उपाय काय ! तेथें ह्याचें शांतवन करतो कोण ? **किश्वर** करुणापर शब्दांनीं आपणाशींच ह्मणूं लागला कीं. " परमेश्वरा, असा कोणता अपराध तरी मीं केला, ह्मणून हा दंड मला दिलास ? अरे पूर्वीं जन्मल्याबरोबर जर ही स्थिति दिली असतीस, तर आतां इतके श्रम मला वाटले नसते. हे खुदावंत, ज्या **किश्वरास** दारचें ऊन कसें तें माहीत नव्हतें, त्यास आतां बारा बारा कोश तापलेल्या जमिनींतून कसें चालवेल ? ज्याला प्रहरांतून तीनदां खाण्यापिण्याची टापटीप होती, त्यास आतां तीन तीन दिवस उपास कसे करवतील ? अरेरे ! आतां या दुखांतून मीं पार पडून आपल्या बाबास बंधमुक्त करीन काय ! छीः ! आतां पुनः असा प्रकार घडणें कठिण. असो. परमेश्वरा, तुझी मर्जी. असा दुःखकारक प्रसंग वैऱ्यावरही येऊं नये. व कोणीही आपल्या असलेल्या संपत्तीचा गर्व करून दुसऱ्याचे दुःखदस्थितीची निंदा करूं नये. कारण, प्रत्येकास सुखदुःख समान लागलें आहे, असें समजावें. मीच पहा, सार्वभौम राजाचा मुलगा असतां कोण प्रसंग मजवर आहे. हुकूम करण्याचा अवकाश तों हजारों छाया व अबदागिरी

मजवर धरीत होते, व पाणी पिण्यास मागितलें कीं, हजारो दासी हातांत रत्नखचित झाऱ्या झेऊन उभ्याच ! भूक लागली म्हटलें कीं, सुवर्णमय ताटें पंच पक्कान्नांनीं भरून तयार ! निद्रा आली ह्मटल्याबरोबर ज्यावर परांच्या गाद्यांचा गुढग्या इतका बिछाना, असा पुष्पशय्येसहित छप्परपलंग तब्येत लागेल त्या ठिकाणीं तयार, त्या माझ्यानें आतां हें दुःख कसें काढवेल ? "

असा शोक करीत **किश्वरासिता** जात असतां दोन तीन दिवस त्याचे फारच हाल झाले. तिसरे दिवशीं दोन प्रहरीं त्यानें विचार केला कीं, आतां हें दुःख सोसवत नाहीं, हा प्राण जाईल तर बरें. असें ह्मणून जीव देण्यास सिद्ध झाला. तशा संधीस एक वडाचें झाड दुरून त्याचे दृष्टीस पडलें, तें पाहतांच धांवत धांवत तेथपर्यंत गेला. तेथें गेल्यावर किंचित् छाया असल्यामुळें **किश्वरासितास** अंमळ बरें वाटलें; परंतु त्यानें विचार केला कीं, " असे उपास काढीत प्राण कोठवर वांचणार आहे ? येथून पुढें दाट छाया लागून जागोजागीं पाण्याचे झरे आणि फलपुष्पानीं शृंगारलेले वृक्ष आढळून दुःखाचें शांतवन होईल, व पुढें माहितीचा रस्ता सांपडून **सुलेमानशहा**कडे सुखरूप पोंहोंचेन असा संभव दिसत नाहीं. तस्मात् आतां असा हा हतभाग्य देह जाण्यास योग्य नाहीं, " असें ह्मणून त्या वडाच्या झाडाच्या पारंब्या भूमीपर्यंत लोंबत होत्या त्यांचाच गळ्यास फांस लावून प्राण देण्याच्या बेतास सिद्ध झाला. इतक्यांत त्याला त्याच्या वृद्ध बादशहाचें स्मरण होऊन कंठ भरून आला आणि टपटप डोळ्यांतून पाण्याचे थेंब पडून तो आपणाशींच ह्मणतो.—" तूं असा प्राणत्याग केल्यावर त्या वृद्ध मातापितरांस दुःखांतून सोडविण्यास कोणरे झटेल ? ते तर तुझ्या विश्वासावर दिवस काढीत असतील; आणि त्यांस तरी तुजवांचून आशेचें मनुष्य कोण आहे ? तूं **सुलेमानशहा**कडे जाऊन त्यांची लौकर बंधमुक्तता करशील अशी ते तुझी मार्गप्रतीक्षा करीत असतील. तर आतां जीव देणें बरोबर नाहीं. मला कितीही दुःख झालें तरी मी मोकळा आहें; आणि ते परस्वाधीन आहेत. तस्मात् परस्वाधीनपणांत असून दुसरें कितीही सुख असलें तरी त्या दुःखासारखें दुःख नाहीं. यावरून मीं स्वतःसिद्ध आहें, तेव्हां सुखीच आहें असें समजलें पाहिजे. दुसरें, मीं असाच राहिलों तर हे दिवस निघून जातील ह्यांत संशय नाहीं. आणि कदाचित्

**माहेजहा**चीही भेट होईल. कारण, मीं मेलों असें जरी तिला कळलें तरी ती अन्य भ्रतार न करितां मरेपर्यंत माझें असेंच स्मरण करून झुरणीस लागेल. परंतु निंद्यकर्म तिच्या हातून होणार नाहीं. तर आपण दम सोडून आत्महत्या करणें हें योग्य नाहीं. परमेश्वरकृपेनें आनंदाचे दिवस दृष्टीस पडतील ह्यांत संशय नाहीं." असा विचार करून त्यानें गळ्याचा गळफांस सोडला, आणि गुडघे टेंकून ईश्वराची स्तुति केली कीं, "हे दीन-दयाळ प्रभो, या निराधारी **किश्बरास** तुजवांचून आतां कोणाचा आधार नाहीं. या दीनावर आतां एकदां कृपेचा वर्षाव कर. संपूर्ण पृथ्वीचें तूं कृपादृष्टीनें पालन करतोस, आणि हा **किश्बरच** तुला जड झाला काय ? आणि अन्नपाण्यावांचून अशा भर उन्हातान्हांत दीनमुखानें फिरतो आहे, त्याची तुला कांहींच दया नाहीं काय ? मजविषयींच मन कसें कठोर झालें ? त्वां आजपर्यंत सहस्त्रावधि भक्तांस संकटांतून मुक्त केलेंस, आणि ह्या **किश्बराचें** संकट तुला जड झालें काय ? मीं तर आतां तुझ्या भरंवशावर पुढें पाऊल टाकतों."

असें ह्मणून तसाच पुढें चालता झाला. जातां जातां आठ पंधरा दिवस असेच दुःखांत गेले. कोठें फळें मिळालीं तर पाणी नाहीं; पाणी मिळालें तर फळें नाहींत; अशाच रीतीनें दुःखांत त्याचे दिवस गेले. पुढें एके दिवशीं सकाळपासून **किश्बर** वाट चालत असतां दोन प्रहरपर्यंत त्याला कोठेंच छाया मिळाली नाहीं. ऊन मनस्वी लागून तो घाबरा झाला. तसेंच एक दोन दिवसांत त्यास खावयासही बरोबर मिळालें नव्हतें. यामुळें त्याला ग्लानी येऊन तो खालीं पडला; व सर्वांगावाटें पाण्याच्या धारा चालून तोंडास कोरड पडली. ह्या वेळीं **किश्बर** फारच घाबरा झाला. आणि ह्मणतो,—"परमेश्वरा, अझूनही कोठपर्यंत अंत पहाणार ? अरे, ह्या **किश्बरासिता**चा शेवट या दुःखांतच करणार काय ?" असें ह्मणून आसपास कोठें पाण्याचा थांग पाहूं लागला. इतक्यांत परमेश्वरकृपेनें दूर एका मैलावर निबिड गर्द झाडी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां कांहीं जिवांत-जीव आला, आणि अवसान नव्हतें तरी तसाच उठून तिकडे चालता झाला. हळूहळू तेथें पोहोंचल्यावर पाहातो, तों एकजात झाडी लागून गेली आहे. आंत प्रवेश केल्यावर पाहिलें तों जिकडे तिकडे बांधीव सडका असून सडकेचे दोहीं बाजूंस एकसारखे वृक्ष लागले आहेत.

चोहींकडे सुगंधमय वायूचा भपकार भरून गेला आहे. छाया मनस्वी दाट असून शेंकडो पाण्याचे पाट भरून इकडून तिकडे आणि तिकडून इकडे भरपूर वहाताहेत. रस्ते झाडून त्यावर पाणी शिंपडलें होतें. केळी, नारळी, पोफळी, जांभळी ह्यांचे वृक्ष गगनचुंबित पसरले आहेत. आम्रवृक्ष आपल्या फलभारानें इतके लवले आहेत कीं, माणसानें निजून अमृतफळ ध्यावें. कित्येक झाडांस नुतकाच पाड लागून हिरवीं, पिंवळीं, शेंदरीं, अशीं पंचरंगीं अमृतफळें एकजात लटकल्यामुळें ती एक पहाण्यासारखी शोभा दिसत होती. हा सर्व प्रकार **किश्वरानें** पाहून तो फार खूष झाला, आणि मागें झालेल्या श्रमाचा परिहार होऊन त्याचा देह गारीगार झाला. तेथें असलेलीं नानातऱ्हेचीं फळें त्यानें यथेच्छ खाल्लीं व सुंदर वहातें पाणी पिऊन शांत झाला. नंतर अंमळ विसावा घेऊन परमेश्वराची प्रार्थना करून ह्मणाला, “ हे खुदावंत, तुझी लीला अगाध आहे. पहा, **अश्वताबाद** सोडल्यापासून या हतभाग्यास असें सुख कधींच झालें नव्हतें. अरे या पामराकरितां अशा या जंगलांत हें इंद्राचें नंदनवनच आणलेंस काय ? शाबास ! ” तुझ्या मनांत आल्यावर तूं काय करणार नाहींस ? असें म्हणून **किश्वरसितानें** विचार केला कीं, आणखीही या बागेंत काय काय चमत्कार आहेत ते पहावें ह्मणून पुढें जाऊं लागला.

पुढें जाऊन पाहतों तों अपूर्व बागशाई लागून राहिली आहे. दोहों बाजूंस गुलाबाचे ताटवे फुललेले असून जाई, जुई, पाच, मरवा, मोगरा, मोतिया, चंपक, केतकी, पारिजातक, मैलागिरी चंदन, अशीं सुवासिक फुलांचीं लक्षावधीं झाडें व वेल लागून वरतीं दाट पुष्पें लागलेलीं होतीं, तेणेंकरून आसमंतांत् भागीं कित्येक मैलपर्यंत सुवास भरून जाऊन अष्ट दिशा दर्वळून गेल्या आहेत. मधून मधून सहस्त्रावधि मार्ग संगमरवरी दगडाचे बांधून त्यांचे दोहों बाजूंस एकजात सुरूचीं झाडें ओळीनेंच लाविलीं होतीं. सुवासिक फुलझाडांचे प्रत्येक बनाभोंवतीं मोठमोठे वृक्ष व नानातऱ्हेचीं फळझाडें फलभारानें लवून गेलीं होतीं. पपनस, अननस, डाळिंबी, जांभळी, पेरू, रामफळी, सिताफळी, नारिंगी, साखरलिंबें ह्यांचीं शेंकडों झाडें लागून गेलीं आहेत. ठिकठिकाणीं अष्टपैलू बांधीव कारंज्यांतून सहस्त्रधारी कारंजीं फारच उंच उडत असल्याकारणानें त्यांचे

तुषार अंगावर येत आहेत. या कारणानें तो उष्णकाळ असतांही वर्षाकाळाचा भास होत असे. जलतुषार पाहून मयूर व लांडोर आनंदांत येउन पिसें वर करून नाचत आहेत. राघू, मैना, साळुंक्या, कोकिळा, यांच्या सुस्वर गाण्याचे शब्द कर्णास आल्हाद देत आहेत. शिवाय सहस्त्रावधि पक्ष्यांचे किलबिल किलबिल शब्द आनंदानें चालू आहेत. असा थाट पाहून **किश्वरासिता** अगदीं गर्क होऊन गेला. आणि तसाच पहात पहात पुढें गेला, तों बागेच्या मध्यंतरीं एक औरस चौरस उत्कृष्ट चंदनी लांकडाचा महाल शोभत होता. तो पुष्कळ उंच होता. जागोजागीं सुंदर गच्च्या काढून त्यावर ठिकठिकाणीं छपरीपलंग ठेविले होते. मंदिराच्या खिडक्यांतून गजनींचे व कोठें वाळ्याचे पडदे सोडले आहेत. थेट बंगल्याचे समोर एक मोठें उत्कृष्ट सुशोभित असें अष्टपैलु कारंजें पाण्यानें अगदीं कांठोकांठ भरलें असून, त्यामध्यें सुंदर पंचरंगीं कमळें उगवलीं होतीं; आणि भ्रमर त्यावर गुंजारव करीत आहेत. अशी अपूर्व शोभा पाहून **किश्वरासिता** आपल्याशीं ह्मणाला कीं, “ वाहवा ! किती सुंदर हें रमणीय स्थान आहे ! असें जन्मांत आपल्या पहाण्यांत नाहीं. फार तर काय, सर्व पृथ्वींतही असें सुखदायक स्थळ मिळणें दुर्मिळ. कदाचित् स्वर्गलोकींहून इंद्रादिक देवही श्रम झाले असतां ह्या जागीं विश्रांतीस येत असतील असें वाटतें. मला तर झालेल्या दुःखाचा विसर होऊन या जाग्यांतून क्षणभरही हालावेसें वाटत नाहीं, पण तें सारें असो, हें ठिकाण तरी कोणाचें असावें ? माणसाचें ह्मणावें तर हा संपत्तीचा प्रकार पाहून माझी छातीच दडपली; तेंव्हां हें ऐश्वर्य मानवाचें नसावें. कोणी तरी पिशाच अथवा गंधर्व किंवा यक्ष, राक्षस अगर कोणी तरी स्वर्गलोकींचा देव ह्या स्थळाचा मालक असावा असें वाटतें. तेंव्हां आतां पुढें जाऊन फायदा नाहीं; गेलों तर यथास्थित मार मात्र खावा सागेल, ह्यांत संशय नाहीं. आतां असें करावें कीं, आजची रात्र येथेंच दडून बसून नंतर उजाडल्यावर पुढें चालतें व्हावें. ” असा विचार करून **किश्वरासिता** तेथें एका विस्तीर्ण झाडाचे आडबाजूस लपून राहिला.

संध्याकाळपर्यंत तेथेंच बसून रात्रीं जेव्हां शुभ्र चांदणें पडलें, तेव्हां राजपुत्र उठून चोहोंकडेस त्या बागेंत हिंडूं लागला. आणि पुन्हां थोडीशी क्षुधा लागली ह्मणून तेथील उंची फळफळावळ खाऊन त्या सुंदर कारं-

ज्याचें पाणी पिऊन फारच खूष झाला. तशांत चहूंकडून मंद मंद शीतल वायूची झुळूक अंगास लागून त्या दिवशीं राजपुत्रास परमावधीचें सुख झालें. असो. **किश्वरासिता** अंमळ इकडे तिकडे फिरून पुनः त्या झाडाखालीं जाऊन स्वस्थ निजला.

दोन प्रहर रात्रीचे सुमारास एकाएकीं असा चमत्कार झाला कीं, तेथील बंगल्यांतून सुस्वर मनोवेधक गाण्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. तसेंच, सतार, सारमंडळ, सारंगी, रुद्रविणा, जलतरंग वगैरे नानातऱ्हेच्या वाद्यांचा मंजुळ नाद श्रवणीं येऊं लागला. आणि त्यामध्यें गाणारणाचा आवाज तर कोकिलेप्रमाणें ऐकूं येऊं लागला. **किश्वरासितास** गाण्याची माहिती चांगली असल्यामुळें त्याचें मन तिकडे जाऊन ऐकण्यास ओढ घेऊं लागलें. परंतु मनांत विचार करितो कीं, " या अति उत्तम स्थळीं मी आज दुपारपासून आहें, परंतु येथें या बंगल्यांत किंवा बागेंत मनुष्याचा वास किंचित्‌ही आला नाहीं आणि आतां तर बंगल्यांत मोठा रंग होऊन राहिला आहे. तेव्हां हें काय ? स्वर्गलोकाहून कोणी गंधर्वकन्या सासुरवासामुळें रात्रौ चोरून ह्या ठिकाणीं करमणूकीस येतात कीं काय ? अथवा कोणी यक्षिणी किंवा राक्षसिणी आहेत कोण जाणे. कांहींच खात्री होत नाहीं; परंतु शब्द तर माणसासारखा येतो ह्यांत संशय नाहीं. कसेंही असो, एक वेळ आंत जाऊन पाहिल्यावांचून माझ्यानें रहावत नाहीं. कारण, जिचा कंठ इतका मधूर आहे तिचा चेहरा तरी किती सुरेख असेल ? अशा तरुण अप्सरातुल्य गाणारणीचा मुखचंद्रमा पाहिल्यावांचून या चकोरपक्ष्याचें शांतवन होणार नाहीं. " असें ह्मणून तेथून उठून नीट बंगल्याकडे जाऊं लागला. जों जों हा पुढें जाई तों तों वाळा, मरवा, पांच, बकुल, चंपक, मोतिया, ह्यांच्या सुवासांचे भपकारे ह्याचे घ्राणेंद्रियांत अधिकाधिक शिरूं लागले, आणि त्या महालांत तर जिकडे तिकडे हजारों हंड्या व झुंबरें चेतवून चकचकाट झाला आहे. तशांत सुस्वर वाद्यांतून उत्तर रागिणीचे आलाफ एकावर एक येऊन ह्याचे हृदयास दुभंग करीत आहेत. असा प्रकार **किश्वरासितानें** पाहून एकाएकीं आंत जाण्यास त्याला धैर्य होईना. नंतर आपल्याशींच ह्मणतो, " वेड्या **किश्वरा**, येथें कोण मालक रहातो ह्याचा पक्का शोध समजल्यावांचून हुकुमाशिवाय आंत जाणें हें आमच्यासारख्या सुज्ञास योग्य

नाहीं. " असें ह्मणून फिरला. इतक्यांत असा एक मंजूळ रागदारीचा आलाफ आंतून येऊन त्याचे श्रोत्रेंद्रियास लागला कीं, तेणेंकरून तो घायाळच झाला आणि ह्मणतो, काय होणें असेल तें होवो; परंतु तेथपर्यंत जाऊन पहावें. कारण, हें रमणीय स्थळ पाहून स्वर्गाहून रंभा तर गाण्यास आली नसेलना ? कोण जाणे. आंत जाऊन पाहिलें पाहिजे. असें ह्मणून त्यानें बंगल्यांत प्रवेश केला.

प्रथम दरवाजा ओलांडून आंत गेला, आणि मौज पहातो; ती काय सांगावी ! खालीं गुडघ्या इतकी उत्कृष्ट नरम बिछाईत घातली असून जागोजागीं खुरच्या, टेबलें मांडून ठेविलीं होतीं. किनखाबी कोचांवरून सफेत सरपोस टाकून ठिकठिकाणीं ते बसावयास ठेविले आहेत. मधून मधून राउन्ड टेबलावर चित्रविचित्र रुमाल टाकून सुंदर फळफळावळी मांडून ठेविल्या आहेत. तसेंच उंची मद्य व मेवामीठाई चांदीच्या व सोन्याच्या तबकांतून भरून ठेविली होती. रत्नखाचित झाऱ्या पूर्ण जलानें भरून ठेविल्या आहेत. जागोजागीं कमालखानी हार व मोतियाचे गजरे लटकून असल्यामुळें तें सर्व दालन सुवासमय होऊन गेलें आहे. असो. प्रथम दालनांतील थाट पाहून **किश्वरासिता** विस्मित झाला, व तसाच पुढें दुसरा दरवाजा ओलांडून दुसरें दालन पाहिलें त्याहींपेक्षां तें विशेष, असें **किश्वरासितानें** सात दरवाजे ओलांडून सात दालनें एकापेक्षां एक अशीं अप्रतिम पाहिलीं. नंतर सातव्या दालनाचे मधील चौकांत **किश्वरासिता** गेला, आणि तेथें वाट चुकून उगीच सर्व वाड्यांत वेड्यासारखा फिरूं लागला. ती सर्व शोभा व संपत्तीचा थाट पाहून **किश्वरासिताचा** धीर सुटला, आणि आपणाशींच ह्मणतो, " मीं मूर्खपणा करून या ठिकाणीं आलों, आतां येथून एकदां बाहेर निघालों, ह्मणजे मिळविली ; परंतु मीं ज्या रस्त्यानें आलों, ती वाट सापडत नाहीं. आतां काय करूं ? येथें तर रोषनाईमुळें माझे डोळे दिपून गेले. आणि सुवासांनीं तर अगदींच गुंगून जाऊन भ्रमिष्ट झालों. अरे हा चमत्कार तरी काय ? सर्व दरवाजे, दिवाणखाने व संगमरवरी पंचरंगी पाषाणाचे बांधीव मार्ग सारखेच दिसतात. मीं येतांना कोणत्या रस्त्यानें आलों बरें ? तशांत हा दरवाजा आहे ह्मणून पुढें जातों, तर तेथें थोडक्यांत भिंतीचा धक्का बसतो, आणि भिंत आहे ह्मणून पुढें चापसीत जातो, तर तेथें मार्ग असून एकदम खालीं पडतों. आतां काय करावें ? येथून पार पडणें कठीण.

अशा स्थितींत कोणी मला पाहिलें तर यथास्थित मार मात्र खावा लागेल." असे म्हणून इकडे तिकडे पाहूं लागला. तो त्याच चौकाचे मागें एक लहानसा चौक त्याचे दृष्टीस पडला. तेव्हां तो चौक पाहून **किश्वरसिता** आंत गेला, तों तेथून एक चंदनाचे लांकडाचा जिना एका खांबास वेटाळें देऊन वर गेला आहे असें त्यानें पाहिलें. त्यावर चित्रविचित्र रुजमा पसरून दोहों बाजूंस सुंदर चांदींचीं कटारें धरण्यास केलीं होतीं. असा तो सोपानमार्ग पाहून **किश्वरसितानें** विचार केला कीं, "आपण संकटांत सांपडलों खरे, मग आतां भिऊन काय होणार! थेट वरपर्यंत जाऊन एकवार त्या गंधर्वकन्येस अवलोकन तर करूं." असा विचार करून **किश्वरसिता** वर चढला. जातां जातां थेट जो मुख्य रंगमहाल होता, त्याचे दरवाज्याशीं गेला, व हळूच एके दरवाज्याचे आड उभा राहून आंतील सर्व प्रकार पाहूं लागला.

तेव्हां तेथील थाट तर फारच अप्रतिम होता. मांड्याइतकी परांची उंच व मौल्यवान् मश्रूची बिछाईत घातली असून मध्यभागीं रत्नखचित सिंहासन मखमालीनें मढविलेलें असून त्यावर गाद्या, पडगाद्या ठेविल्या होत्या. त्यावर मुख्य राणीसरकार बसलें असून दोहों बाजूंस सहस्त्रावधि मानकरणी स्त्रिया हातांत समसेर घेऊन व कांसोटा मारून एकसारख्या ओळींनेंच ऐटींत बसल्या होत्या, आणि पांच-पन्नास स्त्रिया हातांत सोन्याच्या काठ्या घेऊन "निगा रखो मेहरबान" असा पुकार करीत आहेत; तशांत शेंपन्नास बटकी मागें पुढें सरकारचे चाकरीस हजर आहेत. कोणी विडे घेऊन, कोणी पिकपात्रें घेऊन आणि कित्येक चौऱ्या घेऊन सरकाराला वारा घालीत उभ्या आहेत; कैक हातांत हार, गजरे व तुरे घेऊन उभे आहेत. तशींच, सहस्त्रावधि झुंबरें लागून त्यांतून सुवासिक मेणबत्त्या जळत होत्या. तशींच हजारों अगरबत्त्यांचीं झाडें प्रज्वलित झालीं आहेत. केशरकस्तूरीचा सुवास तर सर्व दालनांत भरून राहिला आहे. चोहींकडे मोत्यांच्या झालरी झळकत असून, भिंतींवरून सुंदर सोनेरी चित्रें खेळून राहिलीं आहेत. अशा वेळीं कोणी स्त्रिया सतार, कोणी सारमंडळ, जलतरंग, अशीं तऱ्हतऱ्हेचीं वाद्यें वाजवीत होत्या; आणि मुख्य राजकन्येनें हातांत उत्कृष्ट तऱ्हेचा तंबुरा घेऊन आपल्या सिंहासनावर बसून गायन करीत आहे. तिचें लावण्य: पाहून **किश्वरसिताच्या** काळजास

धक्का बसला. आणि म्हणतो,—" वाहवा ! वाहवा ! काय बहार आहे, अरे हिचा चेहरा पाहून माझे सर्व श्रमांचा परिहार झाला. आणि बरें झालें, दैवयोगानें प्रवास कपाळीं आला, नाहींतर असें स्त्रीरत्न मला पाहण्यास तरी मिळतें काय ? हिचें तारुण्य पाहून मीं अगदींच भांबावून गेलों. अरे, जिचे केश मोकळे सुटले असून पश्चात्‌भागीं जमिनीपर्यंत लोंबत आहेत; मला वाटतें ती आजच नाहली असावी. डोळे शुद्ध कमळें असून चातुर्य जलांत जसें काय गरगर फिरत आहेत. नासिक पाहून शुक रानोरान पळतील. गाल तर असे दिसत आहेत कीं, जणूं काय सर्व तारुण्याची टवटवी एकत्र भरली, म्हणून गौरवर्ण असतांही दोहींकडे लालीची झांक मारते आहे. कोण भाग्यवंत असेल, कीं ज्याचें मुख तेथें लागून त्यांतील मधुर अमृत त्याला प्राशन करितां येईल. संपूर्ण देह सोनचांफ्याप्रमाणें असून अंगानें सडपातळ आहे, सिंहकटी पाहून तर माझें काळीज करपूं लागलें. अरे किश्बरा, तसेंच न्याहाळून पहा, अंगांतील अंगिरी रंगाची काचोळी तटतटीत असून किती चमका मारीत आहे ! आणि एक हात वर केला म्हणजे पहा, पदराखालीं दोन चक्रवाक पक्षी कसे लपून बसले आहेत ते ! अरे, ज्याची पुण्याई सबळ असेल, तोच त्या चोरट्यास जाऊन धरील. किश्बरा, ती सफेत शालू काय ऐटदार नेसली आहे, तो पाहिलास काय ? अरे, स्त्रियांच्या रिवाजाप्रमाणें तिनें आपल्या पुढच्या शालूच्या चुण्या ज्या बसतांना मागें टाकिल्या आहेत, त्या मागील चुण्या जशा काय मोर आपलीं संपूर्ण पिसें आनंदाच्या वेळीं पसरतो आणि जसा शोभतो, तद्वत् ही पद्मिनी त्या मागील घोळानें शोभत आहे." ह्याप्रमाणें तो सर्व प्रकार पाहून किश्बरासिता पुनः आपणाशींच चपापुन म्हणतो, " अरे, मी सावध आहें कीं स्वप्नांत आहें ? कोण जाणें ! मला वाटतें मी स्वप्नांत आहें." कारण, अशी अपूर्व शोभा कोठें पृथ्वींत प्रत्यक्ष असते ? पुनः म्हणतो " छिः ! स्वप्न कसचें कोठें ?मी तर सावध आहें." असें म्हणून आपलें मनगट आपणच चावून घेतो, तों खराच चिमटा बसला. तेव्हां मी सावध आहें, अशी त्याच्या मनाची खात्री होऊन आपणाशींच म्हणतो, " आतां हें असें सुंदर रत्न आपणाशीं एकदां जर भाषण करील, तर किश्बरा, तुझ्या आनंदास पार नाहीं. तर मग आतां कसेंही असा,

आंत जाऊन एकवार हिचा मुखचंद्र पूर्ण पाहूं. कदाचित् प्रसंग आल्यास, हुकुमाशिवाय येथपर्यंत आल्याची तिजजवळ क्षमा मागूं ह्मणजे झालें." असा विचार करून किश्बरसिताची स्वारी थेट महालांत गेली, व ज्या मोठमोठ्या योग्यतेच्या मानकरणी स्त्रिया बसल्या होत्या तेथें हा विषयलंपट राजपुत्र जाऊन बसला.

हा आंत गेला तेव्हां यास कोणी 'या जा,' वगैरे कांहींच मान दिला नाहीं, आणि एक चकार शब्दही कोणी बोललें नाहीं. किश्बरसिता थेट जाऊन त्या सुंदर स्त्रियांत बसला. तो बिनदिक्कत मोठ्या डौलानें आंत बसला असें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें; परंतु सरकार समक्ष बसलें होतें म्हणून त्यांतून कोणीच पुसतपास केली नाहीं. त्या वेळेस त्या राजकन्येचें सर्व चित्त गायनांत असून ती मोठ्या आनंदांत होती इतक्यांत हा राजपुत्र पहातांच चपापून म्हणते, "हा मनुष्य कोण एकाएकीं येऊन बसला? कारण, आम्हीं सर्व स्त्रिया या ठिकाणीं स्वेच्छ आनंदांत निमग्न असतां, परवानगीशिवाय हा पुरुष थेट येथपर्यंत कसा आला? हें काय आश्चर्य! आणि आपला तर नेम असा आहे कीं, 'लग्न मुळींच करावयाचें नाहीं, आणि पुरुषाचें मुखही अवलोकन करावयाचें नाहीं. कदाचित् पुरुषमुख दृष्टीस पडलें, तर ताबडतोब त्यास ठार मारावें,' असा नियम आज पुष्कळ दिवस चालू आहे; आणि हा माझा दुर्धर पण बहुतेक पृथ्वीवर माहीत आहे. तथापि, माझ्या स्वरूपाची कीर्ति दिगंतरीं असल्यानें अशी जरी माझी अघोर प्रतिज्ञा आहे, तथापि शेंकडों राजे आजपर्यंत फक्त एकवार मला पहाण्याच्या इच्छेनें येथें येऊन या होमकुंडांत पडले. मीं शहरांत होतें त्या वेळीं दररोज या जबरदस्त प्रतिज्ञेमुळें माझे हातून फारच हत्या घडूं लागल्या. सबब मीं सर्व राज्य प्रधानाचे स्वाधीन करून येथें या जंगलांत बाग-बंगला बांधून राहिलें. तरी मला पहाण्याकरितां येथेंही येऊन मेले जीवांचे बळी देतातच! आतां काय करावें? माझा तर नाइलाज झाला. ज्या दिवशीं पुरुषाचें मुख दृष्टीस पडतें तो दिवस मोठा खडतर व अपशकुनी असें मी समजतें; तेव्हां आपल्या नियमाप्रणें आतां या गृहस्थाचा घात करावा हें योग्य."

असा तिनें विचार केला, व आपली समशेर घेऊन उठणार इतक्यांत तिची दृष्टि त्याच्या सुस्वरूप चेहऱ्यावर गेली, तेव्हां त्याचें रूप व भर-

ज्वानीचें सुंदर तेज पाहून, ह्या तरुणीचे मनांत कामोत्पत्ति झाली. कारण, एक तर ही उत्तम तरुण, तशांत राजकन्या; शिवाय त्या वेळीं फार आनंदांत असल्यानें, व त्या तरुण सुस्वरूप राजपुत्राचा चेहरा अवलोकन केल्यानें, तिच्या मनास पाझर सुटला, आणि प्रतिज्ञेस धक्का बसण्याची वेळ आली, तेव्हां तिला मोठा विचार पडला. आणि मनांत म्हणते, " कसें करावें ? या मदनतुल्य मूर्तीवर हात कसा धरवेल ? याला न मारावें तर आजपर्यंत चालविलेल्या व्रताचा भंग होतो. शिवाय अफगाणिस्थानच्या बादशहाची लेंक जी **मेहरवश**, हिनें आपली दुर्धर प्रतिज्ञा केली कीं, 'पुरुषाचें तोंड पहाणें नाहीं, मग लग्नाचें नांव कशाला ? आणि कदाचित् पुरुष दृष्टीस पडला, तर त्यास ठार करावें. " अशी जी प्रतिज्ञा ती आज उत्तम पुरुष दृष्टीस पडल्या कारणानें मोडली; अशी पुकार सर्व पृथ्वींत होईल. तेव्हां आतां काय करूं ? मला तर धीर धरवत नाहीं. असें पुरुषरत्न ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे, हें जर पूर्वी कळतें तर अशी घातक प्रतिज्ञा मीं कधीं केली नसती. आतां उपाय नाहीं, यास्तव याला मारावें; परंतु आपलें गाणें होईतोंपर्यंत याला स्तब्ध बसूं द्यावें, ह्मणजे तोंपर्यंत याचा मुखचंद्र आपणास पहाण्यास बरें पडेल. कारण, हा मेल्यावर असा प्राणी पुनः दृष्टीस पडणार नाहीं. पहा, आजपर्यंत सहस्रावधि राजे मीं आपल्या हातानें छाटले, परंतु असा खुपसुरत पुतळा माझ्या कधीं पाहण्यांत आला नाहीं, तेव्हां यास आणखी दोन घटका वांचूं द्यावा; नंतर आपली इच्छा त्यास पाहण्याची व त्याची मला पाहण्याची पुरी होईल आणि त्यास मारून आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेईन, व पुढें मीही त्याच्या मागून त्याजबरोबर यमसदनास जाईन; ह्मणजे अन्यजन्मीं तरी असा भर्ता मिळेल. "

असा विचार करून **मेहरवशेनें** गाण्यास पुनः आरंभ केला. त्याची अपूर्व मूर्ति हिच्या मनांत भरल्यामुळें तिला फारच आल्हाद होऊन त्या रात्रीं गाण्याला फारच रंग आला. दोन घटका गाणें होऊन नंतर **मेहरवश** आपल्या संकेचाप्रमाणें आपली समशेर हातांत घेऊन **किश्वरासिताजवळ** आली.

**किश्वरसिताचें** सर्व लक्ष तिच्या स्वरूपाकडे गुंतून गेल्यामुळें त्यास अगदीं देहभान नव्हतें. **मेहरवश** जवळ येत आहे असें पाहून **किश्वरसिताचे** हृदयांत हर्षानें व भीतीनें बरोबरच हल्ले केले. त्यास

असें वाटलें कीं, " ही पद्मिणी मला पाहून मजकडे येत आहे, तेव्हां ती माझें कुशल वृत्त विचारण्यास येत आहे. " परंतु पुनः विचार करितो कीं, " हिच्या मुद्रेवरून असा भास होतो कीं, हिला खचीत थोडा तरी रोष आला असावा, आणि हातांतील तरवारीवरून त्यास बळकट पुरावा होतो. तर काय होईल न कळे ! आपण तर बोलून चालून व्याघ्राचे जाळींत सांपडलों आहों. तेव्हां परमेश्वरकृपेनें परिणाम काय होईल तो खरा. "

असा विचार करितो आहे, इतक्यांत **मेहरवश** जवळ येऊन तिनें त्याचे मस्तकावरील भरजरी दुपेटा काढून फेंकून दिला. आणि एका हातानें मस्तक खालीं वांकवून दुसरे हातानें समशेर **किश्वरासिताच्या** मानेवर ठेविली, आणि ह्मणाली, " मूर्खा, माझी प्रतिज्ञा सर्वत्र लहानथोरांस व संपूर्ण राष्ट्रास माहित असतां, तूं आपल्या तारुण्याचे व संपत्तीचे गर्वानें मजसमोर येऊन मी आनंदांत असतां मला अपशकुन केलास काय ? तर त्याचा आतां दंड घेण्यास तयार हो, आणि शेवटचें सांगणें इतकेंच कीं, अंतकाळीं तूं आपलें परलोकींचें साधन कर. तुझे धर्माप्रमाणें तुझा जो कोणी देव असेल त्याचें स्मरण करण्यास मी तुला परवानगी देतें. तर लवकर तयार हो. मला अधिक अवकाश नाहीं; मी एकच घावानें तुझे दोन तुकडे करणार. " ह्याप्रमाणें तिचें भाषण ऐकून **किश्वरासिताची** अवस्था त्या वेळेस कशी झाली असेल, याचा विचार तुह्मीच करा.

प्रिय मित्र हो, जिवावरचा तो कठिण प्रसंग पाहून **किश्वरासिताचें** शरीर थरथर कांपूं लागलें, आणि डवडवून घाम येऊन डोळ्यांतून अश्रुपात चालले. त्या वेळीं **किश्वरासिताच्या** काळजानें ठाव सोडला. तो मोठ्या विचारांत पडून म्हणतो, " हर हर ! परमेश्वरा ! कोण प्रसंग हा ! हा दोष कोणावर द्यावा ? मींच आपल्या हातानें हें प्राणसंकट आपल्यावर ओढून आणलें; आतां प्राण जगण्याची तर आशाच नको. मला दुःख म्हणून इतकेंच वाटतें कीं, माझ्या वृद्ध **अखतरशहाची** व मातोश्री **हुसनआफ्रेज** हिची त्या बंदींतून सुटका कोण करील ? **माहेजहाच्या** सुखाचा वारा लागणें तर माझ्या प्रारब्धींच नाहीं. आतां काय करूं ? " असें म्हणून तो धाय धाय रडूं लागला. आणि पुनः आपल्याशींच म्हणतो, " आजपासून कोणीही स्त्रियांच्या सौम्य मुद्रेवरून त्यांच्या मोहरूप जालांत सांपडूं नये. कारण, मीच पहा कीं, किती वेडा आहें

तो ! आजपर्यंत मी आपल्या ठिकाणीं शहाणपणाचा मोठा ताठा बाळगीत होतों, परंतु शेवट मदनाचे स्वाधीन होऊन ह्या निर्दय स्त्रीच्या हातीं सांपडलों. अरेरे ! परमेश्वरानें कनक आणि कांता अशा दोन मोठ्या घातक वस्तु निर्माण केल्या आहेत. ह्या दोहोंस जे भुलत नाहींत, तेच पुरुष सुज्ञ खरे. आणि मजसारखा मूर्ख तर कोणीच नाहीं. प्रथम हिच्या सुंदर चेहऱ्यावरून माझे मनानें धांव घेतली परंतु ही अशी निर्दय, निष्ठुर व घातकी स्त्री आहे, हें मला पूर्वीं कळलें नाहीं. असो. ह्या वेळेस मी आपल्या सर्व सुखास मुकून काळाचे दाढेंत सांपडलों, आतां इलाज नाहीं." असा विचार करून **किश्वरासिता मेहरवशेला** म्हणतो, " या वेळेस मी आपल्या हातांत सांपडलों आहें. तेव्हां इच्छेस येईल तसें करा. तुमचे हातीं मान आहे, तेव्हा आतां असा एक जोरानें घाव मारा कीं जेणेंकरून ह्या देहाचे दोन बरोबर तुकडे होतील. आतां उशीर लावूं नका. परस्त्रीचा जे प्राणी लोभ धरतात त्यांस हाच दंड योग्य आहे. " असें म्हणून स्वस्थ राहिला. नंतर **मेहरवशेनें** आपल्या तरवारीची धार रुमालानें स्वच्छ पुसून मोठ्या जोरानें वार करण्यास वर हात केला. हें पाहून **किश्वरासितानें** घट्ट डोळे झांकले, आणि ' या अल्ला, या खुदा ' असें स्मरण करूं लागला. त्या वेळेस त्याच्या काळजाचें अगदीं पाणी होऊन हृदयांत गर्द अंधार झाला.

**मेहरवश** घाव मारणार इतक्यांत तिला कांहीं स्मरण झाल्यामुळें ती हात आंखडून ह्मणाली, " अरे तरुण पुरुषा, आमच्या राज्यनीतींत व कायदेकिताबींत असें सांगितलें आहे कीं, ज्या मनुष्यास देहांत शिक्षा देणें आहे, त्यास ती देतेसमयीं त्याची इच्छा कांहीं राहिली असल्यास पूर्ण करावी; आणि दुसरें असें कीं, आजपर्यंत माझे हातून जे सहस्त्रावधि राजपुत्र मरण पावले आहेत त्यांची हकीगत व नांवनिशी मी आपल्या स्मरणवहींत लिहून ठेवीत असतें. आणि असें केल्यानें कोण, कोठील, कोठून आले आणि येथें मेले ह्याचा हिशोब बरोबर रहातो. ह्मणून तुझें नांव, गांव व हकीगत सांगून नंतर प्राणदान खेरीज करून तुझी जी इच्छा असेल ती माग, ह्मणजे मी पूर्ण करीन. आणि त्यानंतर तुला मृत्युपुरीस पाठवीन. बोल बोल लवकर. " असें ह्मणून तेथें एक खुर्ची टाकून त्याचे समोर नग्न तरवार घेऊन ती बसली.

नंतर **किश्वरसितानें** आपली संपूर्ण हकीगत तिला सांगितली आणि ह्मणाला, " शेवटची माझी इच्छा इतकीच राहिली आहे कीं, देहांतशिक्षा देण्याला माझ्या हातून अपराध तरी कोणता झाला ? एवढें कृपा करूना सांगा ह्मणजे माझी इच्छा पूर्ण होईल, आणि आजपर्यंत सहस्रावधि राजे आपल्या हातानें मारले ह्मणून सांगतां; तर त्यांनीं तुमची चुकी तरी कोणती केली हें सांगा, ह्मणजे माझे प्राण सुखरूप रीतीनें जातील, इतकें मागणें आहे. " हें ऐकून **मेहरवशेनें** उत्तर दिलें कीं, " मूर्खा, तूं कांहीं अपराध केला नाहींस, परंतु माझी प्रतिज्ञाच अशी आहे कीं, ' मरेपर्यंत लग्न करणें नाहीं, आणि पुरुषांचें तोंड पहाणें नाहीं. ' परंतु माझी अशी घोर प्रतिज्ञा असतांही, माझ्या उत्कृष्ट स्वरूपाच्या कीर्तीनें मला एकवार पाहण्याकरतां पुष्कळ राजे येथें आले व मेले; तेव्हां त्याप्रमाणेंच तूंही मरणार. माझ्या बापाचें नांव **दिनरोजशहा**; तोही मोठा पराक्रमी असून त्याच्या दौलतीचा बडेजाव सर्व पृथ्वीवर प्रसिद्ध आहे. माझ्या बापाचे स्वाधीन एक्याण्णव कोट रुपये वसुलाचा मुलूख असून, त्याचे पोटीं मी एकुलती एक मुलगी आहें. मी वयांत आलें तेव्हां माझें लग्न करण्याविषयीं त्यानें पुष्कळच प्रयास केले; परंतु मीं तें मनावर घेतलें नाहीं. पुढें माझा बाबा स्वर्गवासी झाल्यावर मीं नियम केला कीं, आजपासून पुरुषाचें मुख पहाणें नाहीं. परंतु कित्येक राजे आपण होऊन भेटीस येऊं लागले. तेव्हां अशी प्रतिज्ञा केली कीं, माझी इच्छा धरून कोणी भेटण्यास आलें कीं त्यांस ठार मारावें. असा नियम फार दिवस चालविला. पुढें राजधानींत राहून माझे हातून फार हत्त्या होऊं लागल्या. ह्मणून सर्व राज्य प्रधानाचे स्वाधीन करून मीं ह्या ठिकाणीं जंगलांत येऊन राहिलें. तरी येथेंही तूं येऊन माझा व्रतभंग केलास; ह्मणून आतां तुला मारणें भाग आहे."

असें म्हणून पुनः हात वर केला. तेव्हां **किश्वर** दीनमुखानें करुणास्वर काढून ह्मणाला, " आणखी एक विनंति करतों ती ऐकून घेऊन नंतर वार करावा. ती विनंति इतकीच कीं, आपण पूर्वीं सांगितलें कीं, पुरुषमुख दृष्टीस पडलें कीं, मला त्या दिवशीं अपशकून होतो आणि मीं ताबडतोब त्या पुरुषास देहांतशिक्षा देतें. तर या सर्व पुरुषांनीं असा तुमच्या जन्मांतरीं अथवा ह्या जन्मीं तरी कोणता अन्याय केला आहे, हें कृपा करून सांगा. कारण, मनुष्यजन्म वारंवार मिळत नाहीं. तशांत सर्व

देहांत मनुष्यदेह परमेश्वरानें मोठ्या श्रमानें बनविला आहे, व मनुष्यदेहास व सर्व लहान थोर देहांस प्राण हा मोठा प्यारा आहे, हें तुह्मीं जाणतच आहां. असें असून विनाकारण सहस्रावधि मनुष्यदेहांचा नाश करून आजपर्यंत प्राण घेतलेत, व पापाची सामुग्री केलीत; तर यांत फायदा तरी कोणता पाहिलांत? आणि असें पुरुषदेहाचें व आपलें हाडवैर तरी काय आहे ? हें कृपा करून सांगावें." मेहरवशेनें उत्तर दिलें. "मूर्खा ! मरणसमयीं तुला वाचा फुटली कीं, काय. अरे, थोडीशी फुरसत मिळाली ह्मणून फारच बडबड करतोस ! अरे लुच्चा ! ! पुरुष तेथून सर्व सारखेच. बैमान, निर्दयी, घातकी असे पुष्कळ तऱ्हेचे दोष पुरुषांचे ठिकाणीं राहतात. आणि स्त्रिया केवळ गरीब गाई, त्यांचे हे पुरूष गळे कापितात असें माझ्या ऐकण्यांत व वाचण्यांत पुष्कळ आलें आहे. व पुरूष लबाड अशी माझ्या मनाची खात्री झाल्यापासून मीं ही अघोर प्रतिज्ञा केली. आणि आजपर्यंत पुष्कळ राजे मारून तुलाही आतां मारणार." हें श्रवण करून किश्बरासितानें पुनः विनंति केली कीं. "पुरूष मारण्याचें इतकेंच जर कारण आहे, तर मग थोडक्यांत आहे. आजपर्यंत जे गृहस्थ तुमच्या हातून मेले, ते केवळ ज्ञानशून्य होते असें ह्मणण्यास चिंता नाहीं. कारण, त्यांच्या अंगीं पुरुष बैमान किंवा स्त्रिया बैमान हा निर्णय करण्याचें सामर्थ्य नव्हतें, ह्मणून ते मेले. हल्लीं तुमचे हातीं हा जो किश्बर सांपडला आहे ह्याची समजूत तुमच्या समजुतीच्या उलट आहे. तुमचें ह्मणणें आहे कीं, पुरूष बैमान आणि स्त्रिया इमानी; आणि मी ह्मणतों कीं स्त्रिया बैमान व पुरुष इमानी. तर मेहरबानी करून आजची रात्र जर मला जगूं द्याल, तर उदयीक तुह्मांस अशी एक गोष्ट सांगेन कीं त्या गोष्टींत पुरुष इमानी ह्मणून तुमच्याच तोंडानें कबूल करवीन. कदाचित् पुरूष इमानी अशी खात्री माझ्यानें करवली नाहीं, तर मग आपण मला ठार मारावें." याप्रमाणें किश्बराचें बोलणें ऐकून मेहरवशेनें तें कबूल केलें, आणि मनांत विचार करते कीं, "हा पुरुष स्वरूपानें जसा सुंदर आहे, तसाच शहाणा व चतुरही आहे; तर ह्याला आजची रात्र असूं द्यावा, आणि उदयीक हा जर पुरुष इमानी अशी खात्री करील तर विषयसुख भोगण्यास, मजसारख्या स्त्रीस हेंच पुरुषरत्न योग्य आहे. कदाचित् ह्याच्यानें खात्री न करवली, तर मग आजचा दंड याला उद्यां करूं."

यःप्रमाणें विचार करून मेहरवशेनें आपली तलवार म्यानांत घालून त्यास सोडलें. नंतर आपल्या दासीकडून कांहीं फराळाचें आणलें व रत्नखचित झारी पाण्यानें भरून आणवून त्याजपुढें ठेवून ह्मणाली, "महाराज थोडा फराळ करून राहिलेल्या रात्रींत अंमळ विसावा घ्यावा." हें ऐकून किश्बरास किंचित् हर्ष झाला, आणि आणलेल्या पक्वान्नांतून कांहीं फराळ करून अंमळ शांत झाला. नंतर दुसऱ्या एका दासीनें उत्तम सुवासिक फुलांचे हार व गजरे आणून ह्याच्या गळ्यांत व हातांत ते घातले! आणि ह्मणाली, "महाराज, विश्रांतीकरितां हा उत्तम बिछाना तयार आहे." असें सांगून सर्वजणी निघून गेल्या. आणि किश्बर तेथेंच निद्रिस्त झाला.

सूर्योदय झाल्यावर तो सर्व दिवस किश्बराचा चैनींत गेला. रात्रौ फराळ झाल्यावर एक दासी धांवतच येऊन ह्मणाली, "चला चला लवकर. राणीसरकार आपली वाट पहात आहेत." असें ह्मणून तिनें त्याचा हात धरून जेथें मेहरवश बसली होती, तेथें त्यास नेलें. तेथें गेल्यावर मेहरवशेनें मोठ्या आदरानें त्यास खालीं बसवून ह्मणाली, "आतां आपण काल बोलल्याप्रमाणें पुरुषाच्या इमानाची गोष्ट सांगून माझी खात्री करावी." असें ह्मणतांच किश्बरानें गोष्टीस आरंभ केला. तो म्हणाला:—

---

# रात्र पहिली.



" पूर्वीं तनवीरशहा नामें बादशहा फरहत्आबाद्नामें शहरीं राज्य करीत असे. तो गुणसंपन्न, मोठा धर्मशील आणि चतुर असे. सर्व राज्यकारभार मोठ्या सफाईनें चालवीत असून, त्याची प्रजा त्याचें निरंतर कल्याण इच्छित असे. त्याच्या ताब्यांतील सर्व प्रदेशांत स्वस्थता असून सूल वगैरे काम सरळरीतीनें चालत असे. तसेंच, त्यानें आपले ' धान व मुनशी इत्यादि हुशार व चतुर कामगार ठेविले होते प्रजा नेहमीं सुखी राहून, राजव्यवस्था नीटपणें चालत अ त्तीला तर अंतच नसे. कारण, राज्याचा वसूल मोठा

चे कारकीर्दीत बंडबखेडे कांहीं होत नसून चोहोकडे उत्तम रीतीनें स्थिरता होती. गैरवाजवी खर्च अगदींच होत नसून, नेहमीं खजिन्यांत शिल्लक असे. सारांश, तनवीरशहाची वर्तणूक उत्तम रीतीची असल्यानें कोणत्याही गोष्टीची त्याला कमताई नसे. परंतु पोटीं संतान नव्हतें; ह्मणून मुख्य पट्टराणी खेरीज करून त्यानें नेहमीं असा क्रम चालविला कीं, तीन महिन्यांनीं नवी स्त्री करून तिच्याशीं विषयक्रीडा करावी. प्रत्येक स्त्रीबरोबर तीन महिने रात्रंदिवस वास करून तितक्या कालांत ती जर गर्भवती झाली तर बरें, नाहींतर तिच्या खाण्यापिण्याचा बंदोबस्त करून, शहरापासून सुमारें बारा कोसांवर एक विस्तीर्ण वाडा बांधला होता, त्या वाड्यांत नेऊन ती स्त्री ठेवावी. तो वाडा मोठा ऐटदार बांधला असून तेथें सर्व प्रकारची टापटीप व चौकी-पहारे ठेविले होते.

याप्रमाणें शेंकडों स्त्रिया त्या कैदेंत जाऊन पडल्या होत्या. पुढें अशा कृत्यानें शहरांतील व आसपास देशांतील कोणींच आपली कन्या बादशहास देईनात. कारण, तीन महिन्यांत गर्भवती न झाली, तर मग तिला जन्माची कैद. या दुःखामुळें पुढें बादशहाचे नियमास अड[illegible]ण होऊं लागली, परंतु लाखो रुपये मुलीचे बापास देऊन, त्यानें तीन महिन्यांनीं नवी नवरी करावी. असे कित्येक दिवस लोटल्यावर एके दिवशीं बादशहा आपले सुंदर घोड्यावर बसून थोड्या लोकांसहित संध्याकाळचे सुमारास हवा घेण्यास निघाला होता. रस्त्यानें दाट झाडी व बागबागाईत बरीच होती. दोहीं बाजूंनीं सारखे बाग लागले असून त्यांमधून पुढें जाण्यास मार्ग होता. तसेंच मार्गाचे दोहीं बाजूंस मोठमोठे आम्रवृक्ष लागून त्यांस सुंदर पाड लागले होते, आणि त्या भारानें फांद्या जमिनीपर्यंत लोंबत होत्या. अशा रमणीय छायेंतून राजाची स्वारी चालत असतां, चहूंकडून सुगंधयुक्त वायु येऊन राजाचे देहास आल्हाद देत होता. अशी ती [illegible]भा बादशहा न्याहाळीत आहे, इतक्यांत एका बागेजवळ एक अतिशय सुंदर [illegible]ची मुलगी वयानें सुमारें बारा वर्षांची असून, अंगानें सडपातळ, गौर-[illegible]त्यानें पाहिली. त्या वेळेस ती मुलगी हातांत एक सुंदर लहा-[illegible]डी घेऊन गुलाब, मोतिया, मोगरा अशीं सुंदर फुलें तो-[illegible] यामुळें तिची दृष्टि इकडे नव्हती. परंतु तनवीर-[illegible]ंदित होऊन मनांत विचार करितो कीं, " काय

सांगावें ! आजपर्यंत शेंकडों उत्तम स्त्रिया या डोळ्यांनीं पाहिल्या, परंतु अशी माषुक स्त्री कधींच माझे पाहण्यांत आली नाहीं. काय करूं ? हिचें कुल नीच आहे, तेव्हां हिचे बरोबर उघड रीतीनें लग्न लावणें हें आपल्या मोठेपणास लांछन आहे; आणि मला तर हिचे ज्वानीनें पूर्ण वेडें केलें. सर्व अंगांत मदनदेवानें आपली सत्ता बसवून टाकिली, म्हणून आतां धीर धरवत नाहीं. बरें, जर करतां येथेंच कांहीं गैर वर्तन करीन, तर सर्वत्र माझी अपकीर्ति होईल; तर आतां परत वाड्यांत जाऊन हिचे बापास आणवून तजवीज करावी. " असा विचार करून तसाच परत फिरला. कांहीं पावलें पुढें गेला, आणि विचार करतो, " हिला पाहिल्याबरोबर मी अगदीं मदनानें ठार झालों, हें वर्तमान तिला कळवून नंतर आपण जावें. " असें म्हणून वर पाहिलें तों पाडाचे आंबे हातांनीं तोडावेत इतके जवळ लागले होते. त्यांपैकीं एक आंबा तोडून, त्यानें इतका नेमानें मारला कीं, तो जाऊन तिजजवळील पाडाच्या आंब्यास भेटून खालीं पडला. तेव्हां ती घाबरी होऊन चोहोंकडे पाहूं लागली. इतक्यांत तिची दृष्टि बादशाहावर गेली, आणि त्याचे चेहऱ्यावरून त्यानेंच थट्टा केली वगैरे सर्व रंग तिच्या ध्यानांत आला. नंतर तिनें आपल्या सुंदर नेत्रकमलानें राजास इशारत करून गालांतले गालांत हसली, आणि पळून गेली. तेव्हां तर राजास विलक्षण चटपट लागून तसाच मोठ्या जलदीनें तो घरीं येऊन पोहोंचला. घरीं आल्यावर आपल्या प्रधानाकडून शोध करून त्या माळ्यास बोलावून आणविलें. प्रथम तर त्या माळ्यास भीति वाटून तो मनांत ह्मणतो, " मजकडून काय अपाय झाला आहे कोण जाणे ! " म्हणून त्यानें दोन्ही हात जोडून प्रार्थना केली, " सरकार, या गरीबावर दया करून काय गुन्हा झाला असेल तो माफ करा. माझें अनाथाचें रक्षण करावें. " असें ह्मणून थरथरा कांपूं लागला. तेव्हां बादशाहानें त्यास जवळ बसवून सांगितलें, " वेड्या, तूं भिऊं नकोस; तुजकडून कांहीं अपराध झाला नाहीं. तुला बोलावून आणलें आहे, तें काम तुझ्या हिताचेंच आहे. आणि मी सांगतों ती गोष्ट तूं ऐकशील, यांत संशय नाहीं. काम इतकेंच कीं, तुझी कन्या फार खुपसुरत आहे; ह्मणून ती राणी करावी असें माझ्या मनांत आहे; तर ह्या गोष्टीस तूं रुकार दे. परवांचे दिवशीं माझ्या नेमाचे तीन महिने पुरे होणार आहेत. तेव्हां त्या

दिवशीं तुझ्या कन्येचा विवाह केला पाहिजे; ह्मणून तुला बोलावून आणलें आहे. तेव्हां कसें ? " सरकारचें हें बोलणें ऐकून माळी हात जोडून ह्मणाला, " खुदावंत, मी या गोष्टीस रुकार देऊं शकत नाहीं. माझे कन्येचा विचार घेऊन मी आपणास उद्यां कळवीन. " असें ह्मणून बादशाहाच्या परवानगीनें माळी घरीं गेला. त्यानें बायकोस व मुलीस जवळ बोलावून बादशाहाचा मजकूर कळविला. तेव्हां माळ्याचे बायकोस तर फार आनंद झाला. परंतु लेंकीनें ती गोष्ट नाकारली, आणि ह्मणाली.— " बाबा, तुला कदाचित् लेंकी फार झाल्या असतील, तर मला आडांत ढकलून दे; परंतु बादशहाशीं माझें लग्न करूं नको. कारण, त्यासारखा निर्दय पुरुष कोणीच नाहीं. मला वाटतें तो केवळ शतमूर्ख आहे. पहा, संतति होणें हें माणसाचे स्वाधीन आहे, अशी गोष्ट नाहीं. असें असतां तीन महिन्यांत स्त्रीनें गर्भ धारण केला नाहीं तर तीस कैदेंत टाकितो. हें केवढें नीच कर्म आहे बरें ? तेव्हां अशा ज्ञानशून्य राजाशीं मी कधीं लग्न करणार नाहीं. पहा, तीन महिन्यांनंतर माझीही तशीच दशा होऊन मला त्या स्त्रीशतकांत गेलें पाहिजे. तेव्हां तीन महिन्यांचे सुखाकरितां पुढें जन्मभर कैद कोण भोगील ? ह्याकरितां बाबा, आपण साफ जाऊन सांगावें कीं, ' माझी लेंक स्वच्छ नाहीं ह्मणते; ' आणि जशीं अक्षरें मी आतां बोललें, तशींच अक्षरें त्याला जाऊन सांगा. त्यापासून तुह्मांस कांहीं भीति नाहीं. कदाचित् त्याला राग आला, तर त्यापासून जें भय होईल त्यांतून मी तुमचा सांभाळ करीन. आणि या गोष्टीनें माझें व तुमचें कल्याण होईल, इतकेंच नाहीं, तर शेंकडोंजणी ज्या तुरुंगांत पडल्या आहेत, त्यांचेंही कल्याण होईल यांत संशय नाहीं. " कन्येचें भाषण ऐकून घेऊन माळी तसाच सरकाराकडे गेला, व त्याला सर्व वर्तमान सांगितलें. तो ह्मणाला.—" सरकार, माझे कन्येनें आपणास फार दूषण देऊन सांगितलें आहे कीं, मी आपल्याशीं साफ लग्न करणार नाहीं; मग ह्यांतील काय कारण असेल तें असो, मला तें माहीत नाहीं. " असें माळ्याचें बोलणें ऐकून बादशहास वाईट वाटलें, व त्यास थोडा रागही आला. नंतर त्यानें माळ्यास सांगितलें कीं, " तुझे कन्येस पालखींत घालून एकवार मजकडे आण; ह्मणजे मी तिचीं सर्व कारणें समजून घेईन, आणि त्याप्रमाणें सर्व तजवीज करीन. " बादशहाचें बोलणें ऐकून माळी मोठ्या आदबीनें मुजरा करून आपल्या

घरीं आला. नंतर झालेला सर्व मजकूर बायकोस व कन्येस सांगून ह्मणालाः—“पोरी, तुला तेथपर्यंत गेलें पाहिजे. कारण, बादशहास मोठा राग आला आहे असें वाटतें. तूं सांगितल्याप्रमाणें अक्षरशः निरोप मीं सरकारास कळविला. तेणेंकरून त्यांची विलक्षण मुद्रा फिरून गेली, आणि आज सुमारें प्रहर रात्रीस तुला बोलवणें येणार आहे; त्या वेळेस तुला तिकडे गेलें पाहिजे. पहा, किती झालें तरी आपण मावळट भाई; आपणास राजाबरोबर टिकाव धरवेल काय ? तूं ‘ नाहीं , ह्मणत असलीस आणि त्यानें तुजवर जुलूम केला, तर मग तूं काय करणार ? तेव्हां त्यापेक्षां प्रथम आपण होऊनच कबूल व्हावें हें बरें. तूं त्याची राणी होऊन आह्मांस पुष्कळ द्रव्य मिळावें असा कांहीं माझा हेतु नाहीं. परंतु पुढें होऊन तुझे नशिबीं वाढून आलें; त्यास आमचा उपाय नाहीं. मला वाटतें काय कीं, बादशहाचे सुखाकरितां तूं जन्मभर कैदेंत रहावें ? त्यापेक्षां रस्त्यावरील एखादा घोंगड्या पाहून त्याला जरी तुला पिंवळी करून दिली, तरी तें उत्तम. कारण त्यापासून जें तुला सुख होईल, तें बादशहाच्या राणीपासून होणार नाहीं. कारण, स्त्रियांस जें मुख्य सुख असावें, तें तर मुळींच तीन महिने; आणि बाकी सर्व आयुष्य तुरुंगांत, तेव्हां ह्यापासून उपयोग तो कोणता ? हें सर्व मला पक्कें समजत आहे. परंतु सत्तेपुढें शहाणपण कोठें चालतें ? तर परमेश्वराच्या इच्छेनें जें होणें असेल तें खरें. भगवंताचे कृपेनें तूंच तीन महिन्यांत गर्भवती होणार नाहींस कशावरून ? आणि जर असें झालें, तर मग तुझ्या व आमच्या भाग्यास अंत नाहीं. ह्मणून तूं तेथें गेल्यावर बादशहाचें फारसें मन मोडूं नको. इतक्यांत नकार झाला, तर बरें; नाहींतर त्याचे मर्जीप्रमाणें लग्नाविषयीं रुकार दे, इतकेंच माझें सांगणें.” याप्रमाणें **हायातबीचा** बाप जो माळी तो तिला उपदेश करीत आहे, इतक्यांत संध्याकाळ झाली. तेव्हां जेवणखाण आटपून **हायातबी** बादशहाकडे जाण्यास सिद्ध झाली. इतक्यांत दोन शिपाई व दोन मशालजी शृंगारलेल्या पालखीसुद्धां व नवीन नवरी मिळवून देणारा जो त्या कामावरील कामगार यांसहित बादशहाचें बोलावणें येऊन पोहोंचलें. नंतर **हायातबी** मोठ्या आनंदानें बापास व आईस भेटून पालखींत बसली.

बादशहाचे महालीं येऊन पोंचल्यावर **हायातबी** आंत जाऊन एके

कोंपऱ्यांत उभी राहिली. तेथें बादशहानें पूर्वींच सर्व प्रकारची तजवीज करून ठेविली होती, आणि या सुंदरीची वाट पहात बसला होता. ती कोंपऱ्यांत उभी असतां राजानें तिला विचारलें: “सखे, या बादशहाचे पदरीं पडण्याकरितां कैक नवऱ्या व त्यांचे बाप नवस करीत आहेत कित्येक या कामासाठीं वर्षानुवर्ष मध्यस्ती घालून प्रयत्न करीत आहेत. आणि तुला मीं होऊन बोलावलें असतां नकाराचें उत्तर पाठविलेंस याचें कारण काय? मीं खचित सांगतों कीं, तुला पाहिल्या दिवसापासून माझें देहभान ठिकाणीं नाहीं. आणि तुजसारखें सुंदर रत्न आजपर्यंत माझे कधीं पाहण्यांत नाहीं, ज्या वेळेस तुझ्या प्रफुल्ल नेत्रकटाक्षबाणानें माझे हृदयांत प्रवेश केला, तेव्हांपासून हा देह अगदीं बेआराम झाला आहे. शिवाय तुझें गालांतलें हंसणें तर माझे ध्यानींमनीं गढून गेलें आहे. प्रिये, फुलांचे परडीसहित तुझी मूर्ति त्या वेळेपासून माझे हृदयमंदिरीं केवळ हुबेहुब रेखली आहे. तेव्हां हे प्राणसखे, एकवार आपल्या चंचलनेत्रानें मजकडे अर्धवट अवलोकन करून थोडें हास्यवदन कर. ह्मणजे मला अंमळ आराम वाटेल. तुझ्या स्वरूपास भुलून मी अगदीं दिवाणा झालों आहें. ह्मणून आपल्या मंजुळ स्वरानें एक शब्द तरी बोलून, शादीकरितां सर्व तयारी आहे, त्यास रुकार दे. पहा, उद्यांक तीन महिने पुरे होणार, ह्मणून नियमाप्रमाणें लग्न झालें पाहिजे. तेव्हां आतां वेळ न करितां आनंदाचा सल्ला दे.” असें ह्मणून तो फारच कामातुर झाला आणि तिच्या गळ्यास मिठी घालून व तोंडावरून हात फिरवून पुनः तिला ह्मणाला,—“सखे, बोल, बोल, रागावलीस? एथें तिसरें कोणी नाहीं. तुझे मनांत कांहीं मागून घेणें असल्यास माग अथवा एखादी अट असल्यास ती उघड करून सांग. किंवा इच्छित वस्त [illegible] असल्यास बेलाशक या बादशाहाजवळ मागून घे. हा **तनवीरशहा** तुजकरतां प्राणही देईल, मग वस्तूची काय कथा! परंतु असें जर मौन धरलेंस, तर तुझ्या मनांतलें काय ओळखावें? माझें सर्व लक्ष्य तुझ्या मधुर भाषणाकडे लागलें आहे.” याप्रमाणें पुष्कळ प्रकारें बादशाहानें **हायातबी**ची विनंती केली. परंतु ती त्या रात्रीं चकार शब्दही बोलली नाहीं. त्या दुःखानें त्या रात्रीं बादशाहा छप्परपलंगाचा त्याग करून तेथेंच जमिनीवर निजला; आणि **हायातबी** सूर्योदय होईपर्यंत तेथेंच कोंपऱ्यांत उभी राहिली.

सूर्योदय झाल्यावर बादशहानें विचार केला कीं, आपल्या नियमाचा आज शेवटचा दिवस आहे, तेव्हां आजचे आज दुसरी नवरी मिळणें कठिण; ह्मणून आतां **हायातबीशीं**च लग्न करावें. जरी ती बोलण्यास मजसमोर लाजते आहे, तरी तिच्या मनांत लग्न करावें असें असेल यांत संशय नाहीं. कारण तिचे मनांत जर लग्न करणें नसतें, तर तिनें पूर्वीं मला पाहून नेत्रांची इशारत व हास्यवदन केलेंच नसतें. तेव्हां ह्या पुराव्यावरून अशी खात्री होते कीं, हिचे मनांत असून ही भिडेस्तव बोलत नाहीं. ह्मणून लग्न तर करून घ्यावें, मग पुढें आपोआप बोलेल." याप्रमाणें विचार करून बादशहानें लग्नाची तयारी केली. आणि त्याच दिवशीं संध्याकाळीं चालीप्रमाणें **हायातबीशीं** लग्न लाविलें. लग्नांत तिचे अंगावर लाखो रुपयांचे दागिने व उंची पोषाकही घातला होता. तसेंच तिचे आईबापांलाही पुष्कळ द्रव्य दिलें. लग्नसोहळा मोठ्या थाटानें करून पुष्कळ पैसा खैरात केला.

ह्याप्रमाणें बादशहानें **हायातबी**बरोबर लग्न लावून तिनें बोलावें ह्मणून नित्यशः तिची प्रार्थना करीत असे. दररोज नवीन दागिने आणि नवीन पोषाग देत असावा, व कधीं कधीं मोठी अमोलिक वस्तु आणून तिच्या करमणुकीकरितां तिजपुढें ठेवीत असे. याप्रमाणें तिनें बोलावें ह्मणून **तनवीरशहा** फारच खटपट करी.

**हायातबीनें** बादशहाशीं सर्व प्रकारें चांगली वर्तणूक ठेविली होती. तो आला ह्मणजे उठून त्यास सामोरें जाऊन व हातानें त्याला धरून पलंगावर बसवावें; नंतर तेथें असलेल्या उत्तम फराळाचें ताट भरून पुढें आडणीवर ठेवावें. तसेंच रत्नखचित झारी सुवासिक पाण्यानें भरून फराळ होई-पर्यंत हातांत घेऊन उभें रहावें. कधीं कधीं त्याचे आग्रहामुळें त्याचे बरोबर बसून हिनेंही फराळ करावा. नंतर उंची अत्तरें आपल्या हातांनीं हिनें बादशहाचे देहास लावून गळ्यांत सुंदर हार व गजरे घालावेत. एकमेकांचे हात धरून पलंगावर जावें. तेथें गेल्यावर प्रथमतः बादशहाचे पाय आपल्या सुकुमार अंकावर घेऊन कोमल करानें मनापासून त्यांची सेवा करावी. रतिसमयीं तर बादशहास तिजपासून असें सुख होई कीं, त्यापूर्वीं त्यास असें विषयसुख कधीं जन्मांतही मिळालें नसेल. याप्र-

माणें तिच्या उत्तम स्वभावानें बादशाहाचा जीवप्राण तिजवर बसला. त्याला तिचा वियोग क्षणभरही सहन होत नसे. ह्यामुळें त्यानें सर्व राज्य प्रधानाचे माथीं ठेवून आपण **हायातबी**बरोबर रात्रंदिवस ऐषआरामांत गुंग होऊन गेला.

तिचे तारुण्याचे गर्दींत जेवणखाण, निद्रा, शिकार वगैरे बादशहाचा सर्व नाद सुटून तिच्याशीं तो पूर्ण लंपट झाला. इतकें झालें तरी **हायातबी** एक शब्दही बोलत नसे. परंतु एक भाषण खेरीज करून बाकी सर्व सुखें तिनें बादशहास पूर्णपणें दिलीं. तिनें बोलावें ह्मणून बादशाहा फारच खुषामत करीत असे. तो ह्मणे, “ हे प्राणसखे, पहा, माझे नियमाप्रमाणें तीन महिने पुरे होण्यास थोडे दिवस राहिले; ते पुरे झाल्यावर मग तुझा वियोग होणार आहे, तेव्हां तुझ्या भाषणामृताची अपेक्षा तशीच राहील. तुझ्या समागमांत पावणेतीन महिने जें सुख भोगलें तें आतां स्वप्नवत् होणार ह्मणून एकवार तुझ्या मंजुळ कंठांतील मधुर भाषण ऐकण्याची माझी इच्छा घोंटाळत आहे. पहा, प्राणप्रिये, चातकपक्ष्यास भागीरथीसमान अन्य जलें जरी मिळालीं, तरी मेघोदकावांचून त्याची तृप्ति होईल काय? तद्वत् या **तनवीरशहास** त्वां आपल्या शरीरानें संपूर्ण सुखें दिलीं; परंतु भाषणामृत जर पाजिलें नाहीं, तर तृप्ति होईल काय? याकरतां सुकुमारे, कसेंही असो; सर्व राग सोडून कोकिलेतुल्य एक शब्द माझे कर्णीं पडूं दे, इतकी प्रार्थना आहे. आतां ज्या परमेश्वरानें हें अप्रतिम स्वरूप तुला दिलें, त्यानें वाचा दिली नसेल असें मला वाटत नाहीं. आणि तुझ्या सर्व चातुर्यावरून तूं मुकी असावीस असा अगदींच तर्क पोहोंचत नाहीं. तस्मात् मी हात जोडून साष्टांग नमस्कार घालतों कीं, एकवार या हतभाग्य बादशहाची इच्छा पुरीव. मी आतांच तुला इतकी बोलण्याची तसदी कां देतों ह्मणशील, तर थोड्याच दिवसांत तुझी माझी तुटातूट होणार आहे. सबब, हा जीव कळवळतो. तुझी भेट झाल्यापासून पुढें होणारें वियोगजन्य दुःख रात्रंदिवस माझ्या मनांत घोंटाळत आहे; पण काय करूं? प्रतिज्ञा करून चुकलों. तुजसारखें सुंदर रत्न ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे हें जर मला पूर्वी कळलें असतें, तर अशी अघोर प्रतिज्ञा मीं कधींच केली नसती. आतां उपाय नाहीं; ह्याकरितां सखे, माझे पंचप्राण व्याकुळ होत आहेत. ह्मणून हास्यवदन करून एक शब्द तरी बोल.”

बादशाहाचा असा निर्धार व पंचप्राण आपल्यावर आहेत हें पाहून **हायातबीनें** असा विचार केला कीं, "आतां आपणास बोलावें असें वाटतें, पण उपयोग काय? जरी बोललें आणि त्याचे जिवाचें समाधान केलें तरी तुरुंग ह्मणून चुकणें नाहीं. तर मग बोलून काय फायदा! ह्मणून बोलूंच नये हें बरें. ह्मणजे कदाचित् नियमाचे दिवस पुरे झाले तरी भाषणाच्या आशेनें मला जास्ती दिवस ठेवून घेईल. आणि त्या योगानें तरी हा नियम मोडून माझें व त्यापुढें ज्या अशा सपाट्यांत सांपड-णाऱ्या स्त्रिया त्यांचें दुःख टळेल." असा विचार करून **हायातबीनें** त्या वेळेसही बादशहाची करुणा ऐकिली नाहीं. पुढें दररोज असाच क्रम चालत असतां नियमाचे दिवस पुरे झाले. मग उद्यां नियम पुरा होणार, त्याचे पूर्व दिवशीं रात्रीं बादशहानें पदर पसरून विनंति केली कीं, 'सखे, उदयिक मला तूं अंतरणार व पुनः तुझी माझी भेट होणार नाहीं, तेव्हां अजून तरी या तान्हेल्याची तृषा शांत कर. पहा, माझी प्रतिज्ञाच आहे, तेव्हां इलाज नाहीं, नाहींतर तूं असेंच मौन धरून रहातीस तरी तुला कधीं अंतर दिलें नसतें. तुजबरोबर आज तीन महिने ऐषआराम भोगून ह्या बादशहास जन्माची आठवण राहिली. परंतु एकदां तुझें भाषण न ऐकिल्या कारणानें हा **तनवीरशहा** तसाच क्षुधित राहिला आहे. असो. परमेश्वरइच्छेपुढें उपाय नाहीं." असें ह्मणून तिच्या वियोगाचें दुःख मनांत आल्यामुळें बादशहाच्या नेत्रांतून शोकानें टपटप पाण्याचे थेंब पडूं लागले, आणि त्यास फारच गहिंवर आला. नंतर तिच्या अंकावर डोकें ठेवून बादशहानें तेथेंच निद्रा केली. तेव्हां त्यास तर दुःख-निद्रा लागली, परंतु **हायातबी**ला त्या रात्रीं झोंप येईना, आणि ती आपल्याशींच विचार करते.—

"मी आपले मनांत आजपर्यंत ह्मणत होतें कीं, पुरुष बेमानी, निर्दय व घातकी आहेत, आणि बादशहाचे अघोर प्रतिज्ञेमुळें तर बादशहासारखा कोणीच निर्दय नाहीं, असें समजत होतें आणि याच कारणास्तव मीं प्रथम त्यास 'तुजबरोबर लग्न करणार नाहीं,' असा निरोप धाडला. शेवटीं तो सत्ताधीश असल्या कारणानें लग्न तर केलेंच, पण माझ्या स्वाधी-नचें जें काम भाषण करणें, तें मुळींच मीं केलें नाहीं. कदाचित् देहानेंही दूर राहिलें असतें; परंतु हा जुलूम करील, असें समजून लग्न झाल्यावर

स्त्रीधर्मोप्रमाणें शरीरसेवाही केली; परंतु भाषण केलें नाहीं. पण हें माझें निंद्य कर्म झालें. कारण, वास्तविक पुरुषांचा दील स्त्रियांकडे लागणें हें काम स्त्रियांकडेसच आहे. स्त्रियांनीं जर इमानेंइतबारें पुरुषांचें मन संभाळलें, तर पुरुषही कधीं बैमान होणार नाहींत. मींच पहा, आज तीन महिने ह्यांची तब्येत खुष ठेविली, ह्मणून ह्यांचा खरा दील आपणाकडे लागला. आणि पुरुषांचा दील एकदां लागला ह्मणजे मग ते त्या स्त्रियेक-रितां प्राणही खर्ची घालतील, ह्यांत संशय नाहीं. आतां माझी खात्री झाली कीं, पुरुषांचा एकदां दील बसला ह्मणजे मग ती स्त्री कशीही असेना, कुरूप असो, सुस्वरूप असो, ते तिला कधीं अंतर देणार नाहींत. कारण, पुरुषांचें मन कोंवळें असतें, ह्यामुळें ते स्त्रियांना अगदीं वश होऊन आपला प्राणही त्यांच्यावरून खुरबान करितात, ह्यांत संशय नाहीं. पहा, यापूर्वी ज्या शंभर स्त्रिया कैदेंत पडल्या त्यांना बादशहाचें मन वळवून घेतां आलें नाहीं. तेव्हां अर्थातच बादशाहाची मर्जी त्यांच्यावर बसली नाहीं, आणि म्हणूनच त्या दुःख भोगीत आहेत असें खरें. आतां बादशहा जर मला प्राणाहीपेक्षां चाहतो आहे, आणि मी त्याच्याशीं बोलत नाहीं, तर हा माझा कमसलपणा आहे. आणि हें परमेश्वराजवळ रुजू नाहीं, म्हणून एकवार तरी या बादशाहाशीं भाषण करावें, मग काय होईल तें होवो."

याप्रमाणें विचार करून तिनें बादशहाचें हळूच मुखचुंबन घेऊन त्यास जागें केलें, आणि ह्मणाली,—" सरकार, इतके दिवस आज्ञा मोडून मीं आपल्याशीं भाषण केलें नाहीं, ह्याबद्दल ह्या दुष्टेस माफी करून मला अभय-वचन जर द्याल, तर मी आपलें न बोलण्याचें कारण सांगेन, परंतु त्यापूर्वी या दासीस अभय मिळालें पाहिजे." असें तिचें नाजूक व मर्यादशील भाषण श्रवण करतांच बादशाहास फारच आनंद झाला, आणि तिला पोटाशीं धरून ह्मणाला,—" सखे, काय सांगावें ? तुझे दोन शब्द कानीं पडतांच परमेश्वरानें जे हे मला कर्ण दिले आहेत त्यांचें सार्थक होऊन माझ्या सर्व सुखांचा कळस झाला. तूं इतके दिवस मजबरोबर भाषण केलें नाहींस, त्याबद्दल माझे मनांत कांहींएक रोष नसून तुला आपला हेतु सांगण्यास माझें अभयवचन आहे.

याप्रमाणें अभय मिळाल्यावर **हायातबी** आपलें कारण सांगूं लागली.

ती म्हणाली,—" सरकार, इतके दिवस न बोलण्याचें कारण इतकेंच कीं, ईश्वरानें माझा खुपसुरत देह बनवून व्यर्थ केला आहे. त्यापेक्षां जन्मास येतांच मेलें असतें तर बरें होतें. परंतु तसें न होतां पुढील सर्व प्रकार भोगणें माझ्या कपाळीं आला. खुदावंत, मी लहान असतां एक भविष्य-वादी जोशी माझ्या बागेंत ऊन लागलें म्हणून छायेकरतां व पाणी पिण्या-करतां आला होता. तो पाणी पिऊन एका आंब्याच्या झाडाखालीं छायेंत बसला. तेव्हां माझ्या मैत्रिणींसह मी खेळत खेळत त्याजवळ गेलें. त्यानें मजकडे पाहून आकाशाकडे तोंड केलें आणि म्हणाला, ' हे अल्ला, हे खुदा, तुझी लीला अगाध आहे. संपूर्ण जगाचीं सूत्रें तूं आपल्या हातांत ठेवून पालन करितोस, आणि तूं सर्व जगतांत कोणीच सर्वसुखी पैदा करीत नाहींस; कारण, एकास जर पूर्णसुख असलें, तर तो तुझें जन्मां-तहीं स्मरण करणार नाहीं, असें जाणून कोणत्या तरी कमीपणामुळें आह्मीं माणसांनीं तुझें स्मरण करावें, अशी तूं तजवीज ठेवतोस, हें आतां माझ्या अनुभवास आलें. पहा, ही समोर एक अज्ञान मुलगी मुलींत खेळत आहे. हिचीं सर्व लक्षणें उत्तम आहेत. ही स्वरूपानें सुंदर असून बादशाहाची राणी होणार, आणि संपत्तीचाही पुष्कळ उपयोग घेईल; शिवाय हिचा प्रथम मुलगा उत्कृष्ट कीर्तिमान् व सुस्वरूप सार्वभौम बादशाहा होईल; परंतु दुःख इतकेंच कीं, हिच्या पुत्राचा स्वर हिच्या नवऱ्यानें ऐकला म्हणजे त्याचे कर्ण जाऊन तो बधिर होणार, आणि त्यापासून ह्या दोघां स्त्रीभ्रतारांस बारा वर्षें वियोगजन्य दुःख होईल. ' तेव्हां हे खुदावंत, त्या सुखमय दुग्धांत हा विषबिंदु पडेल ह्यांत संशय नाहीं. असो, परमेश्वरा, त तुझी मर्जी. " महाराज, याप्रमाणें भविष्यवाद्याचें बोलणें ऐकून मला बरेंच स दुःख झालें. कारण, त्या वेळीं मला नुकतेंच थोडें थोडें समजूं लागलें होतें. सरकार, त्याचे सांगण्याप्रमाणें मला अनुभव तर आलाच. कारण, आतां माझे कांहीं पाळीचे दिवसही लोटले असावेत असें मला वाटतें. परंतु जरी मी खरोखर गर्भवती झालें आहें, तथापि पुढें घडून येणाऱ्या दुःखकारक प्रसंगामुळें तुह्मीं मला कारागृहांत नेऊन टाकावें, आणि आपल्या नियमाप्रमाणें उदयीक दुसरें लग्न करावें. खुदावंत, याप्रमाणें मीं आपलें सर्व वृत्त निवेदन करून न बोलण्याचें कारणही सांगितलें, आणि आपली जी माझें ·· पहा·कण्याविषयीं इच्छा होती तीही पूर्ण केली;

आतां उदयीक चालीप्रमाणें तजवीज करावी. मलाही आपल्या वियोगापासून फार दुःख होणार आहे; परंतु उपयोग काय? " याप्रमाणें तिचें दिवस लोटल्याविषयीं बोलणें ऐकून बादशाहा फारच खुष झाला; आणि तिला जवळ घेऊन म्हणाला, " अगे वेडे **हायातबी** असें कोठें जोशाच्या बोलण्याचा विश्वास धरून बसतात काय? जें कांहीं होतें तें खुदाच्या मर्जीनें होतें. असें जर जोश्याचें बोलणें खरें होत असतें, तर ते दारोदार पोटाकरितां कां हिंडते? तेव्हां त्यांच्यावर माझा अगदीं विश्वास नाहीं. तुझी व माझी पुण्याई सबळ होती, ह्मणून परमेश्वराच्या मर्जीनें आपल्या उभयतांच्या गांठी झाल्या, आणि त्यांत माझ्या नियमाचें सार्थक झालें, याबद्दल मला आनंद होत आहे. आतां उद्यां दुसरें लग्न करण्याची जरूर नाहीं, व यापुढें कधींच तुला अंतर देऊं नये असा माझा निश्चय झाला आहे. कारण, तुजसारखी चतुर बायको सर्व जगांतही मला मिळणार नाहीं. पहा, अभाग्याचे घरीं जशी कामधेनू यावी, तद्वत् तूं माझे घरीं आली आहेस. आजपर्यंत माझ्यानें पुरी खात्री करवली नाहीं, परंतु आतां मी समजतों कीं, मजसारखा सुखी कोणीच नाहीं. " असें परस्परांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत उजाडलें. नंतर राजानें सहस्त्रावधि हत्तींवरून शहरांत शर्करा वांटविली आणि गोरगरिबांस लक्षावधि रुपये दानधर्म केला. परमेश्वरकृपेनें बादशाहाचा नियम पुरा झाला हें पाहून शहरांतील प्रजाही सुखी झाली. कारण, आतां बादशाहा तीन महिन्यांनीं नवी स्त्री करणार नाहीं, व येथून पुढें स्त्रियांची जन्मकैद मोकळी झाली असें समजून सर्वांस आनंद झाला. **हायातबी**चे सांगण्यावरून बादशाहाची खात्री झाली कीं, तीन महिन्यांत न बोलण्याचें कारण काय, तर पुढें पुत्राच्या स्वरश्रवणानें आपला पति बहिरा होईल. परंतु या समजुतींत अर्थ नाहीं. असें जोशी लोकांचें बोलणें कोठें खरें होत असतें? प्रारब्धीं असेल तें होईल, असा विचार करून त्या दिवसापासून **हायातबी**चा खाण्यापिण्याचा बंदोबस्त उत्तम रीतीनें ठेवून आपणही तिच्या आज्ञेंत वागूं लागला. **हायातबीस** जेव्हां नववा महिना लागला, तेव्हां तर बादशहा तिजवर अगदीं जीवप्राण करी, व तो तिला क्षणभर देखील विसंबत नसे. एके दिवशीं बादशाहानें तिला जवळ घेऊन विचारलें, " सखे, खरेंच सांग, तुझ्या मनांत काय प्रिय वाटत आहे? जी इच्छा अ<sup></sup>कारण मी पूर्ण करीन. "

बादशहाचें असें हें बोलणें ऐकून **हायातबीनें** उत्तर केलें, " महाराज, माझे मनांत इतकेंच आहे कीं, आपण ज्या शंभर स्त्रिया विनाकारण बंदींत टाकिल्या आहेत, त्या सर्व सोडून आणून शहरांत त्यांना योग्यतेनुरूप ठेवावें; आणि कधीं कधीं त्यांजकडे आपणही जाऊन समाचार घेत जावा. दुसरें आपल्या बागांपैकीं जो उत्तम बाग असेल त्या बागेंत माझी बाळंतपणाची तजवीज ठेवावी अशी माझी इच्छा आहे." राजानें हें ऐकून तावडतोब बंदींतून संपूर्ण स्त्रिया सोडून प्रत्येकीस तिचे योग्यतेप्रमाणें वेगळें वेगळें ठेविलें आणि कधीं कधीं आपणही त्यांजकडे जाऊन प्रत्येकीचा समाचार घेऊं लागला. **हायातबीच्या** बाळंतपणाची बादशहानें **माहेजाद** बागेंत उत्तम प्रकारें तयारी करून तेथें आपल्या आवडत्या राणीस नेऊन ठेविलें. ती जागा फार रमणीय असून तेथलि हवा व पाणी उत्तम होतें.

तेथें गेल्यावर थोड्याच दिवसांत **हायातबी** प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. पुत्रोत्साहाचाही बादशहानें मोठा समारंभ केला; परंतु **हायातबीनें** पूर्वींच विनंति केली होती कीं, " मी प्रसूत झाल्यावर मी सांगेपर्यंत पुत्राचें मुख पाहूं नये, व त्याचा स्वरही ऐकूं नये, " ह्मणून बादशहास पुष्कळ दिवसपर्यंत पुत्रमुख पहातां आलें नाहीं.

**हायातबीचें** मूल जेव्हां जन्मलें तेव्हां तेथील सर्व खोलींत त्या बाळाच्या कांतीचा प्रकाश पडला. हें पाहून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. पुढें बारावे दिवशीं त्याचें नांव **अकबरशहा** असें ठेविलें. चंद्रकलेप्रमाणें उत्तरोत्तर **अकबरशहा** वाढत चालला, परंतु **हायातबीचे** आग्रहामुळें बादशहास त्याची भेट होत नसे. बादशहा येण्याचे वेळीं **हायातबीनें** **अकबरशहास** आपले आवडते दासीजवळ देऊन लांब पाठवावें.

याप्रमाणें त्या चतुर स्त्रियेनें पांच वर्षे बादशहाचे दृष्टीस **अकबरशहा** पडूं दिला नाहीं. **तनवीरशहाच्या** पुत्राची कीर्ति संपूर्ण राष्ट्रांत प्रसिद्ध झाली कीं, " असा देखणा मुलगा सर्व पृथ्वींत दृष्टीं पडणार नाहीं. केवळ परमेश्वरानेंच स्वतः त्यास आपल्या हातानें बनवून आपलें संपूर्ण तेज त्याजवळ ठेविलें आहे. " अशी वदंता जिकडे तिकडे पसरली. **अकबरशहास** पाहण्यास शहरांतील लोक तर येतीलच; परंतु हजारों कोसांवरून लोक एकवार त्यास पहाण्याच्या हेतूनें येऊन नित्यशः **माहेजाद** बागेंत

मोटी जत्रा भरूं लागली. कित्येकांनीं त्याच्या तसबिराही काढून नेल्या होत्या.

**हायातबीनें** त्याचे शिकण्याचीही उत्तम प्रकारें टापटीप ठेविली होती: तिनें मोठमोठे हुशार काजी व चतुर मुनशी ठेवून निरनिराळ्या देशभाषा, युद्धप्रकार, शारीर कसरती वगैरे विद्या मोठ्या मेहनतीनें व आस्थापूर्वक शिकविल्या. तसेंच गायनप्रकार व शिल्पशास्त्रांतही त्यास चांगला हुशार केला.

**अकबर** सुमारें बारा वर्षांचा झाला तेव्हां संपूर्ण विद्येंत तो मोठा उत्कृष्ट शहाणा झाला आणि त्याचें रूप तर केवळ मदनाप्रमाणें दिसूं लागलें. तें पाहून **हायातबीनें** नित्यशः त्याची दृष्ट काढीत असावें.

**अकबरशहाचे** गुण, शिकारींतील त्याचा पराक्रम आणि त्याच्या स्वरूपाचें वर्णन दररोज **तनवीरशहापुढें** हजारों लोकांनीं करावें. तेव्हां पुत्राची नेहमीं विलक्षण स्तुति लोक करतात, आणि आपण तर त्याचें तोंडही पाहिलें नाहीं; म्हणून बादशहास वाईट वाटून त्यानें **हायातबी**ची प्रार्थना करावी. परंतु तिनें उत्तर द्यावें कीं, “ महाराज, आज नाहीं, आणखी एक महिन्यानें त्याची भेट करीन. पुनः महिना झाल्यावर बादशहानें **अकबरशहाच्या** भेटींविषयीं विचारलें, म्हणजे तिनें आणखी आठ चार दिवसांचा वायदा करावा. ह्याप्रमाणें चाळवितां चाळवितां **अकबरशहा** बारा वर्षांचा झाला.

एकदां कोणा एका गृहस्थानें **तनवीरशहा** कचेरींत बसला असतां **अकबरशहाची** तसबीर आणून त्यास सहज दाखविली. ती पाहतांच बादशहा फार घाबरा होऊन मोठ्या घाईनें **माहेजाद** बागेंत गेला; आणि **हायातबीचे** महालांत जाऊन तिला म्हणाला:—

“ आब इसवक्त **अकबरशहा** नजर आये बिगर हमारा जान नहीं रहता. जलदी मुलाखत करो, नही तो ये कट्यारसे मै आपनी गर्दन तोड डालता हूं. **अकबरशहा**बिगर ये दिलकू और कुच नही होना. देख **हायातबी**, बारा बरस हुवे, **अकबरशहा**की तारीफ मै सब लोगके मुसे सुनता हूं. और उसकू देखनेके वास्ते मै आज दिन तलक तुमारी बात सुनकर तहकुबी किई, लेकीन आब हामकू दम नही है. उस्से मुलाखत बिगर मेरी जान जाती है. उसवास्ते, मेहरबानी करके इसवक्त हमारे लड-

केकी हमारी मुलाखत करो. नही तो देख, आबी तुमारे सामने मै आपनी तनकी खैरात कर लेताहूं. सुन **हायातबी अकबरशहा** बिगर ये सब राज हामकू काहेकू होना? ए हमारी शरीरकी जानी तो निकल गई, आब ये बुढेपनमो लडके बिगर और कुच सुख नही है. उसवास्ते, तुमकू जो मेरी जानकी गरज है, तो मेरा लडका जलदी बतलाव, नही तो देख, समशेर गर्दनपर रखी है." याप्रमाणें बोलून **तनवीरशहानें** तरवार आपल्या मानेवर ठेविली. हें पाहून **हायातबीनें** ती हिसकावून घेतली; आणि मोठ्या नम्रतेनें हात जोडून म्हणाली, "महाराज, कोप शांत करावा. **अकबरशहाची** आपली आतांच भेट करवितें. परंतु प्रार्थना इतकीच आहे कीं, आपण त्याला कांहीं बोलवूं नये, आणि त्याचा स्वरही ऐकूं नये. कारण मला लहानपणीं जोतिष्यानें सांगितल्याप्रमाणें सर्व गोष्टी अनुभवास आल्या आहेत, तशी जर ही गोष्ट अनुभवास आली तर मग वाईट होणार आहे. कारण, त्याचें भाषण ऐकून आपण बधिर होणार आहांत, सबब प्रार्थना करतें. **अकबरशहा** रूपानें व गुणानें पसंत असला तरी मला तुमच्यापेक्षां जास्त नाहीं; आणि जेणेंकरून आपलें एक इंद्रिय कमी होणार ती गोष्ट मला सर्वथैव करणें नाहीं. याकरतां जर त्याचा स्वर न ऐकाल, तर **अकबरशहाची** व तुमची आतांच भेट करवितें." असें **हायातबीचें** भाषण श्रवण करून बादशहानें ती गोष्ट कबूल केली. मग तेव्हांच तिनें आपल्या दासीस हुकूम केला कीं, "**अकबरास** सुंदर पोषाक व उंची जवाहीर घालून जलद इकडे घेऊन या." **तनवीरशहा** बसला आहे तोंच **अकबरशहास** शृंगारून आणिलें. पुत्र पाहतांच त्यांस किती आनंद झाला असेल ह्याचा विचार तुह्मीच करा. बादशहानें मुखचुंबन घेऊन त्यास मांडीवर बसविलें आणि मुखावरून सहस्रावधि मोहरा उतरून खैरात केल्या. त्या वेळेस पुष्कळ याचकांची इच्छाही बादशहानें तृप्त केली.

**अकबरशहास** पूर्वींच **हायातबीनें** सुचविलें होतें कीं, सरकारांनीं कितीही आग्रह केला, तरी मी सांगेपर्यंत तूं त्यांचे बरोबर बोलूं नको. **अकबरशहा** मोठ्या आनंदांत येऊन त्यानें आपल्या बापाचे कंठास मिठी घातली आहे अशा वेळीं बादशहासही कांहीं स्मरण न राहतां तो प्रेमांत येऊन त्याचे सुंदर मुखावरून हात फिरवून म्हणाला, "बेटा **अकबरशहा**,

तूं किसीका प्यारा ? हमारा के माका ? बोल तुजकू क्या चिज होना ? कोन हैरे ह्यां ? जरा आच्छी मिठाई लाव." मुलाचे मुखांत एक हलव्याचा तुकडा घातला. तो खाऊन मग **अकबरशहानें** उत्तर दिलें, " सुनो सरकार, मै आजदीन तलुक माका था, लेकीन आज दिनसे तुमारा ताबेदार हुवा है. आब जो चाहेसो हुकूम फरमावो, आबके वास्ते जॉनकाबी परवा नही रखुंगा. सरकार, जरा एक आरज करताहूं. आबके घुस्सेसे आपका दर्शन, आजदीन तलुक नही हुवा, ये बडी आचंबेकी बात है. आबकी मुलाखात हुइ, उसवास्ते आजका दीन खुदानें बहुत आच्छा बनवाया है. सरकार, आज दिनसे सब घुस्सा छोडकर ये गरीब लडकेके उपर मेहरबानी करके हामेश आबकी मुलाखत देना चाहिये. "

याप्रमाणें बादशहानें **अकबरशहाचें** बोलणें ऐकतांच त्याच्या दोन्ही कानांत गर्द अंधार होऊन बळकट कानठाळ्या बसल्या, आणि पुढें बिलकूल ऐकूं येईनासें झालें. त्याप्रमाणें त्या आनंदमय अमृतांत **अकबरशाहाचे** शब्द विषबिंदु पडून सर्वांस अतिशय दुःख झालें. नंतर बादशहा म्हणाला, " जोशी लोकांच्या सांगण्यावर विश्वास ठेवूं नये म्हणून मीं जें **हायातबीस** सांगितलें, तें खोटें होऊन आज मजवर हे दिवस प्राप्त झाले. जोंपर्यंत कोणत्याही मनुष्याचीं संपूर्ण इंद्रियें कायम आहेत, तोंपर्यंत त्याला काय तें सुख, त्यांतून जर का एक कमी झालें, तर मग त्याचे दुःखास अंत नाहीं. असो, आपल्या प्रारब्धीं जें होतें तें घडून आलें; आतां शब्द कोणावर ठेवून उपयोग नाहीं. " असें म्हणून नंतर तो सर्व बोलणें खुणेनें बोलूं लागला. पुढें गांवांतील मोठमोठे चतुर हकीम आणून बादशहा त्यांस म्हणाला, " एकवार जो पूर्वींचा पुत्राचा व माझा कांहीं दोषसंबंध होता तो मीं प्रस्तुत भोगिला आहे; परंतु यापुढें जो माझ्या कर्णांस उपाय करून ते पूर्ववत् करून देईल त्यास मी एक कोट रुपये बक्षीस देईन. "

नंतर शेकडों हकिमांनीं येऊन बादशहाच्या कर्णांस उपाय चालविले. शिवाय बादशहा बहिरा झाला ह्मणून चहूंकडे वदंता झाल्यामुळें हजारों वैद्य बाहेर गांवांहूनही **अरहतआबाद** शहरीं येऊं लागले. **तनवीरशहा** असा बहिरा झाला ह्मणून **हायातबीस** फार दुःख वाटत असे, एके दिव-

शीं **हायातबी** आपल्या बागेंत महालांत एकटीच बसून गुडघे टेंकून खुदाची विनंति करीत होती, त्या वेळीं **अकबरशहा** तिचे भेटीकरितां महालांत येत होता, तों मातोश्री एकटीच आपल्या ठिकाणीं खुदाची प्रार्थना करीत आहे असें पाहून त्यानें विचार केला कीं, प्रार्थना आटपल्यानंतर आंत जावें, तोंपर्यंत येथें बाहेर उभें राहून मातोश्रीची प्रार्थना श्रवण करावी. असा विचार करून तो तेथें एका दाराआड उभा राहिला. त्या वेळीं **हायातबीच्या** तोंडांतून उद्गार निघाले ते— हे खुदांवत, मै बडी चांडाळ पातकी अवरत हूं. ऐसे ए हारामकू काहेकू पैदा करे. पैदा हुवे वक्त मै मरती, तोंच कुच फिकीर नहिथी. लेकीन हमारे सरकारकू ऐसें दु:ख हुये, ये दु:ख मेरेकू नही दिखावे. हमकू लडका नहीं होता तो कुच हरकत नहीथी. लेकीन लडका होकर हमारे बादशहाकू ऐसा दु:ख हुवा, ये बात कुच आच्छि हुवी नही. माबापकू तसदी देनेवाला लडका पैदा होकर क्या काम है? जान आच्छा तो सबकुच आच्छा. हमारी और हमारे बादशहाकी तन आच्छि रही, तो ऐसे लडके बहुत पैदा हुवेगे. ये **अकबरशहा** हमारे पेटकू नही आता, तो कुच परवा नहीथी. लेकीन क्या करूं? आब कुच इलाज नही है. आच्छा खुदावंत, मर्जी तुमारी." याप्रमाणें **हायातबी** आपणाशींच बोललेले शब्द **अकबरशहानें** ऐकून त्यास पश्चात्ताप झाला, आणि विचार करतो कीं, "हर हर! परमेश्वरा? मी पोटीं येऊन आईबापांस अतिशय दु:ख दिलें. त्यापेक्षां उपजतांच मेलों असतों तर बरें होतें. ह्यांचे पोटीं पैदा होऊन ज्यापेक्षां ह्यांना आपल्यामुळें दु:ख झालें, त्यापेक्षां धिक्कार असो या देहास! मी आजपर्यंत व्यर्थ एरंडासारखा वाढलों. माझे रूपास आणि गुणांस काय चाटावें? अरे **अकबरा**, तुझ्या भाषणांत इतका दोष त्यापेक्षां तुझा संपूर्ण देह किती दोषी असावा? तेव्हां असा पातकी देह आतां जगण्यास योग्य नाहीं, त्यापेक्षां प्राण द्यावा हें बरें. एक बापाचे कर्णास चांगलें औषध मिळवून त्याचे कर्ण तरी पहिल्याप्रमाणें करावेत नाहींपेक्षां प्राण द्यावा हें बरें. आतां दोहोंतून एक गोष्ट करणें जरूर आहे. परंतु पूर्वी सरकाराच्या कर्णांस होईल तितका प्रयत्न करून औषध मिळवावें. कारण, प्राण द्यावा तर मनुष्यदेह वारंवार मिळत नाहीं, आणि मनुष्यदेह जें करील तें होईल असें आहे. ह्मणून आतां लांब

कोठें जाऊन पूर्वीं औषधाचा तपास करूं; आणि न मिळालें तर मग हा देह पैगंबरास अर्पण करावा." असा विचार करून **अकबरशहा** महालाबाहेर निघाला व त्या दिवशीं त्यास दिवसभर चैन पडलें नाहीं. रात्रौ कोणास न कळत **अकबरानें** आपला घोडा सोडून त्याचा सर्व सरंजाम वगैरे बेतानें आपण आपल्या ढालतरवारीसह **माहेजाद** बागेच्या बाहेर पडला.

दरकुच दरमजल जातां जातां एक महिन्यांत तो बराच लांब जाऊन त्यानें अनेक देश व पुष्कळ शहरें पाहिलीं, आणि ठिकठिकाणीं औषधाचा बराच तपास केला. एके दिवशीं रात्रौ तो आपल्या घोड्यावर बसून एकटाच मोठ्या जलदीनें एका घोर अरण्यांतून चालला आहे. ती रात्र चांदण्याची असल्यामुळें प्रथम तर त्यास कांहीं कठीण वाटलें नाहीं, परंतु पुढें चंद्रास्त झाल्यावर मग मात्र त्यास अगदींच मार्ग दिसेना. पांच सात कोश निघून गेल्यावर घोडा मार्ग चुकून भलत्याच अरण्यांत शिरला. कांहीं वेळ त्या घोड्यास पायवाट मिळाल्यामुळें तो पुढें चालला. नंतर तीही वाट चुकून घोडा अगदीं दाट झाडींत, जेथें कांहींच दिसत नव्हतें, अशा स्थळीं जाऊन पोहोंचला. तेथें वाट तर कोठेंच नव्हती. आणि एकसारखा चढाव असून चहूंकडून उंच पर्वतांखेरीज कांहींच दिसेना. शिवाय त्या भयंकर ठिकाणीं वाघ, लांडगे, आस्वलें वगैरे हिंसक पशूंच्या आरोळ्या चहूंकडून येऊं लागल्या. किर्र असा रात्रीचा नाद अष्ट दिशांत भरून राहिला आहे. घटकेंत कोठें जाळ निघाल्यासारखा भास होऊं लागला. अशा भयंकर स्थळीं **अकबरशहास** कोणीच सोबतीस मिळेना, आणि घोडा पुढें पाऊलही टाकीना. कारण, कोठें सपाट मैदान, कोठें कंबरेइतकें उंच टेंकाड अशी जागा असल्यामुळें त्याचा अगदीं नाइलाज झाला. त्यानें विचार केला, "आतां घोड्यावर बसून फायदा नाहीं. कारण, कदाचित् एकाद्या कड्यावरून घोड्यासहित खालीं जाऊन आपण प्राणास मुकूं, याकरितां पायीं चालावें हें बरें." असा विचार करून **अकबरशहा** खालीं उतरला, आणि एका हातांत घोड्याचा लगाम धरून दुसऱ्या हातानें काठी टेंकीत हळूहळू पुढें चालता झाला. एक दोन कोस गेल्यावर पहातो तों पुढें एक मोठा भयंकर कडा तुटला आहे आणि कोठेंच मार्ग नाहीं; शिवाय आसपास मोठमोठे वृक्ष दाट

लागून गेल्यामुळें त्या भयंकर अरण्याखेरीज त्यास कांहींच दिसेना. प्रकाश तर काजवा चकमत होता तेवढा मात्र. असें अरण्य पाहून **अकबरानें** विचार केला कीं, "आतां उरलेली रात्र येथें या झाडाच्या पायथ्याशीं काढून नंतर उजेडल्यावर पुढें जाऊं." असा विचार करून **अकबरानें** तो घोडा तेथेंच त्या झाडास बांधून आपण त्याचे पाठीवरील भरजरी गाशा खालीं आंथरून स्वस्थ बसून राहिला. परंतु तें भयंकर ठिकाण जाणून त्यानें आपली समशेर नागवी करून हातांत घेतली होती; तसाच पिस्तुलांत बार भरून सावध रीतीनें बसला होता. असा बसला आहे तों तीन प्रहर रात्र झाल्यामुळें चहूंकडून गार वायु अंगास लागूं लागला.

**अकबरशहा** दिवसभर चालून दमला होता, सबब त्या मधुर अमृतवेळीं त्यास बसल्याजागींच डोळा लागला. त्यानें त्या झाडाच्या पायथ्याशीं डोकें टेंकून अंमळ डोळे झांकले. इतक्यांत त्यास गाढ झोप लागली. तेव्हां सूर्योदय होऊन त्याचे अंगावर किंचित् उन्हाची तिरीप पडली असें त्यास वाटून तो सावध होऊन इकडे तिकडे पाहूं लागला. पुढें एक अपूर्व देखावा त्याच्या दृष्टीस पडला. तो असा,—आपण एका उत्कृष्ट हस्तिदंती छपरी पलंगावर निजलों आहों, भोंवतालीं मोत्यांच्या झालरी सोडल्या असून सफेत बारीक जाळीदार मच्छरदाणी शोभत आहे. खालीं उत्तम पराचा किनखापी बिछाना, त्यावर सफेत सरपोस टाकून ठिकठिकाणीं उश्या, गिरद्या, मांडउश्या, हातउश्या ठेविल्या आहेत. असें पाहून **अकबरशहा** पहिल्या कुशीचा दुसऱ्या कुशीवर वळून पहातो, तों आपल्या अंगाखालीं उत्तम पुष्पें आंथरलीं आहेत, आणि या सर्व पलंगाच्या मच्छरदाणीच्या आंत केशरकस्तुरीचा व पुष्पांचा वास भरून गेला आहे. असें पाहून राजपुत्रास वाटलें, काय मी स्वप्नांत आहें काय ? स्वप्नांत ह्मणावें तर आपण डोळे उघडून पहातों आहों. काय असेल तें असो. उठून बसावें ह्मणजे काय तें समजेल. **अकबरशहा** उठून बसला, आणि पाहूं लागला, तों आपल्या शेजारींच पुष्पशय्येवर एक उत्कृष्ट तारुण्यांत आलेली स्त्री निजली आहे. तिनें पिंवळा भरजरी शालू नेसून एक हात मानेखालीं ठेविला आहे, व आपला मुखचंद्र हस्तकमलावर ठेवून नेत्रकमलें झांकिलीं आहेत; आणि किंचित् हास्यवदन करीत निजली आहे असें पाहिलें. अहाहा ! काय सांगावें तिचें स्वरूप ! तें पूर्ण शशांकवदन पाहून **अकबरशहा** अगदीं

भांबावून गेला. तिची ती निद्रिस्त मोहनमूर्ति पाहातांच तो मदनानें घायाळ झाला. संपूर्ण पायांचीं बोटें केवळ चवळीच्या शेंगेप्रमाणें सडैसडीत असून पायांतील अंगठ्यांत फक्त रंगजोडवीं व वरतीं शिंदेशाई तोडे शोभत होते. पोटऱ्या तर केवळ केळीचे कोंबच. तिचे ते पोटऱ्यांइतके उघडे पाय पाहून **अकबरशहाचे** पोटांत विषयसमुद्रास भरतें आलें; परंतु भीतीस्तव त्यानें मनस्तरंग आंवरून धरून बाहेर येऊं दिले नाहींत.

राजपुत्र पुनः तिला न्याहाळून पाहूं लागला. तेव्हां पश्चाद्भागीं त्या शालूच्या चुण्या व अंगावरील पदराचा लफ्फा पसरलेला झळकत होता. तसाच कटिप्रदेश आकुंचित असून त्याखालीं गंडस्थलवत् जागा| शोभत होती. शालू नेसण्यांत तर तिनें चतुराईच खर्चिली असेल ह्यांत संशय नाहीं. अंगांत शुभ्र, बारीक, जाळीदार, दोरव्याची जरीकांठी काचोळी तटतटीत रेखली—बसविलेली असून भरजरी कटोऱ्यांतून दोन लहान सुवर्णकलश लपवून ठेविले आहेत. असें पाहून **अकबर** मनांत ह्मणतो, अहाहा ! पूर्ण चतुर भाग्यवंत असल्यावांचून ही चोरी कोण बाहेर काढील ? अरे **अकबरा**, ही हृदयाजवळील जागा किती विस्तीर्ण आहे पाहिलीस का ? येथील कांति तर शुद्ध केतकीवर्णाप्रमाणें भासत आहे. अरे, तसेंच न्याहाळून पहा, सुवर्णचांफ्याप्रमाणें गौरवर्ण असतांही केशरमिश्रित मैलागिरी चंदनाची उटी लाविली आहे. त्याप्रमाणेंच पाचमिश्रित मोत्यांचीं पेंढीं व रत्नखचित चंद्रहाराचा सर्व शरीरावर प्रकाश पडला आहे. मुख पाहून तर माझी तहानभूक हरली. शाबास ब्रह्मदेवाची ! संपूर्ण मोहक वस्तूंत स्त्रीसारखी अन्य मोहक वस्तु दुसरी कोणतीच नाहीं, आणि या मनुष्यदेहांत येऊन सुखें काय तीं दोन, एक तारुण्य-वयांत अशा सुंदर स्त्रीशीं समागम तरी करावा, नाहींतर शुद्ध फकीर होऊन मक्केस तरी जावें; तेथें राहून त्रिकाल निमाज पढून पैगंबराची सेवा करावी. याखेरीज अन्यत्र तिसरें सुख या मनुष्यदेहांत नाहीं. तात्पर्य, आपल्यासारख्या विलासी प्राण्यास जर अशा रमणीय स्त्रीचा स्नेह संपादन होईल, तरच या देहाचें सार्थक; नाहींपेक्षां व्यर्थ आयुष्याचा नाश करून देह वाढवावा यांत अर्थ नाहीं.

असा विचार करून पुनः तिच्या निद्रिस्त देहास अवलोकन करून **अकबरशहा** फारच मोहित झाला. त्याच्या मनांत आलें कीं, हिला जागृत

करावी, ह्मणून हळूच तिच्या अंगास स्पर्श करणार इतक्यांत आपल्याशींच चपापून ह्मणतो, “ अरे **अकबरा**, ही कोणाची स्त्री ? हिची जात कोण ? मनुष्य आहे किंवा राक्षसीण ? यक्षीण किंवा नागकन्या आहे याचा विचार केलास का ? नाहीं तर व्यर्थ प्राणास मात्र मुकशील. कारण, आपण या भयंकर अरण्यांत आज सुमारें दोन प्रहर रात्रीं एका झाडाशीं टेंकून बसलों होतों; आणि आतां ह्या ठिकाणीं कसे आलों ? बरें, मजजवळ माझा घोडा बांधला होता तो कोठें आहे ? शिवाय माझें पिस्तूल आणि समशेर कोठें गेली ? का मी स्वप्नांत तर नाहीं ना ? ( पुनः आपल्याशींच ) छीः ! वेड्या, स्वप्न कोठें असें दिसतें काय ? हा पहा मी आतां उठून उभा राहतों. ” असें ह्मणून उठून उभा राहिला, तों वरतीं पलंगाची मच्छरदाणी आणि मोत्यांची झालर त्याच्या डोक्यास लागली. तेव्हां खचीत मी पलंगावर आहें, याविषयीं त्याची खात्री झाली; परंतु पुनः थोडा संशय वाटल्यामुळें पलंगाबाहेर येऊन पाहूं लागला, तों हें मंदीर केवळ **कुबेरा**च्या मंदिरतुल्य त्यानें पाहिलें. सहस्त्रावधि हिरवीं, पिवळीं, जांभळीं अशीं रंगीत झाडें व हांड्या लटकल्या असून त्यांमधून उत्तम सुवासिक मेणबत्त्या जळत आहेत. शुद्ध छताभोंवतीं मोत्यांच्या झालरी शोभत असून भिंतींवरून सोनेरी चित्रें केवळ खेळून राहिलीं आहेत, आणि त्या सर्व दिवाणखान्यांत जिकडे तिकडे मेवामिठाई, फळफळावळ, सुगंधोदकें, टेबलें, खुर्च्या, किनखाबी कोंचें, उत्कृष्ट मौल्यवान् मातीचीं चित्रें, तशाच सुस्वरूप कित्येक राजांच्या व राजकन्यांच्या सुरेख मनोवेधक तजबिरी, असे उंची तऱ्हतऱ्हेचे जिन्नस मांडून ठेविल्यामुळें तें मंदिर केवळ इंद्रभुवनाप्रमाणें शोभिवंत दिसत होतें. हा सर्व प्रकार पाहून **अकबरशहा** अगदीं गर्क होऊन गेला. आणखीही या ठिकाणीं काय काय चमत्कार आहेत ते पहावेत, असा विचार करून तो पुढें गेला, तों एक मोठा दरवाजा त्यानें पाहिला. तेव्हां **अकबरशहा** त्या दरवाज्याचे आंत गेला आणि पहातो तों, पहिल्या दिवाणखान्यापेक्षां शतपट सुंदर महाल त्याच्या दृष्टीस पडला. मग तेथील अपूर्व शोभा व उत्तम उत्तम वस्तु, ज्या कधींच पाहण्यांत न येणाऱ्या, किंबहुना त्या इंद्रभुवनांतही दृष्टीस पडावयाच्या नाहींत, अशा रमणीय अमोल्य वस्तु पाहून **अकबरशहा** फारच खूष झाला. परंतु त्याच्या मनांत भीति उत्पन्न झाली कीं न जाणो ! या सर्व

ऐश्वर्याचा भोक्ता कोण आहे, याचा खुलासा समजत नाहीं. तेव्हां पुढें जाऊन कोणतें संकट आपणावर पडेल, ईश्वर जाणे! सबब माघारें फिरावें असें त्याच्या एकदां मनांत आलें, परंतु पुनः त्यानें विचार केला कीं, जीव काय. केव्हां तरी जावयाचा आहे; परंतु असा अपूर्व देखावा कधीं दृष्टीस पडावयाचा नाहीं.

असें ह्मणून तो पुढें पुढें पहात चालला. याप्रमाणें एकापेक्षां एक शतगुणित अधिक सुंदर असे त्यानें नव्याण्णव दिवाणखाने पाहिले आणि शंभरावा महाल त्याच्या दृष्टीस पडल्याबरोबर मग तर त्याची दृष्टिच उघडेना. डोळे दिपून गेले, सुवासानें तर तो अगदीं वेडा होऊन गेला, संपत्ति पाहून त्याची छातीच दडपली, तेव्हां मग पुढें जाऊन पाहण्याचा दम नाहीं, असा विचार करून तो तेथूनच परत वळला. इतक्यांत दीन स्वरानें करुणा भाकून कोणी रडत आहे असा आवाज त्याच्या कर्णीं येऊं लागला. तेव्हां प्रथम तर हा अगदीं भिऊन गेला; परंतु पुढें तो आवाज माणसाचाच आहे, अशी खात्री वाटल्यावरून तिकडे जाऊन तपास करावा, असें त्याच्या मनांत घोटाळूं लागलें. शेवटीं त्यानें मनाचा असा निश्चय केला कीं, दीनवाणीनें कोण कण्हतो आहे ह्याचा शोध केल्याखेरीज पुढें जाणें हें थोर मनाच्या मनुष्यास योग्य नाहीं.

असें ह्मणून पुढें जाऊं लागला. कांहींसा पुढें गेला तोंच त्याला तेथें एक खालीं उतरून जाण्यास जिना दृष्टीस पडला. मग त्या जिन्यानें खालीं उतरून गेला, तों बरेंच लांब, निबिड अंधकार ज्यांत आहे असें विवर त्याच्या दृष्टीस पडलें. नंतर त्यानें हिय्या केला व चापशीत चापशीत त्या भुयारांतून जाऊन तो भुयाराबाहेर पडला.

बाहेर निघाल्यावर पाहतो तों चौरसचौरस एक विस्तीर्ण बाग फुलझाडांनीं व फळझाडांनीं शोभतो आहे. दोहों बाजूंनीं सुंदर सुरूचीं झाडें सारखीं लावलीं असून मधून संगमरवरी रस्ते कोठें वांकडे वळविलेले, कोठें चक्कर घेतलेले, असे फारच शोभायमान दिसत होते. रस्त्याचे मधून चौक साधून तेथें सुंदर कारंजीं स्वच्छ जलानें भरलेलीं होतीं, आणि भोंवतालीं बटमोगरा आणि मोतियाचीं झाडें पुष्पांनीं भरून जाऊन शोभा देत होतीं. कारंज्यांचे तुषार आसपासच्या फुलझाडांवर जाऊन त्यांचा मधुर वास सर्व बागभर भरून गेला आहे. **अकबरशहा** चालला होता त्या रस्त्या-

वरून तर सर्व जाईचा वेल सोडून दिला होता, व त्याचप्रमाणें कोठें तऱ्हतऱ्हेचे सुवासिक पुष्पवेल प्रत्येक रस्त्यावरून सोडून दिले होते, आणि तेणेंकरून सर्व बागेंत हिंडलें तरी सूर्यकिरण म्हणून बिलकूल दिसत नसे. **अकबरशहा** बागेचे दुसरे अंगास पाहूं लागला, तों सर्व प्रकारच्या फुलझाडांच्या रांगांच्या रांगा आपली शृंगार-शोभा दाखवीत होत्या, तेणेंकरून चित्रविचित्र रंगीबेरंगी गालिचा आंथरला आहे काय असें वाटत असे. बागेच्या दुसऱ्या बाजूस पाहिलें, तों फळझाडांची गर्दी. त्यांत डाळिंबें चकोत्रें, पपनस, अननस, सिताफळें, रामफळें, पेरू, जांभळें, अंजीर इत्यादिक फळें झाडांवर अगदीं चिकार भरलीं आहेत. अशी रमणीय जागा पाहून कोणाच्या मनांत बरें आनंद होणार नाहीं ? किती श्रमी असला तरी त्याचा श्रम दूर करणें हाच बागेच्या अंगीं उत्तम गुण असतो, आणि ह्मणूनच सुज्ञ लोक आपल्या बागेस कधीं कधीं विश्रामबाग असेंही नांव ठेवीत असतात हें प्रसिद्ध आहे.

असो, त्या श्रमी झालेल्या **अकबरशहास** तो बाग त्या वेळीं विश्रामबागच झाला. आणि त्याला उल्हास होऊन तो म्हणतो, " वाहवा ! काय बहार आहे ! आपण तर सौख्यागारांत आहोंत. हें ठिकाण कोणाचें कां असेना, आपणास क्षुधा लागली आहे, तेव्हां पोट भरेल इतकीं फळें घेऊन खाण्यास हरकत नाहीं व तसें करण्यांत दोषही दिसत नाहीं. कारण, आपणास मालकाचा नाश, किंवा फळें तोडून घेऊन नुकसानी करावयाची नाहीं. फक्त क्षुधा भागण्यापुर्तीं फळें खाण्यास कोणती हरकत आहे ?"असो, असा विचार करून **अगबरशहानें** तेथील कांहीं फळें तोडिलीं, आणि एक स्वच्छ जलानें भरलेल्या कारंज्याचे कांठीं तीं खाण्याकरितां जाऊन बसला. नंतर एक फळ घेऊन तोंडांत घालणार, इतक्यांत पूर्वीं ऐकल्याप्रमाणें दीनवाणी व कण्हणें पुनः **अकबरशहाचे** कानांवर आलें.

रुदनाचा स्वर कानांवर येतांच **अकबरशहाचा** तोंडांतील घांस तोंडांत आणि हातांतील घांस हातांतच राहिला, आणि मनांत ह्मणतो,—" अरेरे ! मी फळें खाण्याकरितांच या ठिकाणीं इतक्या त्वरेनें आलों काय ? अरे, काय माझे मनास भूल पडली ! महालांतून निघाल्यास चार घटका झाल्या असून या बागेचीच मजा पाहतों आहें, आणि रडतो आहे कोण याचा

तपास करणें तसेंच राहिलें. अरेरे ! कोण प्राणी संकटांत आहे? त्याचें संकट दूर करणें सोडून फळें खाण्यास माझे मनानें प्रथम धांव घेतली काय? हरहर ! मजसारखा निर्दय मीच." असें ह्मणून स्वराच्या धोरणावर त्या दिशेस शोध करण्यास जाऊं लागला.

**अकबरशहा** पुढें गेला तों हजारों आंब्यांची गर्द झाडी लागून गेलेली, व मोठमोठे आम्रवृक्ष आपल्या शाखांसह आनंदानें नांदताहेत व यथेच्छ पसरले आहेत, असें त्यानें पाहिलें. त्यांत कित्येक फळांस पाड लागला आहे व कित्येक शेंद्री, पिंवळीं आणि लाल शोभत आहेत. असें निबिड अमृतवन पाहून त्याला पूर्वीं पाहिलेल्या स्थळांपेक्षांही हें वन आनंदमय वाटलें, परंतु ह्या अमृतफळां शेजारींच जहरी विषाचीं फळें आलेलीं त्यानें पाहिलीं. त्या योगानें पूर्वीं झालेल्या आनंदाचा अस्त होऊन, भय व विचार यांचा क्षणांत उदय झाला, आणि अंगावर थरारून कांटा येऊन अर्ध घटिका त्याचें मन शुद्धीवर न रहातां तो अगदीं वेड्यासारखा झाला. त्याची अशी स्थिति होण्याचें कारण काय ? तें पूर्वीं समजलें पाहिजे, हें उघड आहे.

तेथें पसरलेल्या प्रत्येक आम्रवृक्षावरून शेंकडों शिंकीं लटकविलेलीं होतीं, आणि त्या प्रत्येकांत एक एक मनुष्याचा मुडदा बांधून बसविला होता, असें दिसलें. तेव्हां प्रथम तर **अकबरशहास** भीति व विचार उत्पन्न होऊन तो अगदीं घोटाळ्यांत पडला, परंतु अर्ध घटिका झाल्यावर मनाचा निश्चय केला कीं, कांहीं होवो आणि कसेंही होवो, परंतु तेथें काय आहे, तें जवळ जाऊन पाहिलें पाहिजे. असा विचार करून तो थेट झाडाजवळील अगदीं मुडद्याजवळ गेला. तेव्हां त्याचे दृष्टीस असें पडलें कीं, प्रत्येक आम्रवृक्षास शेंकडों शिंकीं बांधलीं असून त्यांत एक एक मनुष्य बांधून ठेविलें आहे, आणि बहुतेक मनुष्यें ती दुःसह व्यथा सहन न झाल्यामुळें शिंक्यांतले शिंक्यांतच मरून वाळून गेलीं आहेत. कैकांस धुगधुगी राहिली आहे, कोणी घटकेंत मरतील, कोणी हातपाय झाडताहेत, कित्येक पाण्यानें व्याकूळ झाले आहेत; परंतु तोंडावाटें शब्द काढण्यास अवसान नाहीं, ह्मणून तळमळ करताहेत. असें कृत्य पाहिल्याबरोबर **अकबरशहाच्या** अंगाचा अगदीं थरकांप होऊन सर्वांगावाटें थपथप घाम सुटूं लागला, आणि तो स्तब्ध झाला. मग आपल्याशींच

ह्मणतो कीं, " हें काय अघोर कृत्य ! आणि हें करणारा तरी कोण पाषाणहृदयी ? शिव शिव ! हे भगवंता, काय हें दुःख ! ! " असें ह्मणून त्याच्या डोळ्यांतून ढळढळां अश्रुधारा वाहूं लागल्या. तो पुनः मनांत ह्मणतो, " काय करूं ? माझ्यानें हें दुःख पाहावत नाहीं. या अशा घोर कर्म करणारास शासन दिल्याखेरीज आपण जावें काय ? व तसें केलें तर आपल्या शूरपणास बट्टा नव्हे काय ? पण हें कृत्य करणारा गुन्हेगार तरी कोण समजावा ? कदाचित् आपण जिच्या पलंगावर निजलों होतों ती तर नसेल ना ? कोण जाणे ! बरें ती ह्मणावी, तर ती जातीची स्त्री आहे, आणि शिंक्यांतील मरणोन्मुख प्राणी सर्व पुरुष आहेत, तेव्हां हें कसें ? आतां काय करावें ? कांहींच तर्क चालत नाहीं. बहुधा ती पलंगावर निजलेली स्त्री मोठी चेटकी असावी. कारण, आपण काल संध्याकाळीं झाडाशीं बसलों असतां तिच्या पलंगावर कसे आलों ? त्यावरून हा बाग व तें मंदीर सर्व तिचेंच असावें असें वाटतें, आणि हें कृत्यही पण त्या चेटकीचेंच. अरेरे ! माझीही दशा आतां अशीच होईल काय ? कोणीं पाहिलें तर मला धरून नेतील काय ? आतां कोठें पळूं ? बागेंत वाट तर कोठें दिसत नाहीं. चहूंकडून मोठमोठे उंच तट बांधले आहेत. मी कसें करूं ?" याप्रमाणें चार घटका **अकबरशहा** अगदीं संकटांत पडला. **अकबरशहा**चें घटकेंत अगदीं अवसान जावें, व घटकेंत पुनः वीरश्रीही यावी. पण उपाय काय ? तो अगदींच बिनहत्यारी होता, तेव्हां त्याचा नाइलाज झाला; नाहींतर तो इतका घाबरला नसता. शेवटीं त्यानें आपणाशीं विचार केला कीं, या सर्व अचाट संपत्तीचा मालक कोण, व हें अघोर कृत्य करणारा कोण, आपण येथें कसे आलों, याचा सर्व शोध केल्यावांचून व शोध लागला कीं त्यास शिक्षा केल्यावांचून येथून हालणें बरोबर नाहीं. मग यांत प्राण गेला तरी चिंता नाहीं; पण खुलासा काढला पाहिजे. असा विचार करून तो शोध लावण्याची तजवीज पाहूं लागला.

इतक्यांत शिंक्यामध्यें एक प्राणी नुक्ताच दोन तीन दिवस त्या दुर्धर विवंचनेंत सांपडला होता; यामुळें वरकड सर्व मुडदेमाणसांत तो अंमळ सशक्त असून तृषा लागल्यामुळें अगदीं कासावीस झाला होता. त्यानें शिंक्यांतून सुटण्याविषयीं होईल तितका यत्न केला, परंतु तो बळकट बां-

धला गेला असल्या कारणानें तो सर्व व्यर्थ गेला. शेवटीं तृषेनें अत्यंत कासावीस होऊन त्यानें करुणस्वरानें रडण्यास आरंभ केला.

**अकबरशहा** कांहीं भीतींत व कांहीं वीरश्रीचे विचारांत मग्न झाला होता. इतक्यांत पूर्वीच्या दुःखी प्राण्यांच्या विव्हळण्यापेक्षां कोणी बऱ्याच मोठ्या स्वरानें ओरडत आहे, असें त्यास वाटून तो धोरणानें वर सांगितलेल्या नूतन दुःखी मनुष्याजवळ आला.

उत्कृष्ट, भव्य चेहऱ्याचा व भरज्वानींत असल्यामुळें केवळ चंद्रवत् तेजदार दिसणारा, असा तो राजपुरुष एकाएकीं जवळ आलेला पाहून शिंक्यांतील प्राण्यास फारच आनंद झाला, आणि त्यानें हात जोडून प्रार्थना केली कीं " महाराज, आपल्या सर्व ऐश्वर्यावरून आपण पृथ्वीपति असावेत असें अनुमान होतें. आणि त्याप्रमाणें आपण असाल यांत संशय नाहीं, परंतु दुर्दैवेंकरून वाट चुकून या व्याघ्रजाळींत आलां असाल. धर्मशास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, ' दहा मेल्यास हरकत नाहीं; परंतु दहांचा पालन करणारा मरतां कामा नये, तरी आपल्या मुद्रेवरून आपण दहांचे पालनकर्ते अहांत असें वाटतें, तेव्हां आपण सुखी, तर तितक्यांचीं सर्व कुटुंबें सुखी. आपल्यास वांचविलें तर ज्या सर्व मनुष्यांचें आपण पालन करीत आहां, त्या सर्वांचा मला आशीर्वाद मिळेल. महाराज, आपणास मी आपली हकीकत थोडक्यांत सांगतों.

थोड्या दिवसांपूर्वीं मीही बऱ्याच अंशीं सुखी होतों; परंतु दैवदुर्विलासानें काममंत्राच्या स्वाधीन होऊन विषयरूपी सिंहिणीच्या हस्तगत झालों, आणि दर्शनीं सुख दिसल्यावरून मन स्वाधीन न ठेवितां मीच त्याचे स्वाधीन झालों. आणि त्या योगानें या भयंकर दुःखसागरांत बुडालों. महाराज, यापेक्षां एकदम मरण आलें तर फार उत्तम; असे शरीराचे हाल होऊन, झिजून झिजून मरणें हें नको. पूर्व जन्मीं कोणता ईश्वरी अपराध केला होता कोण जाणे! अरेरे, नको नको. असें दुःख वैऱ्यासही न होवो. असो? महाराज, आतां माझ्यानें फार बोलवत नाहीं. प्राण तर आज उद्यां जाऊन इतर शिंक्यांत जसे मुडदे बसले आहेत, तद्वत् माझीही दशा होणार यांत संशय नाहीं, आणि त्याबद्दल मी आतां दुःखही करीत नाहीं. परंतु आपलें हें अमोल तारुण्य पाहून मला फार वाईट वाटतें कीं, अशा सुंदर प्राण्याची आम्हांसारखी दशा न व्हावी

मी पदर पसरितों कीं, आपण आलां त्याच पायीं पळून जा कसे. मला येथून एक गुप्त मार्ग ठाऊक आहे तो तुम्हांस दाखवितों. त्या मार्गानें जलद नाहींसे व्हा कसे. अद्याप कोणीं तुम्हांस पाहिलें नाहीं, ही मोठी प्रारब्धाचीच सलामत; याकरितां पळा पळा लवकर; नाहींतर आपण पहात आहां कीं, जे आम्ही सहस्त्रावधि प्राणी या घोर यातना भोगीत आहोंत ती दशा आपणास प्राप्त होईल. यासाठीं माझ्या विनंतीकडे लक्ष्य देऊन आपण येथून लवकर चालते व्हा कसे. तो पहा त्या आम्रवृक्षाखालीं जो मोठा धोंडा पडला आहे, तो बाजूस करा, म्हणजे त्यांतून भुयार—मार्ग तुम्हांस पार करून नेईल. आतां मी कोण व यांत कसा सांपडलों, व हे सर्व पुरुष ही दशा कां पावले, व हें अघोर कृत्य करणारी कोण, आणि ती असें कां करते, वगैरे मजकूर सांगण्याला माझ्या शरीरांत अगदीं ताकत नाहीं, आणि तितक्यांतून सांगेनही, परंतु तें सर्व एकंदर सांगण्यास निदान तास-दोन-तास तरी लागतील. तेव्हां कदाचित् कोणीं दुष्ट अंमलदारांनीं वगैरे पाहिलें, तर लागलींच तुम्हांला या पंक्तींत येऊन बसावें लागेल. म्हणून मी सांगतों त्या मार्गानें झटकन् आपले गांवीं निघून जा, आणि दहांचें पालन सुखानें करा. प्रत्येक मनुष्यानें, तो जरी स्वतः मोठ्या संकटांत असला तरी, होईल तितका दुसऱ्यावर उपकार करीत असावें व हेंच ईश्वरास रुजू आहे. असो, तृषेनें तोंडास कोरड पडली आहे, सबब मोठ्यानें बोलवत नाहीं. ईश्वर तुमचें कल्याण करो. "

शिक्यांतील मनुष्याचे सांगण्यावरून अकबरशहाची खात्री झाली कीं, हें अघोर कृत्य करणारी ती पलंगावरील स्त्री असावी. बरें झालें, आपण तिच्या वाटेस गेलों नाहीं, नाहींतर आपणही या पंक्तीस येऊन बसलों असतों. असो, पण हें एवढें निर्दय कर्म करण्याचें कारण काय असावें, तें समजत नाहीं. या सहस्त्रवधि पुरुष-प्राण्यांनीं तिचा असा कोणता अपराध केला असावा बरें ? बरें जरी केला असेल, तरी अशी भयंकर शिक्षा देणें ही कोण रीत, आणि कोण न्याय ? शिवाय आपण या ठिकाणीं कसे आलों हें तर बिलकूल लक्ष्यांत येत नाहीं. काय आश्चर्य ! हा शिक्यांतील दुःखी फारच योग्य दिसत आहे. कारण, याची केवढी परोपकारबुद्धि कीं, आपण दुःख सोसतो आहे, तरी दुसऱ्याचें होईल तितकें दुःख कमी करण्याकडे याचें लक्ष्य ! अहाहा !

असे प्राणी फारच थोडे. आणि त्यांसच थोर म्हणावें, कीं, " भूतदया ज्यांजवळ जागृत. " असो, सदरील मनुष्य मोठ्या कुलांतला व अति योग्य चालीचा असून आपल्याप्रमाणेंच अवचित या स्थळीं प्राप्त झाला असेल. आणि पुढें तिच्या सुंदर स्वरूपास भुलून किंवा दुसऱ्या एकाद्या कारणावरून या दुःखांत पडला असेल. त्यानें सांगितलें म्हणून एकटेंच आपण या ठिकाणाहून गुप्त पळून जावें काय ? नाहीं; तर ज्यानें आपल्यास उपकारबुद्धीनें हा पार पडण्याचा मार्ग दाखविला, त्यालाही दुःखांतून मुक्त करून बरोबर घेऊन जावें हें योग्य. आणि शिवाय या सर्व शिंक्यांतून कोणी किंचित् सशक्त दिसला, तर त्यालाही सोडून घेऊन जावें. आतां प्रथम असें करावें कीं, लवकर या मनुष्यास थोडें पाणी पाजावें, म्हणजे हा बराच हुषार होईल. नंतर ह्याला सोडवावें, व आणखी कोणी जिवंत असतील त्यांना सोडवून आपण गुप्त रीतीनें निघून जावें. ज्यानें आपल्यास अशा वेळीं गुप्त मार्ग दाखविला, त्यास टाकून एकटेंच पळून जाणें हें आपल्या शीलाला उचित नाहीं.

असा विचार करून **अकबरशहानें** त्या दुःखी प्राण्यास लवकर पाणी पाजून शिंक्यांतून खालीं सोडविला, आणि आणखी कोणास सोडविलें असतां बरोबर येईल असा प्राणी त्यांत आहे कीं नाहीं, म्हणून तो शोध करीत आहे, इतक्यांत आठ हत्यारबंद शिपाई व एक सुभेदार ( हे शिपाई व सुभेदार सर्व स्त्रियाच होत्या. ) आणि सहा मोलकरणी डोकीवर भाकरीच्या टोपल्या घेऊन, व सहाजणी पाण्याचे हंडे घेऊन इकडेच येत आहेत असें त्यांच्या ( **अकबराच्या** आणि सोडविलेल्या प्राण्याच्या ) दृष्टीस पडलें. मग काय विचारतां ! त्या दोघांचें अगदीं अवसान नाहींसें होऊन ते थरथर कांपूं लागले. नंतर शिंक्यांतील प्राणी **अकबरशहास** म्हणतो, " महाराज, अझूनही आपण माझी आशा सोडून त्या गुप्त मार्गानें पळून जा. कारण, आधींच मला शक्ति नाहीं, आणि त्यांत ते यमदूत येताहेत हें पाहून तर माझें अगदींच अवसान गेलें. याकरितां त्या दुष्टांची नजर इकडे अजून आली नाहीं, व ते लांब आहेत, तोंच आपण पळून जावें. आतां माझी आशा आपण धरूं नये. कारण कीं, त्यांतून मीं सुटावें म्हणून आपलें जें कर्तव्य होतें तें केलेंत, पण हें दुःख टळणें माझ्याच कपाळीं नाहीं. त्यास आपण काय कराल ? म्हणून आपण आतां

पळा लवकर. आपण थोर व दहांचे पालन करणारे आहांत, तेव्हां वांचलांत तर त्या वांचण्याचें सार्थक होईल; आह्मांसारखे जिवंत काय व मेले काय सारखेच."

दुःखी मनुष्याचें हें भाषण ऐकून **अकबरशहानें** उत्तर दिलें कीं, मी असा हलक्या मनाचा व कृतघ्न मनुष्य नव्हे. तुमची परोपकारबुद्धि व भूतदया पाहून माझ्या मनास फार आनंद झाला. तेव्हां अशा उत्तम पुरुषास सोडून मीं एकटेंच जावें हें माझ्या थोरपणास शोभत नाहीं. मग या ठिकाणीं मेलों म्हणून काय दुनिया ओस पडणार आहे? त्यांत तुमचा आणि माझा एक क्षणाचा तरी पण स्नेह झाला, तेव्हां तुम्ही आणि मी स्नेही झालों; मग तुम्हांला संकटांत ठेवून मीं पळून जावें हें उचित आहे काय? आतां काय होणें असेल तें होवो. प्राण काय, केव्हां तरी जाणारच आहे; परंतु अस्सल पुरुषानें कृतघ्नता करूं नये. आणि ज्याच्या अंतःकरणांत खरी भूतदया वास करीत आहे, व जो कृतघ्न नाहीं, त्याच्यावर कोणताही प्रसंग आला तरी ईश्वर त्यास त्यांतून पार पाडतो, यांत संशय नाहीं. तसा तुमचा आमचा कैवारी आतां ईश्वर आहे. मी तर तुह्मांला सोडून व येथें दीनपणानें घटका अर्ध घटकेचे सोबती झालेले प्राणी यांस दुःखांत ठेवून एकटाच जीव घेऊन कधींही पळणार नाहीं. एक परमेश्वरानें मदत केली तर, असें अघोर कृत्य करणारास शासन देऊन, या दुःखी प्राण्यांस सोडवीन तरी, नाहींतर तुमच्याबरोबर येथें मीही आपला प्राण खर्चीन."

इतकी गोष्ट सांगून **किश्वरासिता मेहेरबशेला** म्हणाला, "कां सरकार, पुरुषाची जात स्नेहपणास किती लायक असते ऐकिलीना? **अकबरशहा**च्या गोष्टीवरूनच तुम्ही पहा कीं, पुरुष किती सदय अंतःकरणाचे व परोपकारी असतात, आणि स्त्रिया किती अघोरकर्मी, निर्दयी, कपटी आणि विश्वासघातकी असतात तें!

## तात्पर्य.

स्त्रियांपेक्षां पुरुषांचे अंगीं पुष्कळ सद्गुण सांपडतात, हा बळकट पुरावा देतां येईल. असें असतां त्या गोष्टीचा तिलप्राय विचार अज्ञानी स्त्रिया करीत नाहींत, आणि थोडीशी सत्ता हातीं असली ह्मणजे मग तर काय,

त्यांच्या अविचारीपणास अगदीं अंत रहात नाहीं. आतां जोंपर्यंत एखाद्या गोष्टीचा उजेड हृदयांत झाला नाहीं, तोंपर्यंत एखादी गोष्ट हातानें जर झाली तर चिंता नाहीं. परंतु खऱ्याखोट्याचा न्याय समजल्यावरही जर अन्याय होईल, तर त्याविषयीं मोठा भयंकर विचार पुढें उभा राहतो, म्हणून आजपासून पुरुष मारण्याचें काम सोडून देऊन तुम्हीं लग्न करावें, आणि वरचेवर न मिळणारी वस्तु जो मनुष्यजन्म, तो प्राप्त झाला आहे त्याचें सार्थक करावें, असें मला वाटतें."

**किश्वरसिता**चें हें भाषण ऐकून **मेहरवशे**च्या मनांत कांहीं चमत्कारिक पश्चात्तापाचे तरंग निर्माण झाले, आणि **किश्वरशितास** म्हणाली, "महाराज, आपण सांगितलें हें अक्षरशः खरें आहे, आणि त्याप्रमाणेंच सर्व विचार करण्यांत येईल; परंतु पुढें सांगा. मग पुढें काय झालें? **अकबरशहा**सही त्या शिक्यांत बांधून टाकलें काय? सांगा, सांगा, गोष्ट तर मोठी चटकदार असून ऐकण्यास किंचित् भयंकर व किंचित् आनंदाची अशी वाटते. त्यामुळें मला तर ती पुरी ऐकल्याशिवाय चैन पडणार नाहीं.

**मेहरवश** असें म्हणत आहे, तोंच दोन प्रहर रात्रीचा दिल्ली दरवाज्यावर डंका पडला. तेव्हां रात्र फार झाल्यामुळें नाइलाज होऊन बाकी राहिलेली गोष्ट आतां उद्यां पुरी करूं. असा निश्चय करून **मेहरवश** आपल्या महालांत निजावयास गेली, आणि **किश्वरसिता** तेथेंच झोंपीं गेला.

**मेहरवश** आपल्या पलंगावर निजल्यावर विचार करते कीं; "अहाहा! काय सुंदर गोष्ट सांगितली? माझ्या तर दृष्टीसमोर तो **अकबरशहा** दिसतो आहे; पण शेवटीं मग त्याची काय दशा झाली असेल कोण जाणे! मला वाटतें दोघेही त्या शिपायांच्या दृष्टीस पडले असतील, आणि त्यांनीं एकदम धरून दोघांसही शिक्यांत बांधलें असेल. अरेरे!! त्या बिचाऱ्या **अकबरा**वर केवढा दुःखाचा प्रसंग!! बिचारा करतो काय? परंतु त्याची हिम्मत मोठी! अशा वेळेस जर त्याजजवळ एखादें हत्यार असतें, तर तो कधीं भ्याला नसता. असो, पूर्ण विचार केला तर आम्ही स्त्रिया निर्दयी खऱ्या, आणि पुरुष दयाभूत खचीत. अहाहा! **किश्वरसिता** तरी त्या **अकबरा**सारखाच पराक्रमी दिसतो, पण करील काय? माझे हातांत बिनहत्यारी सांपडला, नाहींतर आम्हां सर्वांची खबर घेऊन तो निघून गेला

असता. बरें, तसें म्हणावें तर त्याच्या चर्येवरून व बोलण्यावरून त्याचा स्वभाव घातकी नसावा असें वाटतें; आणि जरी त्याजजवळ हत्यार असतें, तरी एकाएकीं निर्दयपणानें आम्हां स्त्रियांवर त्यानें हत्यार धरलें नसतें. कारण तो फारच चतुर पुरुष आहे. आजपर्यंत सहस्रावधि राजे मारले व दृष्टीनें पाहिले; परंतु **किश्वरसिता**सारखा देखणा, पराक्रमी, गंभीर व चतुर असा राजपुत्र कधींच पाहिला नाहीं. अहाहा! पुरुष तरी काय बाई! केवळ साक्षात् मदनच भूतळीं अवतार धरून माझी प्रतिज्ञा भंग करण्यास आला कीं काय असें वाटतें. आणि दैवयोगानें असें पुरुषरत्न हस्तगत झालें असून माझें कर्म कां मला सुख भोगूं देईना? आतां काय करूं? माझ्यानें दम धरवत नाहीं. कधीं जाऊन त्या सुंदर मनमोहनाच्या कंठास मिठी घालीन? मिठी घालीन, परंतु माझे कठोर हस्त त्या नाजूक कंठास कसे शोभतील? आग लागो माझ्या प्रतिज्ञेस! कोणीकडून बुद्धि झाली आणि या प्रतिबंधांत पडलें! अरेरे! तसें नसतें, तर आजची रात्र किती सुखाची गेली असती! या उत्तम पुष्पशय्येवर मी एकटी आज निजलें असतें काय? धिक्कार असो माझे स्वरूपास! मी व्यर्थ तारुण्य घालवीत आहें. असो, आतां काय उपयोग? एकवार जें सर्व जगतांत प्रसिद्ध झालें आहे, तें मोडून भलतेंच करतां येत नाहीं. एक मात्र खरें कीं, त्यानें जर या गोष्टींत पुरुषच उत्तम असें ठरविलें, तर मी हरलें असें दुनियेंत प्रसिद्ध करून आनंदानें त्याबरोबर शादी करीन. पण त्याचा काय नियम? कदाचित् शेवटीं त्याचे गोष्टींत पुरुष खरे असें जर ठरलें नाहीं, तर त्यास आपण मारावें कीं काय? छेग बाई! अशा मोहक स्वरूपावर हे माझे हात शस्त्र उचलतील तरी कसे?"

मित्र हो, पलंगावर पडून **मेहरवश** असा विचार करते आहे तोंच तेला डोळा लागला. इकडे **किश्वरसिता** तेथेंच निजला म्हणून सांगितलें. यास तरी झोंप कोठची? त्याच्या दृष्टीसमोर सर्व त्याचे वृद्ध मातापितर व **माहेजहा** उभी राहिली, मग काय? अशी तळमळ करतां करतांच याला एकदांचा डोळा लागला.

उजेडल्यावर सर्व दिवस मोठ्या आनंदांत व चैनींत जावा म्हणून **मेहरवशेनें** त्याची फार उत्तम रीतीनें टापटीप ठेविली. नंतर जेमतेम रीतीनें दिवस तर गेला, आणि रात्र झाल्याबरोबर जलद फराळ वगैरे आटोपून

**मेहरबश** दिवाणखान्यांत येऊन बसली, आणि दोघी दासी **किश्वरासितास** बोलावण्यास धाडल्या.

**किश्वरासिता** फराळ करून अंमळ शांतपणें बसला आहे, तोंच त्या दासी येऊन ठेपल्या, मग लागलींच **किश्वरासिताही मेहरबशेच्या** जवळ आला.

**किश्वरासिता** आल्याबरोबर **मेहरबश** झटकन् उठून लाजून पदर सांवरीत मर्यादेनें उभी राहिली. हें पाहून **किश्वरास** काय वाटलें असेल, याचा विचार वाचकांवरच सोंपवितों. असो, त्याला फार आनंद झाला, कीं, " जी मला, ' अरे, जारे, सोद्या, लुच्च्या ' खेरीज हांक मारीत नसे, ती आज इतका मान देते हें काय ? एकूण माझी गोष्ट ऐकून इतका तरी हिच्या स्वभावांत फेर झाला खरा. असो, याहींपेक्षां हिच्या मनास पश्चात्ताप करवून, सहस्त्रावधि ज्या हत्त्या होत आहेत, त्या बंद करवीन, आणि कदाचित् ईश्वरकृपेनें मिळाल्यास ही बायकोही मिळवीन. असो, सध्यां आली आहे ही वेळ साजरी केली पाहिजे खरी. "

नंतर उभयतां खालीं बसल्यावर **मेहरबश** म्हणाली, " महाराज, मग पुढें कसें काय झालें ? कालची गोष्ट तेवढी पुढें सांगा. मग तो **अकबरशहाही** शिंक्यांत सांपडला काय ! सांगाहो कृपा करून. मला त्या गोष्टीचा मोठा चटका लागला आहे. " **मेहरबशेचा** आग्रह पाहून **किश्वरासिता** पुढें गोष्ट सांगूं लागला.

---

# रात्र दुसरी.



तो म्हणालाः—" **अकबरशहा** आणि तो शिंक्यांतील मनुष्य असें बोलत आहेत इतक्यांत सुभेदारासह सर्व माणसें जवळ येऊन ठेपलीं. मग सुभेदार जवळ उभा राहून त्यानें त्या सर्व शिंक्यांतील मरणोन्मुख प्राण्यांस चतकोर भाकरी व गाडगें भरून पाणी असें वांटिलें; त्यांत ज्यांना कांहीं खाण्याची थोडीबहुत ताकत होती त्यांनीं तें खाल्लें, परंतु जे अगदींच घटका-दोन-घटकांचे सोबती होते ते काय खातात ! असो, भा-

करी वांटतां वांटतां शिंक्यांतील एक मनुष्य कमी आला, तेव्हां सुभेदारास ( सुभेदार व शिपाई सर्व स्त्रियाच होत्या. ) मोठें आश्चर्य वाटून तो म्हणाला.—" अरे, हें शिंकें रिकामें कसें ? यांत परवांच एक नवा मनुष्य **शादपुर**च्या राजाचा पुत्र बांधून ठेविला होता तो कोठें आहे ? बरें, सुटून हद्दीपार गेला असला म्हणजे बरें, नाहींतर कोणी दुष्ट स्त्रिया पुनः त्यास पकडून आणून दुप्पट हाल करतील. बरें झालें, बिचारा दुःखांतून सुटला, नाहींतर हाल सोशीत त्याला येथें मरावें लागलें असतें. असो, चला आतां सरकारास जाऊन सांगूं कीं, ' एक कैदी पळाला. ' "

सुभेदारणीचें व शिपायांचें हें जें बोलणें झालें, तें त्या उभतांनीं झाडा-आड उभें राहून ऐकिलें. तेव्हां **अकबरा**ची खात्री झाली कीं, सदरील सुभेदारीण स्त्री फार दयावंत दिसत आहे. अहाहा ! शाबास ! कैदी पळाला म्हणून हिच्या अंतःकरणास खरा आनंद झाला. मला वाटतें हिची समक्ष भेट घ्यावी, म्हणजे हा एकंदर काय खेळ आहे, तो समजण्यांत येईल. नंतर **अकबरानें** आपल्या मनांतील सुभेदारणीचे भेटीचा विचार त्या शिंक्यांतील स्नेह्यास सांगितला; परंतु त्यानें त्या गोष्टीस सल्ला दिला नाहीं. **अकबर** त्या सुभेदारणी स्त्रियेस पाहून फारच कामातुर झाला, आणि मनांत म्हणतो.

" अहाहा ! काय ऐटदार ही स्त्री आहे ! किंबहुना त्या पलंगावर निजलेल्या स्त्रीपेक्षांही ही अधिक सुंदर आहे यांत संशय नाहीं. शाबास ! स्त्रीजात होऊन काय ऐटदार पैठणीची कांस मारली आहे ! आणि तशीच भरजरी शेल्यानें कंबर कशी खेंचली आहे ! अहाहा ! चेहरा किती गंभीर व आनंदयुक्त दिसत आहे ! एक तर तारुण्याची ऐट, आणि दुसरें, उत्कृष्ट मरदानी पोषाक केला आहे, मग काय विचारावें ! अहाहा ! **अकबरा**, पोषाक मरदानी आहे म्हणून मुखावर स्त्री-जातीची कळा छपली आहे काय ? डोकीवर भरजरी मंदील बांधला आहे, म्हणून लांबलचक सडक केश छपले गेले आहेत काय ? नाहीं. तसेंच, समशेर हातांत घेतली म्हणून गोंडस सुकुमार हात छपतो कीं काय ! वः ! किती पाणीदार डोळे ! गाल किती टवटवीत ! भिंवया किती कमानदार ! अहाहा ! ईश्वरा, तूं धन्य आहेस. केवढें माझें नशीब ! घर सोडून निघालों म्हणून अशीं अशीं रत्नें दृष्टीस पडलीं. मघां पलंगावर पाहिली ती स्त्री

तरी किती सुंदर ! मी तिचें वर्णन मनांत करीत होतों तों तिजपेक्षांही ही सुंदर. शाबास ! एकून देशपर्यटनांत असे असे लाभ व अमोल वस्तु दृष्टीस पडतात. मीं घर सोडल्यापासून किती सुंदर शहरें पाहिलीं ? किती बाग, किती नद्या, किती अरण्यें, किती पर्वत आणि किती हजारों सुंदर चिजा पाहिल्या ! अहाहा ! देशपर्यटनावांचून शहाणपण व आनंद मिळत नाहीं. असो, आतां जीव जावो किंवा राहो; या सुंदर स्त्रीची भेट घ्यावी." असा विचार करून **अकबरशहा** आपल्या स्नेह्यास तेथेंच बसवून आपण त्या सुभेदारणीजवळ गेला.

एकाएकीं **काबुलदरीच्या** ( सुभेदारणीचें नांव ) दृष्टीस **अकबरशहा** पडल्याबरोबर, एक घटका ती चतुर **काबुलदरी** अगदीं मोहानें व्याप्त झाली; नंतर सावध होऊन आपल्या मैत्रिणीस म्हणाली—" सखे **नहीमुलखे,** ( **नहीमुलखा** ही एक शिपाई पोषाकाचीच होती. ) पाहिलास का समोर चंद्रोदय झाला तो ? अहाहा ! ईश्वरानें आज मजवर मेहरबानीच केली, व त्यानें आज माझी दाद घेतली खरी. आतां मजसारखी सौख्याधीश जगतांत कोणी नाहीं."

**काबुलदरीचें** भाषण ऐकून **नहीमुलखा** म्हणते सरकार, भर दोन प्रहर दिवस असतां ह्या वेळेस चंद्रोदय कसा झाला ? आपण कांहीं निशेंत आहां कीं काय ? "

**काबुलदरी**—" अगे **नहीमुलखे,** तूं म्हणालीस तीच गोष्ट खरी. या दुनयेंत सर्व प्रकारेची जलाल निशा आहे; परंतु निशेची जिन्नस दृष्टि पडल्याबरोबर निशा यावी, अशी कोणतीच निशा नाहीं. सर्व अशाच निशा आहेत कीं, निशेचें सेवन केल्यावर मग अंमल येतो; परंतु कामदेवाची निशा तशी नव्हे, स्त्रियेस पुरुष किंवा पुरुषास स्त्री मनायोग्य दृष्टीस पडतांच, लागलींच अशी निशा प्राप्त होते कीं, तिला उतारच नाहीं. असो, आतां मी समजून सांगतें कीं, आपली धनीण जी आहे ती केवळ शतमूर्खांतली मूर्ख आहे. याकरतां तुम्ही सर्वजण मी सांगेन त्याप्रमाणें जर वागलां, तर सर्वांचेंच कल्याण होईल. धर्मशास्त्रांत असे सांगितलें आहे कीं, 'बाप जर कुलासहित नरकांत जाण्याचें काम करीत असेल, तर पुत्रानें पित्याचा त्याग करावा. राजा जर अधर्मेंकरून आचरण करीत असेल तर प्रजेनें राजाचा त्याग करावा. तसेंच, धनी जर खोटीं कर्मे करीत असेल तर सेव-

कांनीं त्याग करावा. ' यावरूनच विचार करा कीं, आपली धनीण किती अघोर कर्म करीत आहे ! शेवटीं तिच्यासहित आपणास ह्या दुष्ट कृतीचा झाडा द्यावा लागेल. याबद्दल आपल्या सरकारास ( धनिणीस ) शेंकडों वेळां मीं बोध केला असेल कीं, " पहा सरकार, आपण हे असे विनाकारण पुरुष धरून आणून त्यांचे हाल करून मारतां हें बरोबर नाहीं. असें करण्यांत कोणता फायदा ? अमोल्य तारुण्याचे दिवस व्यर्थ जात आहेत, याकरितां लग्न करून मनुष्यदेहाचें जें सौख्य तें भोगून घ्या; ह्मणजे पुढें वंश वाढून इह व परत्र सर्वच लाभ होतील. बरें, कदाचित् लग्न करणें तुमच्या मनास येत नसेल, तर नका करूं, परंतु ही अघोर प्रतिज्ञा तरी सोडून द्या, आणि आपल्याबरोबर लक्षावधि स्त्रियांस ही जी पुरुषांविषयीं बंदी केली आहे ती तरी मोकळी करा. ' असें पुष्कळ वेळां सांगितलें, परंतु सरकार आपला हेका सोडीत नाहींत. असो, आतां माझ्यानें त्यांचा प्रतिबंध संभाळवत नाहीं; सबब मजसमोर जी मनोमोहक मूर्ति उभी आहे तिजबरोबर मी लग्न करणार. आणि तुम्ही सर्वजणी जर मला मदत कराल, तर उद्यां पहा सरकारास काय चमत्कार दाखवितें तो. "

**काबुलदरीचें** बोलणें ऐकून सर्वांनीं तिला उत्तर दिलें कीं, " **काबुलदरीसाहेब**, आपण जो विचार कराल त्याला अम्ही राजी आहोंत. " असें ह्मटल्याबरोबर **काबुलदरीनें अकबरशहाचा** हात धरून त्यास घेऊन चालती झाली, आणि तिच्या मागून सर्वजण स्त्री-शिपाई वगैरे लोक गेले.

**काबुलदरी अकबरशहास** घेऊन चालली तेव्हां **अकबरशहा** म्हणाला, " मला कोठेंही घेऊन चला; परंतु माझ्या स्नेह्याला मागें ठेवूं नका. " नंतर **काबुलदरीनें** तुमचा कोण स्नेही म्हणून विचारलें, तेव्हां त्यानें शिंक्यांतील सोडलेला मनुष्य दाखविला. मग त्यासही बरोबर घेऊन ते सर्वजण तेथील एका गुप्त वाटेनें **काबुलदरीच्या** घरीं निघून गेले.

सूर्योदयापासून एकाद्या कामास आरंभ होऊन त्या वेळीं तें संपूर्ण झाल्यामुळें लोक मोकळे होऊन चारी रस्त्यांत हिंडत आहेत; हलवाई, माळी, सुगंधी ह्यांच्या दुकानांवर गिन्हाइकांची दाटी झाली आहे; कामदार लोक घोड्यावरून व हत्तीवरून रस्त्यांत सहल करीत आहेत; मोठ्या

रस्त्यांवरून ओळीनेंच दिवे लाविल्यामुळें, शहराच्या चौकांत उभें राहिलें कीं दिपवाळीच आहे काय असा भास होई. लाल चौकांत तर माणसांची चिकार गर्दी झाली आहे; व तेथें नानाप्रकारचे तमाशे सुरू झाले आहेत. एका अंगास सुंदर जिनसांचा बाजार भरला आहे; जवाहीर, सोनें, रुपें वगैरे दुकानांची आटपाआटप चालली आहे; संध्याकाळचा मुजरा करण्यास हजारों लोक राजवाड्यांत जात येत आहेत; वाड्याच्या दरवाज्यासमोर नग्न तरवारीचे संत्री खांद्यांवर बंदुका घेऊन इकडून तिकडे फिरत पहारा करीत आहेत; कित्येकांच्या बंदुका एका ठिकाणीं जमावानें उभ्या केल्या आहेत; समोर मैदानांत मुजऱ्यास आलेल्या लोकांच्या गाड्या, कोणाचीं घोडीं, कोणाचे म्याने व कैकांचे शृंगारलेले हत्ती मोठ्या थाटानें उभे आहेत; दरवाज्यावरील महालांत सरकार बसल्या कारणानें हजारों गरिबांचे खालून वांकून मोठ्या अतबीनें मुजरे होत आहे. ( शहरांत सर्व वस्ती स्त्रियांचीच होती. ) पोलीस अंमलदार लोक आपल्या ताब्यांतील लोकांची हजेरी घेत आहेत, व दिवसाचे शिपाई लोकांस रजा देऊन रात्रीच्या सावधगिरीविषयीं ताकीद देत आहेत; शहरांत घरोघरीं त्या वेळेस लोक बाहेर पडले होते, कित्येक वृद्ध स्त्रिया पुराणास व देवदर्शनास जात येत आहेत.

याप्रमाणें संध्याकाळच्या वेळीं, **सुवर्णपुरी** मोठी गजबजून गेली होती, अशा वेळीं एकदम चहूंकडे तोफांचे धडधडाट व बंदुकांचे बार ऐकूं येऊं लागले, आणि एकाएकीं सर्व शहरांत गडबड होऊन गेली. मग काय ? धर कीं मार. चहूंकडे 'धरा धरा,' आणि 'मारा मारा,' असा आवाज सुरू झाला. रस्त्यावरून मनुष्यांची पळापळी झाली; जे ते आपलें घर संभाळूं लागले; सर्वांनीं घराचे दरवाजे बंद केले; दुकानदारांची तर फारच गडबड झाली. अशा गर्दींत भामटे लोकांचें फारच काम पिकलें. कित्येकांचीं दुकानें लुटलीं. जागोजागीं आपापसांत मारामाऱ्या सुरू झाल्या. कोण कोणास कां मारतो, फिर्याद देण्यास कोठें जावें, फौजदार कोठें आहेत, एकदम गर्दी कां झाली, वगैरे तपास कांहींच नाहीं. चहूंकडे मारामारीशीं गांठ ! राजवाड्यावर तोफांचे अवाज होऊं लागले, स्वतः सरकारचाही पत्ता नाहीं, पलटणींतले लोक अंमलदारांचें ऐकेनात; जो तो आपल्या मनाचा मुखत्यार झाला. सर्व शहरांतील दिवे विझाले. कोठें उजेड नाहीं, मारामारी करण्यास हत्यार

नाहीं.' म्हणून घरावरील कवलें नाहींशीं झालीं. तशा संधींत कित्येक घरें पेटलीं, त्या उजेडानें मात्र कांहींसें दिसत होतें. शिपायांची आणि स्वारांची तर मनस्वी धांदल उडाली. मग काय विचारावें? अशी जेव्हां गडबड झाली, तेव्हां शहरांतील लोक शहराबाहेर पळूं लागले. त्यांत कोणी अड-खळून पडत होते, कोणी वार लागला म्हणून तळमळत होते, कित्येक हुशार होते ते एकमेकांस मारून सांपडेल तें घेऊन पळत सुटले. याप्रमाणें चहूंकडे हाहाक्कार झाला. रस्तोरस्तीं माणसांचें शेंकडों मुडदे पडले. आणि कोठें हात, कोठें पाय, कोठें डोकीं, अशीं जागजागीं पडलीं. त्या सपाट्यांत कित्येक हत्ती मेले, कैक घोडे मेले, व गल्लींकुच्चींतून उंट अडकून मेले, कित्येक जिवंत हत्ती गांवांत मोकळे सुटले. त्या वेळचा तो प्रसंग लिहि-ण्यास आणि सांगण्यास मात्र गोड, परंतु तसा प्रसंग ज्यावर येतो, त्यास तें दुःख माहीत असतें. असो; **किश्वरासिता** म्हणतो, " **मेहरवश** सर-कार, आशी गर्दी होत असतां एकदम पुकारा झाला कीं, '**चंदानुरी** सरकारांनीं ( **सुवर्णपुरी**च्या राणीचें नांव ) **काबुलदरी** नांवाच्या फितुरी सुभेदारास ठार मारलें; परंतु तिचा नवरा **अकबरशहा** सांपडत नाहीं,' असा आवाज होत होत, ज्या ठिकाणीं **अकबरशहास** आणि **नहीमुलखेस** **काबुलदरीनें** लढाईस जातेसमयीं बसविलें होतें, तेथपर्यंत गेला. मग काय विचारता! **अकबरशहा**ची आणि **नहीमुलखे**ची मुखश्री उतरून 'दे माय धरणी ठाय,' असें झालें. स्वतः मला धरतील याविषयीं **अ-कबरशहास** काळजी वाटली नाहीं, परंतु ऐकलेला पुकारा खरा किंवा खोटा याविषयीं तो फार चिंतातुर झाला. इतक्यांत त्यांचे जुटीपैकीं एक खरा विश्वासुक शिपाई तेथें येऊन म्हणाला, " **अकबरशहा** महाराज, काय सांगावें?" मीं दुष्ट अधमानें पुढील मजकूर सांगितल्यावर मला ठार मारून टाका. कारण, असा वाईट मजकूर सांगणें माझ्या कपाळीं कां यावें! पण काय करूं? न सांगितल्यास निमकहरामीपणा येतो. सबब सांगतों, हें कसें तरी ऐकून घ्या." सदरील मजकूर सांगणार तों त्या वेळीं त्या शिपायाच्या डोळ्यांवाटें पाण्याच्या धारा चालल्या होत्या. हें पाहून या दोघांच्या हृदयांत धस्स झालें, आणि मनांत म्हणतात कीं, कांहीं तरी **काबुलदरी**चीच वाईट स्थिति हा सांगणार. अरेरे! आतां काय करावें? नंतर 'सांगाच' असा आग्रह झाल्यावर शिपाई सांगतो.

महाराज, "**काबुलदरी** आपणास येथें बसवून पंचवीस हजार स्वारांसह जेव्हां संध्याकाळीं शहरांत शिरली, तेव्हां मग काय विचारितां ! अशी लढाई कधींच कोणाच्या पाहण्यांत नसेल. शहरांत तर केवळ कालांत-प्रलयच करून टाकला; **चंदानुरी**ची शिल्लक राहिलेली जरी सुमारें दोन लक्ष फौज होती, तरी ती बेसावध होती. **काबुलदरीनें** प्रथम **चंदानुरी**-चाच प्राण घ्यावा असा विचार करून स्वतः स्वारी वाड्यांत शिरली. मग काय ! तेथें केवळ काळासारखाच तिनें पराक्रम केला; आणि हजारों लोक आपल्या हातानें छाटले. एकूण एक माणसें मारल्यावर **चंदानुरी** कोठें आहे याविषयीं ती शोध करूं लागली. महाराज, काय सांगावें ? त्या वेळेस **काबुलदरी**ची मूर्ति केवळ अंतकाळच्या यमासारखी दिसूं लागली. अंगावर रक्त उडालेलें होतें, आणि नेत्र लाल झालेले, हातांत नग्न तरवार, आणि दोहींकडे दोन मशालजी, अशा थाटानें **चंदानुरी**चा शोध करीत सर्व वाडाभर ती हिंडत होती. एकट्या **काबुलदरीस** पाहून **चंदानुरी**ची दोन लक्ष फौज असतांही धूम पळून गेली. कोणी आडवें आलें नाहीं. अहाहा ! काय **काबुलदरी**चा पराक्रम ! ! त्या वेळेस तिला हिंदुलोकां-च्या अष्टभुजा देवीचीच उपमा साजते ! कारण, मस्तकावरील केश मोक-ळे सुटले होते, सर्वांगावर रक्ताचे शिडकाव, हातांत नग्न बयासाहेब, मग काय विचारावें ? त्या स्वरूपाचें स्मरण झालें कीं, अंगावर शहरा येतो. असो, असा पराक्रम सुमारें एक वाजेपर्यंत झाला. नंतर तें सर्व लयास गेलें. महाराज, तें आतां कशास सांगूं ?" हें शिपायाचें भाषण ऐकून **अकबरशहा** म्हणाला, "अरे सुज्ञ शिपाया, मी तुझा फार आभारी आहें, कीं तूं इमानानें झालेलें सर्व वर्तमान आम्हांस कळविलेंस; म्हणून आतां तसेंच शेवटपर्यंत सांग."

शिपाई म्हणालाः—"सरकार, **चंदानुरी**चा शोध वाड्यांत करीत अ-सतां, **चंदानुरी** भीतीनें एका दाराआड लपली होती. **काबुलदरी** त्या दाराचे आंत गेल्याबरोबर, मोठा हिय्या करून एकाएकीं **चंदानुरीनें** पाठीमागून वार केला. तो असा नेमानें बसला कीं, लागलींच पुढें सांग-गण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं. **काबुलदरी** पडल्याबरोबर मलाही वार होणार होता, इतक्यांत मीं मतलबानें **चंदानुरी**चे पाय धरले; तेव्हां तिनें मला मात्र सोडलें. महाराज, त्या वेळीं मग तिलाही

बरेंच स्फुरण आलें, पण उपयोग काय? **काबुलदरी** पडली नव्हती तोंपर्यंत ती लपून बसली होती. असो; मग ताबडतोब घोड्यावर बसून ती वाड्यापार झाली, आणि **काबुदरी**चा देह येथून लांब दोन तीन कोसांवर फेंकून द्या म्हणून हुकूम केला, आणि तिनें आपल्या लोकांची बरीच स्वस्थता केली. मग असा हुकूम केला कीं, **काबुलदरी** तर मेली; परंतु तिनें जो नवीन नवरा केला आहे, आणि ज्याकरितां इतका प्रसंग झाला, तो मनुष्य जो कोणी धरून देईल त्यास पांच लक्ष रुपये बक्षीस देईन. याप्रमाणें हुकूम झाल्यावर, महाराज, आपले लोक बहुतेक पळाले; आणि त्यांचे लोक तुम्हांस धरण्यास हिंडत आहेत याकरितां **काबुलदरी**चा शोक किंवा विचार करणें तो येथें बसून करूं नका. पळा लवकर. आतां सुमारें दोन वाजले असतील. याकरितां उजाडलें नाहीं तों बरेच लांब पळून जा. मी हें तुम्हांस सर्व सांगावें म्हणून धांवतच येथें आलों. सरकार, **काबुलदरी**चा देह जेव्हां डोंगरांत टाकण्याकरितां नेला, तेव्हां किंचित् तिला धुगधुगी होती, पण तिला कोणीकडे नेऊन टाकलें तें मला माहीत नाहीं. कारण, त्याच वेळेस मी अगोदर इकडे धांवत आलों. आतां लवकर पळून जा. मी रजा घेतों." असें म्हणून तो शिपाई आपल्या घरादाराचा व पोराबाळांचा समाचार घेण्याकरतां निघून गेला.

नंतर **अकबरशहा** आणि **नहीमुलखा** हीं आपल्या जीवाच्या भयानें जिकडे रस्ता मिळेल तिकडे पळत सुटलीं. रस्त्यानें **काबुलदरी**साठीं **अकबरशहानें** जो शोक केला, तो वर्णन करवत नाहीं, याबद्दल एक पृथकच पुस्तक लिहिलें पाहिजे. असो त्या दोघांसही कधीं पळण्याची संवय नाहीं, सबब ते अतिशय दमले. रस्ता काय, जिकडे जावें तिकडे मोठमोठे कडे, खाडे, कांटे, दगड, पराकाष्ठेची झाडी, अशा घोर अरण्यांत अंधाररात्रीं ते दोघेही पळतां पळतां फारच श्रमले; आणि एका कड्याचे पायथ्याशीं झाडाखालीं थकून बसले. तेथेंही **अकबरशहानें काबुलदरी**साठीं पुष्कळ शोक केला.

मित्रहो, वरील गोष्ट वाचून तुह्मांस खचीत संशय उत्पन्न झाला असेल कीं, **अकबरशहा** प्रथम एका झाडाशीं निजला असतां एकाएकीं त्या **चंदानुरी**च्या पलंगावर कसा गेला? ती **चंदानुरी** कोण? **काबुलदरी**

कोण ? ती **चंदानुरी** सहस्रावधि पुरुषांस शिक्यांत घालून कां ठेवीत असे ? वगैरे मजकूर बरोबर न समजल्यामुळें तुमचा प्रश्न असेल खरा. तर प्रिय वाचकहो, अशीच शंका त्या **मेहरवशेला** येऊन तिनेंही वरील प्रश्न **किश्वरसितास** केला. तेव्हां **किश्वरसिता** म्हणाला, " अहो **मेहरवश**, तुम्हीं प्रश्न केला, त्याची शंका त्या **अकबरासही** येऊन त्यानेंही त्या **नहीमुलखेस** विचारलें.—

" **नहीमुलखे**, बरें झालें, अशा दुःखसमयीं तूं तरी जवळ आहेस, नाहींतर माझी मोठी दशा झाली असती. असो, आतां गेल्या गोष्टीचा शोक करून उपयोग काय ? परंतु फार वाईट वाटतें कीं, **काबुलदरीसारखी** स्त्री पुनः मिळणार नाहीं. अहाहा ! मजकरितां शेवटीं ती प्राणासही मुकली. पण कांगे **नहीमुलखे**, लढाई झाली हें शहर कोणाचें ? **चंदानुरी** कोण ? मी या सपाट्यांत सांपडलों कसा ? वगैरे कांहींच माझ्या मनाचा खुलासा अद्यापि झाला नाहीं. याकरितां उजाडेपर्यंत बसल्या बसल्या तो सर्व प्रकार मला सांग बरें. "

**अकबरशहाचें** हें बोलणें ऐकून **नहीमुलखा** म्हणालीः—" मी तो सर्व प्रकार सांगतें, म्हणजे आपली संशयनिवृत्ति होईल. " नंतर **नहीमुलखा** सांगूं लागली.

ती ह्मणाली, महाराज, आपण हल्लीं ज्या ठिकाणीं बसलों आहों, आणि पूर्वीं ज्या ठिकाणीं तुम्ही बसलां होतां, त्या सर्व महा अरण्याचा पूर्वीं एक मोठा राक्षस मालक होता. आणि आसमंतांत चारशें योजनेंपर्यंत त्याची सत्ता चालत असे. त्यानें कित्येक राजांस मारून अतोनात संपत्ति मिळविली होती, आणि त्याच्या हद्दींत तर कोणाचाही प्रवेश होत नसे. त्यानें किती संपत्ति मिळविली होती याचा अगदीं अंतच नसे. असो, एके दिवशीं एका डोंगराच्या माथ्यावर आनंदानें तो राक्षस पसरला होता. झाडी दाट असल्यामुळें दहा पांच झाडांचा पाला उशाखालीं घेऊन स्वस्थ रीतीनें पडला होता, इतक्यांत त्याची दृष्टि त्या डोंगराच्या पायथ्याशीं गेली. तेव्हां त्यानें असें पाहिलें, कीं, " खालीं अतिशय सुंदर झाडी असून पाण्याचा झरा वाहत आहे, आणि झऱ्याचे कांठीं छायेखालीं एक राजा आणि त्याची अति उत्कृष्ट स्त्री, उन्हानें कासावीस झाली ह्मणून बसली होती. त्या वेळीं त्या राजस्त्रीनें आपल्या प्राणनाथास श्रम झाले म्हणून

तेथील गार पाणी पाजून त्याचा सर्व घाम आपल्या पदरानें पुसला. राजानेंही आपल्या शेल्यानें तिचा घाम पुसला आणि म्हणाला—" सखे, काय मीं पूर्वजन्मीं पुण्याई केली होती, म्हणून तुजसारखी सुंदर स्त्री मला मिळाली. स्त्रिये, खरेंच सांगतों, आज तूं मजबरोबर आहेस ह्मणून मला वरची आठवण बिलकूल झाली नाहीं. तुजपेक्षां प्रिय वस्तु मला दुसरी कोणती आहे ? पण तुला मात्र आज श्रम फार झाले खरे. करावें काय ? हरिणामागें लागत इतके लांब आलों त्याचें आपणांस भानच नाहीं. असो, आतां जवळ ये. हें तोंड किती तरी लाल झालें आहे ? तरी मीं सांगितलें कीं मजबरोबर येऊं नको. पण ऐकतो कोण ? नसतें आणलें तर तिकडूनही तब्येत गेली असती. असो, आतां काय त्याचें ? ऊन खालीं झालें ह्मणजे ताबडतोब निघून जाऊं. पण प्राणप्रिये, पाहिलेंसना साखरेचा खाणार, त्याला देव देणार ! त्याप्रमाणें आज आमची ( तोंडावरून हात फिरवून ) लाडकी बरोबर आहे ह्मणून ईश्वरानें विश्रांतीस ठिकाण तरी काय सुंदर दिलें ! अहाहा ! हे वृक्ष कसे गगनचुंबित गेले आहेत, आम्रवृक्ष फळांनीं अगदीं वांकले आहेत, कोठें पाड लागला आहे, कोठें अद्यापि कच्चीं फळें आहेत, आणि कोठें तर मोहरच फुलून राहिला आहे. हा वसंतऋतु कोणास बरें नकोसा वाटेल ? वः ! सुगंध तरी काय घटकेंत गुलाबाचा येतो, घटकेंत दवण्याचा येतो, घटकेंत बकुळीचा येतो. प्रिये, ह आतां आला हा सुगंध कशाचा ?

**स्त्री**—हा का ? मोतियाचा नाहीं का आला ?

**राजा**—अहाहा ! हा मोतियाचा का ? समजली अक्कल.

**स्त्री**—तर मग कशाचा हो ? आमची आपली असूं द्या अक्कल, अशी सर्वांनाच कोठून आणावी ? ( मनांत आपल्यासारखी. )

**राजा**—अगे, तुला राग नको येऊं देऊं. हा वास पाचेचा नव्हे का ?

**स्त्री**—हो हो. खरेंच प्राणनाथ, हा वास पाचेचा खरा. मी तेंच म्हणणार होतें तों तोंडांतून मोतिया आला. पण आतां असूं द्या तें. प्राणनाथ, जरा विश्रांति घ्यानात येथें ? म्हणजे मी अंमळ पादसेवा करीन.

**राजा**—पादसेवा कशास करतेस ? तूं नाहीं का दमलीस ? तूंही अंमळ विश्रांति घे.

**स्त्री**—काय तरी बाई, मी आपल्यापेक्षां का सुकुमार आहें ?

**राजा**—अगे, पण रागावलीस कां इतकी? ये जवळ. ( असें म्हणून राजानें तिला जवळ घेतलें. )

**नहीमुलखा** म्हणते, "महाराज, नंतर त्या उभयतां स्त्री-पुरुषांनीं, आनंदानें क्षणभर झोंप घेतली आणि हें सर्व त्या राक्षसानें डोंगरावरून पाहिलें. मग काय? त्याच्या अंगाचा अगदीं तिळपापड होऊन त्या सुंदरीला पाहिल्यानें तो अतिशय कामातुर झाला. आधींच ती सुंदर, त्यांत उभयतांनीं शृंगार केलेला त्यानें सर्व पाहिला; म्हणून त्याच्या हातापायांची अगदीं आग होऊन जाऊन तिला उचलून नेण्याकरितां तो खालीं येऊं लागला.

राक्षस डोंगर उतरून येत आहे इतक्यांत राजस्त्रीची दृष्टि त्याच्यावर गेली. मग काय? तिची तर अगोदरच बोबडी वळली आणि आपल्या नवऱ्याला सांगूं लागली.—"महाराज, त-त-त-तो कोण हो? अग बाई!" असें सांगून लटलट कांपूं लागली. राजानें डोंगराकडे पाहिलें तों महान् विक्राळ स्वरूप आणि तोंड पसरून आपणाकडेस एक राक्षस येत आहे. हें पाहून त्याचीही पांचावर धारण बसली; परंतु त्यानें तो भितरेपणा वरकांतीं दाखविला नाहीं, आणि ताबडतोब आपल्या सुंदरीस घोड्यावर घालून वायुवेगानें तेथून घोडा पळविला.

राजा आणि राणी आपल्यास पाहून पळाले असें पाहून राक्षसही त्यांचे मागें पळत सुटला. राजानें घोड्यास अगदीं वाऱ्यासारखा काढला, परंतु राक्षसाचा वेग त्याहीपेक्षां जास्त. घोडा पुढें आणि राक्षस मागें, अशा प्रकारें तीन चार कोस जमीन मागें पडली, शेवटीं राक्षस अगदीं सन्निध येऊन ठेपला, आणि आतां धरणार इतक्यांत राजानें मागें पाहिलें. तेव्हां मग काय? सर्वांगाचा अगदीं थरकांप झाला; तरी त्यानें आपल्या तरवारीनें त्यावर वार केले; परंतु राक्षसानें त्याची तरवार हिसकावून घेऊन फेंकून दिली. तिरकमठा मोडून टाकून दिला, आणि तोंड पसरून घोड्यापुढें आडवा झाला.

राणीनें तर घट्ट डोळे झांकिले होते, आणि खरोखरच तिची तर अगदीं शुद्धि गेली होती. नंतर आपण सांपडलों असें पाहून राजास फार वाईट वाटलें आणि तो राक्षसाचें आर्जव करूं लागला.

**राजा** म्हणाला.—"अरे, तूं कोण आहेस? मला वाटतें तूं कोणी

सिद्ध पुरुष असावास; तेव्हां सिद्ध ह्मणजे दयावंत थोर पुरुष. आणि थोर पुरुष कोणास ह्मणावें, कीं ज्याचे हातून अनाथाचें रक्षण होतें तो. आपण सिद्ध आहांत व आह्मी अनाथ आहोंत, तेव्हां अनाथाचें रक्षण करावें. बरें, आह्मी कांहीं तुमच्या वाटेसही अगदीं गेलों नाहीं. फक्त ऊन लागलें ह्मणून अंमळ त्या झऱ्यावर विसावा मात्र घेतला. आपले वृक्षास किंवा फुलास बिलकूल स्पर्श केला नाहीं, आणि आह्मी पळालों ते केवळ अपराध करून पळालों असें नाहीं. आपलें स्वरूप फार उग्र दिसलें, ह्मणून भीतीनें पळालों; तर महाराज, या दीनाचें रक्षण करावें."

राजाचें भाषण ऐकून राक्षस ह्मणाला, " अरे लुच्चा, मी तुझें कपटी भाषण समजलों; पण तुझ्या या मानभावी बोलण्यास मी भुलणार नाहीं. तुला प्राणाची गरज असेल, तर या सुंदरीस माझे स्वाधीन कर, आणि चालता हो; नाहीं तर उभयतांसही गट्ट करीन. मी सिद्ध पुरुष नाहीं; जातीचा अस्सल राक्षस आहें; तेव्हां मनुष्य ह्मणजे आमच्या जातीचा भक्ष्य आहे. आह्मी मनुष्यावर दया कधीं करणार नाहीं. आतां तुला जीवदान पाहिजे असल्यास आपली बायको मला दे, आणि निघून जा."

**राजा** ह्मणाला.—" अरे दुष्टा, तुझी इतकी स्तुति केली तरी तुला दया येत नाहीं, तेव्हां वाटेल तें कर. मी माझी बायको देणार नाहीं. मूर्खा, प्रियेपेक्षां का मला माझा प्राण प्यारा आहे ? हिला तुजजवळ देऊन मग माझे जगण्याचा उपयोग काय ? अशी दिलदार स्त्री दुसरी मिळेल काय ? जा, खुशाल मार मला ! परंतु माझे प्राण आहेत तोंपर्यंत तिला हात लावूं देणार नाहीं. व तिला एकटी टाकून कधीं पळून जाणार नाहीं. पहा, अपराधावांचून तूं हें घोर कर्म करतोस हें बरोबर नाहीं. तूं विचार कर कीं, पूर्वीं अशींच कर्में केलींस ह्मणून आतां हा तुला राक्षसदेह प्राप्त झाला आहे, आणि अजूनही तेंच तें पुनः करतोस हें काय ? अशानें ही अमंगळ योनि कधीं चुकणार नाहीं. तर बाबारे, विनाकारण कां हात्त्या करून घेतोस ? त्यांत सामान्य हत्त्येपेक्षां राजहत्त्या फारच वाईट आहे. कारण, ' दहा मारावेत पण दहांचा पालनकर्ता मारूं नये.' अरे मी जगलों तर लक्षावधि प्रजेचें रक्षण करीन, आणि तें पुण्य तुला प्राप्त होईल. आणि अशा पुण्यानेंच तूं ह्या देहांतून मुक्त होशील. पहा, अजून आमची दोघांची विषयेच्छाही तृप्त झाली नाहीं. बरें, पुढें वंश चालण्यास एखादी संतति तरी ?

तर तीही नाहीं. अशा तारुण्यावस्थेंत आम्हां तरुणांची ताटातूट करतोस हें पाप कोठें फेडशील ? याचा विचार कर."

**राक्षस** ह्मणाला—" मला अशा ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी पुष्कळ सांगतां येतात; पण या वेळेस तें मी ओळखीत नाहीं. तुझ्या स्त्रीचें सौंदर्य पाहून सर्व ब्रह्मज्ञान अज्ञान झालें. तूं आपल्या स्त्रीस माझ्या स्वाधीन करतोस कीं नाहीं ? एक सांग."

राक्षसाचें हें भाषण ऐकून राजानें एकच उत्तर दिलें, निर्दया, खुशालपणें जीव घे; परंतु स्त्री सोडणार नाहीं." असें ह्मणून आपल्या स्त्रियेस मागें घालून पुढें उभा राहिला. इतकी गोष्ट सांगून **किश्वरसिता मेहेरवशेला** ह्मणाला.—" कां सरकार, कसा आहे पुरुषांचा दील ? एकवार जिला आपली ह्मटली, तिला प्राणाहीपेक्षां पलीकडे ठेवितात; आपला प्राण देतील, परंतु प्रीतींतील स्त्री देणार नाहींत.

## तात्पर्य.

पुरुष जीवाला जीव देतील, तशा स्त्रिया उपयोगीं पडणार नाहींत. त्या आपला प्राण वांचत असला तर पुरुषास खुशाल मरूं देतील; तेव्हां स्नेह करावा तर पुरुषांशींच; आणि स्नेह करण्यास पुरुषजातच लायक खरी. असें असतां तुह्मी ही अघोर प्रतिज्ञा धरून बसलां यास काय ह्मणावें."

**मेहरवश** ह्मणाली, " महाराज, याचें उत्तर मग देईन, परंतु गोष्ट पुरी होऊं द्या. मग पुढें कसें काय झालें ? त्या राक्षसानें त्या राजास ठार मारलें काय ? अरेरे ! बिचाऱ्या राणीस काय दुःख झालें असेल ? सांगाहो, गोष्ट पुढें, मग पुढें काय झालें तें; अजून रात्र कांहीं फार झाली नाहीं."

**मेहरवशे**चा आग्रह पाहून व रात्रही बरीच उरली आहे असें पाहून **किश्वरसिता** पुढें गोष्ट सांगूं लागला. तो ह्मणाला.—

" ह्याप्रमाणें तो राजा त्या राक्षसाचें आर्जव करीत असतांही त्यास कींव आली नाहीं. मग त्यानें एक मोठ्यानें आरोळी ठोकली. ती अशी कीं, तिचा प्रतिध्वनि होऊन तें सर्व अरण्य दणदणून गेलें. राक्षसाच्या किंकाळीबरोबर ह्या दोघांसही मूर्च्छा आली; आणि नेत्रांत गर्द अंधारी आली. असें पाहून त्या राक्षसानें त्या राजास एक लत्ताप्रहार करून हृदयावर एक वज्रमुष्टि अशी जोरानें मारली कीं, त्याचे पंचप्राण कासा-

वीस होऊन प्राणांतसमय आला. अशा वेळीं राक्षस त्याच्या कानीं लागून विचारतो, " गड्या, आतां कसें काय ! तुझ्या सुंदरीस माझे स्वाधीन करतोस कीं नाहीं ? " राक्षसाचें हें भाषण ऐकून राजाच्यानें त्या वेळीं उत्तर देववलें नाहीं; परंतु हस्तसंकेतानें सांगितलें कीं, " प्राण तर जातोच आहे, आणि तो गेला तरी चिंता नाहीं, परंतु माझे पंचप्राणांत बिंबलेला जो माझे प्राणसखीचा दील तो देणार नाहीं." त्याची हस्तसंकेताची खूण जाणून राक्षस क्रोधायमान झाला आणि त्याचे दोन्ही पाय धरून त्याला गरगर गरगर आपल्या मस्तकाभोंवतीं फिरविलें आणि लांब एका पर्वताचे दरींत भिरकावून दिलें. नंतर आपण त्या सुंदरीजवळ येऊन तिला सावध करूं लागला.

कांहीं वेळानें ती राजस्त्री अंमळ सावध होऊन तिनें डोळे उघडून पाहिलें, तेव्हां आसपास तिला त्या दुष्ट राक्षसाखेरीज कांहींच दिसेना. राक्षसानें ती सावध झाली असें पाहून बळेंच तिचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें, आणि वारा घालूं लागला. पुढें थोड्या वेळानें ती तरुणी बरीच हुशार झाली, आणि चहूंकडेस पाहून ह्मणते—' माझे प्राणनाथ कोठें गेले ? येथें तर कोठेंच दिसत नाहींत, हा मोठा चमत्कार आहे. प्राणांतसमय आला तरी मला सोडून माझे प्रियकर कधीं जाणार नाहींत, अशी माझी खात्री आहे. असें असतां मला या निर्दयाचे हातीं देऊन सरकार कोठें गेले ? " असें ह्मणून फार रडूं लागली; आणि वारंवार आपलें मस्तक धरणीवर आपटून घेऊं लागली. तिचा हा विलाप पाहून राक्षसानें पुष्कळ प्रकारें तिची समजूत केली. तो ह्मणाला, " हे तरुण स्त्रिये, ज्यावर तुझा इतका दील बसला आहे, व ज्याकरितां तूं इतका शोक करितेस, आणि धरणीवर आपलें मस्तक आपटून घेऊन अतिशय विलाप करीत आहेस, तो तर तुला मुळींच चहात नाहीं अशी माझी खात्री झाली. मी त्याचें मन पाहण्याकरितां दाटूनच बोललों कीं, तूं आपल्या सुंदर स्त्रियेस सोडून दे, नाहीं तर प्राणास मुकशील. या माझ्या भयंकर शब्दांनीं प्रथम तर त्यानें मोठा डौल आणला कीं, प्राण गेला तरी पत्नीस सोडणार नाहीं. परंतु ज्या वेळीं मीं मोठ्यानें आरोळी मारली, त्यासरसाच तो तुला सोडून आपला जीव घेऊन पळाला. हीच का ती ममता ? तुह्मां स्त्रियांची समजूत अल्प असल्यानें तुह्मांस पुरु-

षांच्या मनाची परीक्षा होत नाहीं; आणि त्यांचा खोटा दील असला तरी तुह्मी तें न समजून त्यांच्यांशीं रममाण होतां. मी खरेंच सांगतों कीं, परस्परांच्या मनांची खात्री झाल्यावांचून एकमेकांवर प्रीति करणें हा मूर्खपणा होय. पहा, तूं त्याच्याकरतां मघांपासून विलाप करून कंठशोषही केलास, परंतु त्याचा जीव तुजवर बिलकूल नाहीं, हें उघड दिसतें. कारण, तुह्मां परस्परांची इतकी जर प्रीति होती, तर तो माझ्या भीतीनें तुला सोडून गेलाच नसता. अशी एक ह्मण आहे कीं, 'सच्चा दीलसे जॉन प्यारा नही.' तेव्हां माझें सांगणें इतकेंच कीं, खोट्या ममतेकरतां व्यर्थ शोक कां करतेस? चल माझेबरोबर, मी तुला जन्मभर अंतर देणार नाहीं. हें राज्य व महाअरण्य सर्व तुझें आहे. माझें मंदीर आणि संपत्ति जर पाहशील, तर तुला मोठा अचंबाच वाटेल. याकरतां मजबरोबर माझे शहरापर्यंत चल आणि तेथील सर्व ऐश्वर्याची मालकीण हो. तुझ्या तारुण्यास पाहून मी अगदीं वेडा झालों, आतां विलंब लावूं नकोस. कदाचित् ही जर गोष्ट नाकारशील तर लागलींच तुलाही यमपुरीस पाठवीन."

ह्याप्रमाणें राक्षसाचें भाषण ऐकून तिला तो मजकूर खरा वाटला. आणि मनांत विचार करते, "अरेरे? गोष्ट फार वाईट झाली. ज्या राजास मजवांचून क्षणभर चैन पडत नव्हतें, आणि मजकरतां जो पंचप्राण टाकीत असे, त्यास आतां मला एकटें सोडून कसें जाववलें? तेव्हां खचित तो त्याचा दील आणि ममता हीं वरकांतीं होतीं, ह्यांत संशय नाहीं. तेव्हां पुरुष असे वरकांती दिलाचे, कपटी मनाचे व प्रसंगीं उपयोगीं न पडणारे असतात अशी माझी आतां पक्की खात्री झाली. असो, जें प्रारब्धीं होतें तें घडून आलें. आतां शोक करून उपयोग काय! राक्षसासही स्वच्छ नाहीं ह्मणणें बरोबर नाहीं; तर ह्यालाही युक्तीनेंच फसविलें पाहिजे."

असा विचार करून तिनें त्या राक्षसाच्या सर्व ह्मणण्यास रुकार दिला. तेव्हां राक्षसासही परमावधीचा आनंद झाला. **नहीमुलखा** ह्मणते, 'महाराज, त्या वेळेस त्या तरुण राजस्त्रीला कांहीं दिवस लोटले होते. ह्मणून तिनें राक्षसाची प्रार्थना केली कीं, 'मी आपल्या सर्व बोलण्यास आनंदानें रुकार देतें; परंतु माझी एक विनंति आहे, इकडेस मात्र आपण लक्ष्य दिलें

पाहिजे, आणि त्याविषयीं मला अभय वचन मिळालें पाहिजे. तो प्रकार स्वमुखानें सांगण्यास मला फार लाज वाटते.' असें ह्मणून हास्यविनोदादि प्रकारांनीं त्या राक्षसास तिनें मोहित केलें, व तो ' हवें तें मागून घे,' ह्मणून वचन देण्यास सिद्ध झाला. नंतर ती राजस्त्री राक्षसास ह्मणाली, ' महाराज, मला कांहीं दिवस लोटले असून मी गरोदर आहें, असें वाटतें. तेव्हां जरी मला तुमच्या भेटीनें फार आनंद झाला आहे, तरी त्या तुमच्या आतुरपणाच्या रीतीचें मला फार भय वाटतें. कारण, गर्भ उदरांत असतां पुरुषसंग वर्ज सांगितला आहे, आणि त्यांतून गर्भोदरी जी स्त्री तिनें नूतन विवाह करूं नये असें आहे, तेव्हां कसें? या सर्व प्रकारास तुमचा आतुरपणा काय घोंटाळा करील कोण जाणे." असें तिचें भाषण ऐकून राक्षसानें तिला अभय देऊन सांगितलें, " सखे, तुझ्या बोलण्यावरून सर्व रंग माझ्या ध्यानीं येऊन चुकला. आतां तूं निर्भयपणें माझे घरीं चल. माझी सर्व संपत्ति आणि राज्य पाहून तुला खचित संतोष होईल. मीं आजपर्यंत सहस्त्रावधि राजांस लुटून आपलें घर भरलें आहे, आणि अनेक तऱ्हतऱ्हेच्या वस्तु, ज्या पृथ्वींतही मिळणें कठीण अशा संग्रहास ठेविल्या आहेत. त्या सर्व दौलतीची तुला मालकीण करतों. तूं मात्र मजशीं प्रतारणा करूं नको, मी तुझे नवऱ्याप्रमाणें कमदिलाचा मनुष्य नव्हे. पहा, तो तुझा नवरा आपला जीव घेऊन पळाला. हा प्रसंगास प्राणही तुजवरून खुरबान करील." ह्याप्रमाणें त्या राक्षसानें तिच्या लग्नाच्या नवऱ्याविषयीं तिचे मनांत पुष्कळ प्रकारें वाईट भरवून आपण तिला घेऊन आपल्या स्वस्थळीं आला. नंतर त्यानें आपलें राज्य व संपत्ति सर्व तिला दाखवून फार आनंद मानूं लागला.

**नहीमुलखा** ह्मणते, " **अकबरशहा** महाराज, त्या राजस्त्रीनें वरकांती त्या राक्षसास हास्यविनोदादि शृंगार दाखवून अंतर्यामीं फार जळत असावें. ती नेहमीं विचार करी कीं, " काय दैवाची गति विचित्र आहे ! पहा, मी कुलवंताची राजश्री असून या चांडाळ राक्षसाच्या हातांत सांपडलें. आतां याचे हातून सुटून मी आपल्या स्वकीय माणसांस भेटेन काय? छीः! आतां पुनः अशी गोष्ट घडणें कठीण, आणि घडून तरी उपयोग काय ? पुनः अशा बैमान राजाचें मुख पाहणें नाहीं. पहा, पुरुषाचा बैमानपणा किती सांगावा ? जोंपर्यंत मजवर प्रसंग नव्हता, तोंपर्यंत त्या मेल्यानें किती माया

दाखविली ? नेहमीं ह्मणत असें कीं, ' मला तुजपेक्षां प्राण देखील प्रिय नाहीं, मग अन्य वस्तूची कथा काय ! ' असें नेहमीं ह्मणून वरकांती माझी मर्जी संभाळीत असे, परंतु सर्व परीक्षा लवकरच झाली. अतःपर पुरुषाचे मानभावपणावर विश्वास ठेवावयाचा नाहीं. आतां कसेंही करून युक्तीनें ह्या दुष्ट राक्षसास मात्र शासन केलें पाहिजे. कारण, जो लग्नाचा नियमित भ्रतार, आणि ज्यावर माझा प्राणाहीपेक्षां दील होता, त्यानें सुद्धां दगलबाजी करून आपस्वार्थ पाहिला. मग या दुष्ट राक्षसाचा नियम काय ? याला दंडच केला पाहिजे." असा विचार करून ती **सुवर्णनुरी** ( राजस्त्रीचें नांव ) नेहमीं त्या राक्षसाशीं वरकांती अति स्नेहानें वागत असे.

राक्षसास हास्यविनोदाचा व चंचल नेत्रांचा अति आनंद वाटून तो नेहमीं तिच्या सेवेंत तत्पर असे; परंतु गरोदर असल्यामुळें एका गोष्टीविषयीं मात्र तो वचनीं गुंतला होता. पुढें जसजसे तिचें गर्भ-दिवस भरत चालले, तसतसा तो अगदीं तिच्यावर जीवप्राण ठेवूं लागला. एके दिवशीं रात्रीं **सुवर्णनुरी** आणि राक्षस हीं फारच आनंदांत येऊन खेळत बसलेलीं होतीं. त्या वेळेस **सुवर्णनुरीचें** सुहास्यवदन, नेत्रकटाक्ष आणि गर्भतेज, तशांत तारुण्याची मुसमुस असल्यानें मुखावर लाली, हा सर्व प्रकार पाहून राक्षस फारच कामातुर झाला, असें पाहून **सुवर्णनुरी** ह्मणाली, " महाराज, आज सकाळीं मीं स्वतः मेहनत घेऊन उत्कृष्ट अप्रतिम सुगंधिक मद्य बनविलें आहे, हुकूम झाल्यास आणवितें; कृपा करून एक प्याला तरी या दासीच्या हातचा ग्रहण करावा." असें **सुवर्णनुरीचें** भाषण ऐकून राक्षस मद्य घेण्यास उतावळा झाला, आणि तिच्या भाषणानें अगदीं वेडा होऊन पुढें काय अनर्थ होणार ह्याचें त्यास भान राहिलें नाहीं. नंतर मद्य आणण्याविषयीं तिनें आपल्या दासीस इशारत केली. दासीनें हुकुमाप्रमाणें मद्य आणल्यावर मग **सुवर्णनुरीचा** आग्रह, त्यांत हा जातीचा राक्षस, आणि त्यांत कामातुर झालेला, मग काय विचारावें ! !

**नहीमुलखा** ह्मणते, " महाराज; तो राक्षस इतकें मद्य प्याला कीं, कांहीं वेळानें पूर्व जन्मकृत दुष्टाचरणानें पावलेल्या राक्षस-देहास सोडून राहिलेल्या कर्मांचा हिशोब देण्यास त्वरित ईश्वरसान्निध गेला. इतकी गोष्ट

ऐकून **अकबरशहा नहीमुलखेस** ह्मणाला, " अगे **नहीमुलखे**, मला वाटतें कीं, या तीव्र मद्यांत तिनें जहरी विष मिळविलें असावें. शाबास ! स्त्रिया काय करतील याचा नियम नाहीं. वास्तविक जो प्राणी त्यांच्या मोहरूप जाळ्यांत सांपडतो, तो आपल्या सर्वस्वास मुकतो ह्यांत संशय नाहीं. असो, मग पुढें काय झालें ? " **नहीमुलखा** सांगूं लागली, " राक्षस मेल्यावर त्याचा तो पर्वतप्राय देह एका मोठ्या विस्तीर्ण खांचेंत पुरून टाकिला, आणि त्या सर्व संपत्तीची व महा अरण्याची मालकीण **सुवर्णनुरी** झाली. पुढें थोडक्याच दिवसांत ती बाळंतीण होऊन तिला कन्या झाली. तिचें नांव **चंदानुरी** असें ठेविलें. तीच ही प्रस्तुतची महा अरण्याची व आमची मालकीण. राक्षस मेल्यानंतर **सुवर्णनुरीनें** हिचें चांगल्या प्रकारें पालनपोषण केलें, आणि सेवेस व खिजमतीस आपल्याजवळ सर्व स्त्रियाच गोळा केल्या. कारण, लग्नाच्या नवऱ्यानें असें केलें ह्मणून मरेपर्यंत पुनः तिनें पुरुषमुख पाहिलें नाहीं, आणि राक्षसाच्या तडाक्यांत सांपडली होती त्यासही ठार मारून टाकिलें."

राक्षसानें संचित केलेल्या संपत्तीचा तिनें चांगल्या प्रकारें व्यय केला. तो असा कीं, आपणास स्वतःकरतां एक अति उत्कृष्ट व मोठा विस्तीर्ण वाडा भुयार खणून तेथें बांधला, व त्याच्या शेजारींच एक विस्तीर्ण बगीचा केला आहे, तो सर्व प्रकार आपण पाहिलाच आहे; पण आणखी सांगणें इतकेंच कीं, तो विस्तीर्ण वाडा व बगीचा खालीं जमिनींत केला असून वरती तशीच कायम जमीन ठेविली आहे. ह्यामुळें त्या ठिकाणीं बाग व बंगला आहे हें प्रथम पाहणारास मुळींच समजत नाहीं. असो, **सुवर्णनुरीनें** स्वतः रहाण्यास असें गुप्त ठिकाण बांधून, शिवाय लक्षावधि फौज आपल्या रक्षणाकरितां ठेविली; परंतु ती सारी स्त्रीजातीची, त्यांत एक देखील पुरुष नाहीं. त्या सर्व फौजेचे वस्तीकरितां एक शहर वसविलें, त्याचें नांव **सुवर्णपुरी**. शहरांत सर्व वस्ती स्त्रियांची वसवून मध्यंतरीं एक विस्तीर्ण वाडा बांधला, व भोंवतालीं मजबूत लढाऊ असा तट बांधला आहे. हा सर्व प्रकार आपण पाहिलाच आहे. सरकार, **सुवर्णनुरीची** स्वारी कधीं कधीं त्या गुप्त बागेंत व बंगल्यांत राही, व कधीं कधीं शहरांत रहात असे. तिची **चंदानुरीवर** फार ममता असे, आणि पुरुषांवर वक्रदृष्टि फार. आसमंताद्भागीं शंभर योजनांपर्यंत आपले हद्दींत

पुरुष दृष्टीस पडला कीं ठार मारावा, असा **सुवर्णनुरी**चा सक्त हुकूम चालू असे.

असे कांहीं दिवस लोटल्यावर पुढें **सुवर्णनुरी**ची तब्बेत बिघडून ती अगदीं मरणपंथास टेंकली. मग आतां आपण जगत नाहीं, अशी तिची खात्री झाल्यावर नित्यशः आपल्या लेंकीस जवळ बसवून तिनें पुरुषांच्या कपटपणाविषयीं तिला गोष्टी सांगाव्यात. तिनें पुरुषजात घातकी अशा-विषयीं चांगला ठसा **चंदानुरी**च्या मनावर ठसविला. असो, पुढें थोड्याच दिवसांत **सुवर्णनुरी**चा काळ होऊन **चंदानुरी** गादीवर बसली. मग काय विचारावें महाराज ! त्या दिवसापासून तर सहस्रावधि पुरुष ठार मेले, आणि पुढें तिनें असा नियम केला कीं, ' जी कोणी या आपल्या हद्दींतून जिवंत पुरुष धरून आणून माझे महालांत सोडील, तिला दहा सहस्र मोहरा बक्षीस देईन.' अशी जाहिरात प्रसिद्ध झाल्यावर त्या दिवसापासून अगदीं कहरच गुदरला. कैक स्त्रिया गुप्तपणें हिंडूं लागल्या; आणि नित्यशः कोठून तरी पुरुष धरून आणून त्याला त्या दुष्टेच्या महालांत ठेवूं लागल्या. सर-कार, द्रव्याच्या आशेनें मनुष्यें कोणत्या पापास प्रवृत्त होतील याचा अगदीं नियम नाहीं. त्यांतून स्त्रिया तर काय करतील आणि काय नाहीं, ह्याचा तर्कच होत नाहीं.

नंतर तिची एक लहानपणची जिवलग मैत्रीण **तैनतअल्ली** ह्मणून होती; तिला प्रधानगिरीचीं वस्त्रें देऊन ती सांगेल त्या रीतीनें **चंदानुरी** वागूं लागली. सरकार, पूर्वीं पुरुषांस ठार मारीत होते, तें एका हिशोबीं बरें, परंतु त्या दुष्ट प्रधाननीनें तर फारच जुलूम केला ! तें सांगूं लागलें ह्मणजे हजारों पुरुषांचें दुःख दृष्टीसमोर उभें राहून अंगावर शाहराच येतो. **तैनतअल्लीनें** तिला असें सुचविलें कीं, ' राणीसाहेब, तुह्मी असे पुरुषांस एकदम ठार मारतां त्यापेक्षां त्यांचे हाल करून मारावें हें बरें; ह्मणजे अन्नपाण्यावांचून शिंक्यांत उलटें बांधून ठेवावें; त्या योगानें आठ चार दिवस गंमत पहाण्यास सांपडून नंतर ते मरतील.' ही प्रधाननीची युक्ति **चंदा-नुरी**स बरी वाटून त्या दिवसापासून पुरुष सांपडला कीं, प्रधानणीनें सांगित-ल्याप्रमाणें तजवीज करावी. याप्रमाणें वाड्यामागील बागेंत आंब्याच्या झा-डांवर शेंकडों पुरुष शिंक्यांतून लटकून राहूं लागले. स्त्रिया द्रव्याच्या आ-

शेनें एखादा तरी पुरुष नित्य धरून आणूं लागल्या; आणि त्या बिचाऱ्यास ती अघोर शिक्षा भोगावी लागत असे.

माझी धनीण जी **काबुलदरी** ती लहानपणापासून **चंदानुरी**च्या मर्जींतली असे. परंतु तिचें अंतःकरण कोमल असल्यानें हिचें व तिचें अगदीं पडत नसे. **काबुलदरी** फार शूर व सैन्याची मुखत्यारीण असल्यामुळें **चंदानुरी** तिशीं उघड रीतीनें वाईट वागत नसे. इतकी गोष्ट सांगून **नहीमुलखा** म्हणाली—" महाराज, आतां आपण येथें कसे आलां, व आमची तुमची गांठ कशी पडली, वगैरे सर्व हकीकत आपल्या ध्यानांत आली असेल, ह्यांत संशय नाहीं. आतां प्रार्थना इतकीच कीं सर्व दुःख एकीकडे ठेवून प्रथम **काबुलदरी**चा शोध करूं चला आणि नंतर येथील **चंदानुरी**ची खबर घेऊं. सरकार लवकर उठावें, रात्र निवांत असल्यामुळें कोणी कण्हल्यासारखा आवाज मघापासून माझ्या कानीं येत आहे; पण तो कोणीकडून येतो, ह्याचें बरोबर अनुमान होत नाहीं; आपण जरा अवसान धराल तर शोध करूं चला."

**नहीमुलखे**चें हें भाषण ऐकून **अकबरशाहास काबुलदरी**चें स्मरण झालें, आणि तो अगदीं शोकग्रस्त झाला. त्याला तिची मूर्ति डोळ्यांसमोर दिसूं लागली, नेत्रावाटें एकसारख्या पाण्याच्या धारा चालल्या, आणि तोंडांतून शब्दही निघेना. या प्रकारें तो फारच तळमळूं लागला. तेव्हां **नहीमुलखेनें** प्रार्थना केली ? महाराज, हें काय; आपण थोर व शूर असतां असे अधीर कां होतां ? परमेश्वरकृपेनें शूर **काबुलरी**ची व तुमची भेट होईल ह्यांत संशय नाहीं; शोध मात्र केला पाहिजे; कारण, तिच्या स्वराप्रमाणें कण्हणें माझ्या कानीं येत आहे म्हणून शोक आवरून तिचा शोध करूं चला.

**नहीमुलखे**चे आग्रहामुळें **अकबरशाहा काबुलदरी**च्या शोधास निघाला; आणि ते दोघेजण त्या महा अरण्यांत चहूंकडेस हिंडूं लागले. मग कण्हण्यासारखा ध्वनि कोठून येतो, याचा तपास करीत असतां पहांटेच्या सुमारास त्यांना तें स्थळ सांपडलें. तें असें कीं, हे बसले होते त्याजवळच एका डोंगराचे दरींत, जेथें झाडी दाट लागून गेली आहे, डोंगरावरून पाण्याचे लोट वहाताहेत, जागजागीं चंचल वनस्पतींचे जाळ निघताहेत, जेथें पाऊल—वाट सद्धां पुरती नाहीं, हिंस्रक जनावरें वा-

टेंत पसरलीं आहेत, अशा भयंकर जागेंतून तो ध्वनि ऐकूं येत होता. तेव्हां ते बिचारे **काबुलदरीच्या** आशेस्तव तितक्याही भयंकर ठिकाणीं जाण्यास प्रवृत्त झाले. एकमेकांचा हात धरून दोघेही हळुहळू चालूं लागले. कोठें अवघड जागा असली म्हणजे खालीं हात टेंकून त्यांनीं घेतानेंच पुढें जावें. असो. या प्रकारें ते मोठ्या श्रमानें त्या दरीजवळ जाऊन पोहोंचले, आणि **नहीमुलखेनें** नीट लक्ष देऊन कानोसा घेतला, तों आंतून **काबुलदरीचाच** स्वर येतो आहे, असें पक्कें ओळखलें. नंतर ती **अकबरशहास** म्हणाली, " महाराज, आपलें काम तर झालें; पण हा आनंद घटका-अर्ध-घटकेचा दिसतो. कारण, **काबुलदरीच्या** विव्हळण्यावरून ती फार बेजार असावी, असा तर्क होतो; तेव्हां दृष्टिभेट मात्र होईल, इतकाच काय तो आनंद. " **नहीमुलखेचें** बोलणें ऐकून **अकबरशहा** म्हणाला" **नहीमुलखे**, शाबास! तुझ्या योगानें तरी मला पुनः भेटीचा लाभ होत आहे नाहींतर **काबुलदरीची** व माझी भेट पुनः कशी झाली असती ? प , **काबुलदरीला** पाहिल्यावांचून एक एक क्षण मला युगाप्रमाणें भासतो. आतां तुला शेवटचें सांगतों कीं, तिची माझी भेट झाल्यावर जर ती कांहीं दिवस या ईश्वरकृत सुखाचा अनुभव घेईल असें दिसलें, तर बरें, नाहीं तर माझेही पंचप्राण तिजबरोबर जातील ह्यांत संशय नाहीं. **नहीमुलखे**, आतां धीर धरवत नाहीं. याकरितां लवकर भेट करीव; एकवार माझ्या प्राणसखीची श्रमी झालेली काया माझ्या दृष्टीं पडूं दे. अरेरे! एकून माझ्याकरितां हे तिनें हाल सोसावे ना ? काय हें दुःख! हरहर! परमेश्वरा! काय तुझें चरित्र! असो. "

नंतर **नहीमुलखेनें** दरीचे तोंडीं धोंडा होता तो एके बाजूस सारून आंत प्रवेश केला; परंतु तेथें कांहींच दिसेना. कारण, आधींच रात्र आणि त्यांत काळोख, मग काय विचारावें ! **नहीमुलखा** हातांनीं चांपसीत ध्वनीच्या धोरणानें **काबुलदरीजवळ** गेली, आणि तिचा पाय हिच्या पायास लागल्याबरोबर ती **अकबरशहास** म्हणाली, "महाराज, माझ्या शब्दाच्या धोरणानें या. " नंतर **अकबरशहाही** चांपसीत त्या सुमारानें **काबुलदरीजवळ** जावून पोहोंचला. तीं उभे एका ठिकाणीं जमल्यावर **नहीमुलखा** त्याचा हात धरून म्हणाली, " महाराज, ही पहा **काबूलदरीची** काय दशा झाली आहे ती. " **अकबरशहानें**, जरी दिसत नव्हतें

तरी तिच्या शरीरावरून हात फिरविला आणि म्हणाला, "सखे काबुलदरी, काय तुझी दशा ही! आणि ही मजकरतां ना? अरेरे! कोणीं दुष्टानें हे वार केले ?अगे, तुझी निर्दयपणनें अशी दशा कोणीं केली? ह्यांत त्यांना काय मिळालें? काय सांगावें! त्वां त्या वेळीं मला बरोबर येऊं दिलें नाहीं, नाहींतर तुला मारणाऱ्याच्या नरडीचा घोट घेतला असता. आतां काय उपयोग? " असें म्हणून त्याच्या डोळ्यांतून दळदळां जलधारा वाहूं लागल्या. मग नहीमुलखा त्याचें शांतवन करते. ती म्हणाली, " सरकार, आतां अंमळ स्थिर व्हा. कारण, सूर्योदय झाला म्हणजे काबुलदरीच्या सर्व जखमांस मला एक वनस्पती माहीत आहे ती लावूं, म्हणजे मग कांहीं घोर नाहीं. आपण अगदीं शोक करूं नका. माझ्यानें होईल तितका यत्न करण्यास मी आळस करणार नाहीं. कारण, तिची अशी अवस्था झाल्यानें आपणास तर वाईट वाटलेंच, पण मलाही अति दुःख झालें आहे तें तोंडानें काय सांगूं? परमेश्वरकृपेनें ही वांचो, म्हणजे माझ्या श्रमाचें सार्थक झालें. काबुलदरीसारखी धनीण आतां मला मिळणें नाहीं; खरोखरच तिच्या गुणांचें स्मरण झालें म्हणजे मला रडेंच येतें. तें सर्व असो. पण महाराज, कदाचित् जर काबुलदरी ईश्वराजवळ गेली, तर तिच्या मागें आपण मला ग़रिबास अंतर देऊं नका, ही प्रार्थना आहे. आतां मला आश्रय कोणाचा आहे? सर्वस्व सोडून मीं या पायांचा आश्रय केला आहे; मी आपले धनिणीवांचून अनाथ झालें आहें. बरें, परतून शहरांत जर गेलें, तर मला पाहिल्याबरोबर सर्व जन मी काबुलदरीची सोबतीण म्हणून मला ठार मारतील. वास्तविक पाहिलें असतां काबुलदरीनें चंदानूरीचा मोठासा अपराध केला असें नाहीं; फक्त आपणास वश झाली हाच काय तो अपराध. महाराज, एक चंदानुरीस मात्र अजून पुरुषाचा स्पर्श नाहीं. बाकी सर्व शहरांत खरोखर प्रत्येकीनें एकेक पुरुष चोरून ठेविला आहे. पुरुष नाहीं असें एक घर मिळावयाचें नाहीं ? परंतु सर्वच चोर, तेव्हां चंदानुरीस कोण सांगतो? पुरुष धरून आणावा असा हुकूम झाल्यापासून लक्षावधि स्त्रियांनीं तें काम मोठ्या सपाट्यानें चालविलें. पुष्कळ लांब जाऊन सांपडतील तितके पुरुष धरून आणूं लागल्या. त्याना पुरुष धरण्याची मोकळीक मिळाली, हें काम चांगलेंच झालें, मग प्रत्येकीनें एक एक पुरुष आपल्या मनासारखा असला तर घरांत लपवून

ठेवावा; नाहींतर **चंदानुरीच्या** महालांत पोहोंचता करून बक्षीस मिळवावें. असा क्रम सुरू झाला. तेव्हां सर्वांप्रमाणें अमच्या **काबुलदरीनेंही** केलें. मग त्यांत काय विशेष झालें? परंतु ही उघड तुम्हांला वश झाली, आणि त्या सर्व चोरून कर्म करतात इतकाच काय तो फेर. असो. हिची काय दशा झाली आहे! अरेरे! देवा, तुला डोळे."

याप्रमाणें सुखदुःखाच्या गोष्टी बोलत आहेत, तों उजाडलें. तेव्हां त्या दरींत किंचित् उजेड पडला, आणि **काबुलदरीचें** अंग दिसूं लागलें. मग दोघांनीं तिला उचलून दरीच्या बाहेर आणिलें, आणि पाहातात तों डोळ्यांत प्राण उरला आहे; मग काय विचारावें? **अकबरशहा** मोठ्यानें छाती बडवून घेऊं लागला, तेव्हां **नहीमुलखा** म्हणाली, "महाराज, ही वेळ रडण्याची नव्हे, धुगधुगी आहे तोंच जर तिनें तुमचें मुख पाहिलें, तर खचीत कांहीं शेवटचीं अक्षरें तुम्हांजवळ बोलेल. याकरितां रडूं नकाहो. अंमळ हिय्या करून तिच्या डोळ्यांसमोर बसा; आणि मी जरा तोंडांत पाणी घालतें." असें म्हणून तिनें आपलें वस्त्र तेथें जवळच एक झरा होता त्यांत भिजवून आणून **काबुलदरीच्या** तोंडांत तें पिळलें. पाणी तोंडांत जातांच किंचित् तिनें नेत्र उघडून पाहिले तों आपल्या प्रिय कांतानें मांडी दिली आहे, आणि प्रियसखी **नहीमुलखा** जवळ बसली आहे. मग **अकबरशहाच्या** मुखाकडे एकसारखी टक लावून तिनें पाहिलें तेव्हां **अकबरशहाही** तिच्या मुखाकडे न्याहाळीतच होता. उभयतांची एक दृष्टि झाल्याबरोबर दोघांच्याही डोळ्यांवाटें अश्रुधारा चालल्या. त्या वेळेस **अकबरशहाच्या** नेत्रांतील पाण्यानें त्यास स्नानच झालें. **अकबरशहा** आपल्याकरितां अतिशय दुःख करीत आहे असें पाहून **काबुलदरीचा** जीव फारच तळमळूं लागला; परंतु उपाय काय? तिच्या मनांत **अकबरशहाशीं** पुष्कळ बोलावयाचें होतें, आणि तिनें तें कळविण्यास फार यत्न केला, परंतु तिचे अंगांत हात हालविण्याची किंवा पाय हालविण्याची शक्ति बिलकूल राहिली नव्हती. सर्व अंगावर मनस्वी जखमा झाल्या होत्या. शेवटीं **अकबरशहाशीं** बोलण्यासाठीं तिचा जीव धडपडूं लागला.

मग **नहीमुलखा** म्हणाली—"महाराज, तिच्या मनांत कांहीं तरी बोलावयाचें आहे; परंतु उपाय काय? आतां सर्व उपाय हरले." नंतर

दोन मिनिटांत प्राण जाणार त्याचे पूर्वीं काबुलदरीच्या मुखांतून हे-च कांहीं उद्गार निघाले. तेव्हां ते ऐकण्यासाठीं अकबरशहानें व नहीखेनें आपले कान तिच्या मुखाजवळ नेले. तेव्हां ती म्हणाली, "आतां दुःख करूं नका; ईश्वर तुम्हांला यश देवो. ज्या कामाकरितां आपण घराबाहेर निघालां होतां तें काम मी तुमचें करून देईन म्हणून म्हणालें होतें. पण ती गोष्ट तर आतां माझ्यानें होत नाहीं; परंतु तुम्हांस त्या कामाचा पत्ता मात्र सांगतें. येथून पश्चिम दिशेस सुमारें सातशें कोसांवर किंगरावतीचें राज्य आहे; ती फार सामर्थ्यवान् आहे; म्हणजे द्रव्यानें, पराक्रमानें व सर्व गोष्टींनीं तिच्यासरखी आज पृथ्वींत राज्यकर्त्री नाहीं आणि असें मोठें राज्यही कोणाचें नाहीं. तिच्याजवळ जी किंगरी आहे, ती बहुगुणी आहे, तिचा नाद श्रवणीं आला कीं, जन्मबहिऱ्यासही ऐकूं येऊं लागतें. ती मिळविण्याविषयीं तुम्ही यत्न करा. तिचा स्वतः चंदानुरीसारखाच लग्न न करण्याचा पण आहे, परंतु तिच्या हातून पुरुषास कांहीं इजा होत नाहीं. तिच्या राज्यांत इतर देशांप्रमाणें स्त्रिया व पुरुष आनंदानें नांदतात. फक्त स्वतः लग्न करावयाचें नाहीं एवढाच काय तो तिचा पण आहे. बाकी स्वभावानें व सौंदर्यानें तिच्यासमान मृत्युलोकीं तर कोठें नाहीं, मग स्वर्गलोकीं ईश्वर जाणे ! तुम्ही तेथें जाऊन माझी झालेली हकीगत माझ्या आवडत्या बहिणीस सांगा. काय करावें ? ( डोळ्यांवाटें पाण्याच्या धारा वाहतात. ) लहानपणीं जी एकदां तिची माझी तुटातूट झाली, तेव्हांपासून आजपर्यंत भेट झालीच नाहीं. माझे मनांतून तुमच्या कामाकरितां तिकडे येण्याचें होतें; म्हणजे तिची भेट झाली असती; पण तें सारें जागचे जागींच राहिलें. आतां माझ्यानें बोलवत नाहीं. शेवटचें सांगणें इतकेंच कीं, आपण हें काम करून नंतर आपल्या वृद्ध मातापितरांस भेट द्या. त्यांस तुम्हांवांचून कोण आहे ? शेंकडों स्त्रियांतून तुम्हींच काय ते. ते कितीही बोलले तरी वडील आहेत. ते बोलले म्हणून रुसून जाणें हें तुम्हांस योग्य नाहीं. दुसरें, जोंपर्यंत आपल्या देहांत देह आहे, तोंपर्यंत स्त्रियांस म्हणून वश होऊंच नका, व त्यांच्या छंदीं पडूं नका. कारण, स्त्रियांसारखी दुष्ट जात दुसरी कोणतीच नाहीं. फक्त निर्वाहाकरतां मात्र स्त्रियांची गरज ठेवा; परंतु त्यांना आपलें मन देऊं नका. नाहींतर त्या काय करतील ह्याचा नियम नाहीं. ह्या गोष्टी लक्षांत ठेवा. मी मृत झाल्यावर तुम्ही

माझें उत्तर-कार्य करून लवकर स्वदेशास जा. आतां माझे प्राण व्याकुळ होतात; मी चाललें. माझ्या जिवाचा एक दोहरा आहे, तो सांगतें. तो ऐकून घेऊन निरंतर त्याचा अर्थ लक्षांत ठेवा.

" दिल किसीकूं देना नही, दिलसे देना दिल ॥
नही मिला तो नही मिला, कम दिलकूं मत मिल "॥ १॥

असें म्हणून **काबूलदरीनें** डोळे झांकले. आणि ' या अल्ला ! या खुदा ' असें म्हणून **अकबरशहाचे** मांडीवर थंड झाली.

इतकी गोष्ट सांगून **किश्वरसिता** म्हणाला, " मग पुढें काय झालें तें आतां माझ्यानें सांगवेना. " मग **मेहरबश** इतकी निर्दय तरी तिच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा चालल्या; आणि **किश्वरसिता**" म्हणाली, " महाराज, आतां माझ्यानें पुढें काय झालें तें ऐकल्यावांचून राहवेना. तें सर्व माझ्या दृष्टीसमोर दिसत आहे. मला वाटतें कीं, **अकबरशहा** खरोखरच **काबूलदरीस** मांडीवर घेऊन बसला आहे. एकूण त्या दोघांची खरोखरी प्रीति होती, व प्रीतीचीं लक्षणें निराळींच आहेत. महाराज, मग पुढें **अकबरशहानें** काय केलें तें सांगा? तो बिचारा फारच रडला असेल, नाहीं बरें? काय करावें! फार वाईट वाटतें. तो एकदां तिच्या मुखांतला दोहरा तरी म्हणा. " **मेहरबश** असें म्हणते आहे, इतक्यांत दिल्लीदरवाज्यावरील दोन प्रहर रात्रींचा डंका पडला. तेव्हां निरुपाय होऊन **किश्वरास** ' तेथेंच निजा, 'असें सांगून आपण आपल्या महालांत निजावयस गेली.

दिवसभर प्रापंचिक दुःखामुळें श्रम पावलेले प्राणी घरोघर विश्रांति घेत आहेत, प्रत्येक शहरांतून दुर्व्यसनी लोकांचे रोजगार सुरू झाले आहेत, भूतपिशाचादि अनेक नीच देवतांस त्या वेळीं मोकळीक मिळाली आहे, अरण्यांतून वनस्पतींचें चलनवलन सुरू झालें आहे. तसेंच, वाघ, लांडगे, आस्वलें, वगैरे हिंसक पशूंना आनंद होऊन, ते आपलें शिकार-कर्म साधीत आहेत, यात्रास्थ लोक पंथ क्रमून दिवसभर दमल्यामुळें शांत होऊन कोठें विश्रांतीस पडले आहेत, पतिव्रता स्त्रिया दिवसभर सासुस्वश्रुरादिकांची सेवा करून त्या वेळीं प्रियपतीस संतोषित करीत आहेत, आणि तेणेंकरून दिवसां झालेल्या सर्व श्रमांचा विसर पावत आहेत. अहाहा! काय ती शांत वेळ! परंतु ईश्वरेच्छेनें अशा वेळींही एक दोन प्राण्यांस विश्रांति मिळत नाहीं. अरेरे! काय दुःख तें! सर्व ब्रह्मांड ज्या-

वेळीं स्थिर होतें, त्या वेळींही त्या दोघांस विश्रांति नाहीं. एकून ते जन्मास आले आणि न आले सारखेंच म्हटलें तरी चालेल. आतां असे प्राणी कोण म्हणाल, तर एक कामानें पीडित झालेला, आणि दुसरा हरएक संबंधीं कांहीं काळजींत निमग्न असलेला. अशा या दोघां प्राण्यांना कधींच विश्रांति नाहीं. विश्रांतीचें स्वरूप म्हणजे निद्रा आणि ती निद्रा कोणास येत आणि केव्हां येते म्हणाल, तर जिवाची तळमळ ज्या वेळेस थंड होते तेव्हां. आतां प्रिय मित्र विचार करतील कीं, ज्याला कोणत्याही गोष्टीची काळजी लागली, त्याची चित्तवृत्ति कधीं स्थिर झाली आहे काय ? जोंपर्यंत त्याला काळजी आहे, तोंपर्यंत त्याला विश्रांति म्हणून नाहीं. सर्व ब्रह्मांड जरी दोनप्रहर रात्रीं स्थिर होतें, तरी हा दुर्दैवी प्राणी तळमळत पडलेला असतोच. काय बिचारा अभागी !

तसेंच प्राणी स्त्री जातीचा असो, किंवा पुरुष जातीचा असो. या कामदेवानें कोणास सोडलें आहे काय ? एकदां ती मानसिक व्यथा मनुष्यास जडली म्हणजे सर्व जग विषतुल्य वाटून त्याचे मनाची स्थिरता होत नाहीं. तेव्हां मग झोंप कोठून येणार ? प्रिय मित्र हो, मागें तुम्हीं वाचलेंच कीं, **किश्वरास** तेथें निजा' म्हणून सांगून **मेहरबश** आपल्या महालांत गेली; परंतु त्या दोघांसही झोंप नाहीं. कारण एकास काळजी, आणि एकास कामदेव. **मेहरबश** पलंगावर जाऊन निजली, परंतु तिचे हृदयांत **किश्वरासिता** भरला होता, मग झोंप कोठून येणार ? ती मनांत विचार करते कीं, त्यांनीं गोष्ट सांगितली तशी आमची प्रीति जमेल काय ? जमली तर **काबुलदरी**प्रमाणेंच माझी प्रीति **किश्वरावर** बसेल. आणि ते तरी त्या **अकबरशहा**सारखेच गुणसंपन्न आहेत. अहाहा ! स्वरूप तरी काय ? केवळ मदनच आहेत. मी व्यर्थ आजपर्यंत दुर्धर प्रतिज्ञा घेऊन बसलें आहें. जो दिवस जातो आहे, तो लाख रुपये दिल्यानें पुनः मिळणार नाहीं. त्यांतून मनुष्यजन्म वारंवार येत नाहीं, आणि त्यांतही तारुण्यदशा, आणि सुरूप हीं तर अगदींच दुर्लभ आहेत. असें असून मीं आजपर्यंत व्यर्थ दिवस घालविले. आतां जे गेले ते गेले; परंतु आतां आहे असा सुद्धां पुढें राहिलेल्या कालांत योग येणार नाहीं. काय **किश्वरासिताचें** सौंदर्य आहे ! तारुण्य तरी किती सांगूं ! आणि मींही त्याला दासी शोभेन. मग आतां विलंब कशाला लावूं. आतां

माझ्यानें धीर धरवत नाहीं. **किश्वरासिता** आल्यापासून ज्या माझ्या आयुष्यांतील रात्री गेल्या त्या व्यर्थ गेल्या असें मी समजतें. आतां येथें कोणी नाहीं, सर्व जण निजलीं आहेत, तोंच तेथें जावें, म्हणजे ते मला आलिंगन देतील. आतां असें करण्यास लाज धरूं नये, किंवा त्यांना हातीं धरून या पलंगावर आणावें. उभयतां दोघें येथें बसल्यावर किती शोभा दिसेल ! तर चला आतां हळूच ते निजले आहेत तेथें जावें; आणि आपल्या मनांतील हेतु उघड रीतीनें त्यांना सांगावेत. कदाचित् न ऐकल्यास बळेंच त्यांचे गळ्यांत पडावें. अहाहा ! प्रीतिपाशानें सर्व जग कसें बांधलें गेलें आहे ? मघांशीं **किश्वरासितानें** दोहरा तरी काय उत्तम काढला होता ? एकून धन्य ती **काबुलदरी** आणि धन्य तो **अकबरशहा !** देवा, मला तिची योग्यता येईल काय ? छीः ! आतां तसें होण्याचा रंग गेला. कारण, पूर्वीं ज्या दुष्ट हातानें त्यांचे मानेवर मीं तरवार ठेविली, त्याच दुष्ट हातानें आतां ते आलिंगन घेतील काय ? अरेरे ! ! आगलागो माझ्या हातास ! मुख तरी काय माझें ! पूर्वीं ह्याच मुखानें मी त्यांना अपशब्द बोललें, आणि आतां याच मुखाचें ते प्रीतीनें चुंबन घेतील काय ! जळो माझें मुख तें ! सर्व लोक मला चंद्रानना म्हणतात; परंतु उपयोग काय ! अशा सुंदर मुखाचा उपयोग लोकांस दुष्ट भाषणानें ताडणें हाच काय ? नाहीं, नाहीं. **किश्वरासितासारख्या** पुरुषाचे कोमल मुखास मुख लागलें तरच काय तो उपयोग ! मित्रहो, असा मानसिक विचार करीत असतांच तिला डोळा लागला. इकडे त्या वेळीं **किश्वरासिताचीही** तीच अवस्था झाली. त्या बिचाऱ्यास तरी झोंप कोठची ! त्याचे मनांत सर्व **अश्रताबाद, मनोवराबाद** आणि वृद्ध मातापितर हीं घोळत होतीं. असें दुःख व पश्चात्ताप करतां करतांच त्यासही डोळा लागला.

सूर्योदय झाल्यावर नित्याप्रमाणें **मेहरवशेनें किश्वरासिताची** सर्व बरदास्त उत्तम प्रकारें ठेविली. नंतर सर्व दिवस जेमतेम रीतीनें गेल्यावर पुनः रात्रीं नित्याप्रमाणें **किश्वरासितास** तिनें प्रश्न केला. ती म्हणाली, " महाराज, तो **अकबरशहा काबूलदरीस** मांडीवर घेऊन बसला असतांच तिचा प्राण गेला. मग पुढें कसें काय झालें; " नंतर **किश्वरासिता** सांगूं लागला.

---

# रात्र तिसरी.

तो म्हणाला—" आपणास उपदेश सांगून **काबुलदरी**नें प्राण सोडला असें पाहून मग **अकबरशहा**ची काय स्थिति झाली असेल, याचा विचार तुम्हींच करा. आपली जी प्रिय वस्तु तिचा क्षणभर वियोग झाला, तर कोण अवस्था होत असते, याचा प्रत्येकानें विचार करावा. मग **काबुलदरी**सारखी सुंदर स्त्री, आणि प्रीतीची केवळ खाण, तिचा जेव्हां मृत देह मांडीवर पडला, तेव्हां मग **अकबरशहा**स कसें वाटलें असेल ? त्याला दाही दिशा शून्य दिसूं लागल्या. आणि तो मनाशींच म्हणतो , " ईश्वरा,-काय हें दुःख ! आतां संपूर्ण पृथ्वींत माझें कोणीं आहे काय ? मीं घरदार सोडून येथपर्यंत आलों आणि त्या दुष्ट **चंदानूरी**च्या हातीं सांपडून ठार मरणार होतों; परंतु प्रिये, काय तुझे उपकार ? मजवर किती पंचप्राण ? तिच्या दुष्ट कृत्यांतून मला जगवून शेवट मजकरितां तिच्याशीं वांकडी झालीस ना ? ( तिच्या मुखावरून हात फिरवून ) सखे, मजकरतां तूं आपला देह रणदेवतेस बली दिलास ना ? शाबास ! **काबुलदरी** शाबास ! तूं आपल्या इमानाची अखेर केलीस. अहाहा ! प्रियसखे, कोठवर तुझे गुण आठवूं ? ( चुंबन घेऊन ) सखे, तुझा लज्जित मुखचंद्रमा आतां कोठें पाहूं ? ( डोळ्यांत अश्रु येऊन ) प्राणसखे, बोलगे बोल. या **अकबरा**वर रागावलीस होय ? अग, स्नेह करून पूर्ण वासना पुरली नसतां तशीच स्वर्गी गेलीस ना ? असें ह्मणून तिच्या देहास दृढ आलिंगन देतो आणि पुनः ह्मणतो.

**काबुलदरी**, प्रीतीकरतां शरीरावर सहस्त्रावधि शस्त्रवार करून घेतलेस ना ? हे वार आतां तुझ्या देहावर नाहींत, तर आजपासून माझे देहावर आहेत. तूं तरवारीचे वार शरीरावर घेऊन माझे देहाला प्रीतीचे वार करून गेलीस. मग एकटी कां गेलीस ? मीं बरोबर येण्यास नाहीं म्हटलें असतें काय ? आतां तुझ्या मागें मला रहावेल तरी कसें ? कारण तूंच शेवटीं असें सांगून गेलीस कीं,—

' दिल किसीकू देना नही दिलसे देना दिल ॥
नही मिला तो नही मिला कम् दिलकू मत् मिल '॥ १ ॥

असें तूंच सांगितलेंस. तेव्हां जन्मास येऊन तुला एकदां दील दिल

होता, परंतु तूं तर गेलीस, तेव्हां आतां मागें जगून काय करूं ? आतां मी फकीर होणार. तुझा हा उपदेश मी मरेपर्यंत चालविणार. आतां वृद्ध पित्याचे औषधाचे तजविजीकरतां व तुझा निरोप सांगण्यास मात्र मी एकवार **किंगरावतीच्या** शहरापर्यंत जाऊन पित्यास औषध पोहोंचतें करतों, आणि नंतर तुझें थडगें मरेपर्यंत सोडीत नाहीं." असें म्हणून **अकबरशहा नहीमुलखेस** म्हणाला, "**नहीमुलखे**, आतां त्वरा कर. माझे प्रियसखीच्या मूठमातीची व्यवस्था केली पाहिजे, आणि नंतर तूं जर कृपा करून मजबरोबर येशील तर आपण **किंगरावतीच्या** शहरीं जाऊं, आणि तेथें सर्व झालेली हकीगत सांगून व तिनें कृपा करून कर्णाचें औषध दिलें, तर तें घेऊन माझे पित्यास पोंहोचतें करूं. नंतर त्या उपरांत मरेपर्यंत मी हें थडगें सोडणार नाहीं. पुढें तुला वाटेल तेथें तूं रहा. मर्जी वाटल्यास मजजवळ रहा. नाहीं तर माझे शहरीं मी आपले पित्याकडून तुझी अन्नवस्त्राची सोय करून देतों आणि तेथें तूं स्वस्थ रहा. चला आतां, पुढील सर्व व्यवस्था केली पाहिजे." असें म्हणून त्या दोघांनीं तेथें एक खांच खणली आणि त्या खांचेंत **काबुलदरीचा** देह पुरला व पुढें त्यांच्या रिवाजाप्रमाणें सर्व विधि त्यांनीं केला. नंतर एक दिवस तेथें राहून **किंगरावतीच्या** शहरास जाण्यास ते निघाले.

पहा, ज्या **अकबराची** केवढी योग्यता, कीं ज्यानें हुकूम करण्याचा अवकाश तों शेंकडों घोडे शृंगारलेले त्याच्यासमोर हजीर होत असत, त्यास का पायांनीं चालणें कपाळीं यावें ? ज्यावर शेंकडों अबदागिरी, छत्र्या नेहमीं शोभा देत असत, त्याला वृक्षच्छायाही मिळूं नये काय ? हर हर ! थोरावर प्रसंग म्हणजे मोठें प्राणसंकटच. त्यापेक्षां एकदम मृत्यु आला तर बरें. असो, अशा भयंकर मार्गांतून ते जात असतां त्यांची स्थिति काय होत असेल, याचा विचार फार सूक्ष्म दृष्टीनें केला असतां कळून येईल. दिवस उन्हाळ्याचे, पाणी नाहीं, छाया नाहीं, एकसारख्या सपाटीच्या अरण्यावेरीज त्यांना कांहीं दिसेना. त्यांनीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालावें; परंतु पुढें आणखी सपाट मैदान तितकें आहेच, असें दिसावें. मग त्यांची जी निराशा होई ती सांगतां पुरवत नाहीं. याप्रमाणें ते दुःख कंठीत व संकटें भोगीत **मोहनीपुराच्या** मार्गास हळू हळू क्रमूं लागले.

पुढें लहान मोठीं संकटें भोगून **अकबरशहा**, आणि **नहीमुलखा** सहा

महिन्यांत **मोहनीपुरास** जाऊन दाखल झाले. प्रथम शहराबाहेर एक बाग होता, त्या बागेंत एके बाजूस हे विश्रांतीस बसले. कांहीं वेळानें आराम वाटल्यावर **नहीमुलखा अकबरास** म्हणाली, महाराज, कसें काय? या ठिकाणीं खिचडी खाऊन मग शहरांत चला. कारण, एकदम शहरांत जाऊन आपणास कोण ओळखतें? आणि उतरण्यास तरी जागा कोण देईल? बरें कदाचित् **किंगरावती**च्या वाड्यांत एकदम गेलों, तर तेथें तरी दाद लागेल कीं नाहीं कोण जाणे! तेव्हां हें मोठें बिकट काम आहे. भुकेनें तर तुम्ही केवळ कासावीस झालां आहां. आज दोन तीन दिवसांत जेवण मिळालें नाहीं. महाराज, माझीही दशा आपणाप्रमाणेंच झाली आहे. तेव्हां पुढें हुकूम होईल त्या रीतीनें तजवीज करीन. **अकबरशहा** म्हणाला, " **नहीमुलखे**, तुझा विचार मोठा पोक्त दिसतो. मी खचीत सांगतों कीं, तुजसारखी सुज्ञ विचारी सोबतीण मला मिळाली, म्हणूनच हें **मोहनीपूर** माझे दृष्टीस पडलें. नाहींतर वाटेंतच **काबुलदरी**च्या समाचारास गेलों असतों. असो, अनेक संकटें व दुःखें भोगून आज या ठिकाणीं येऊन पोहोंचलों, म्हणून ईश्वराचे फार आभार मानिले पाहिजेत. **नहीमुलखे**, तुजसारखें विश्वासू व इमानी मनुष्य तर पृथ्वीवर मिळावयाचें नाहीं. पहा, तुला आणि मला श्रम सारखेच झाले आहेत, तेव्हां तूं बस, आणि सरंजाम आणावयास मी जातों." **नहीमुलखा** म्हणते " महाराज, आपण शहरांत जावें हें ठीक दिसत नाहीं. याकरतां प्रथम साहित्य मीच घेऊन येतें; आणि जेवल्यानंतर मग आपण शहरांत जावें."
मग **अकबरशहास नहीमुलखे**चाच बेत पसंत होऊन त्यानें आपल्या हातांतील एक रत्नखचित मुद्रिका तिच्या स्वाधीन केली आणि सांगितलें कीं, **नहीमुलखे,** ही मुद्रिका बाजारांत विकून याचे जे होन येतील ते तूं आपल्याजवळ घे; आणि एक होनाचें सर्व साहित्य घेऊन बाकीचे होन तेथें जे कोणी लंगडे, पांगळे, लुले, आंधळे असतील त्यांना वांटून दे, आणि जलद माघारी ये.

हुकूम झाल्याबरोबर **नहीमुलखा** मुद्रिका घेऊन निघाली. ती ग्रामस्थ लोकांस बाजारमार्ग विचारीत विचारीत थेट बाजारांत गेली, आणि तेथील सराफ मंडळीस ती आंगठी तिनें दाखविली. आंगठी पाहतांच सर्व सराफ फार खूष झाले, आणि **नहीमुलखेस** विचारतातः—

**सराफ**—कां बाई, आंगठीवर तुम्हांस किती होन पाहिजेत?

**नहीमुलखा**—कृपा करून आपण जे द्याल ते.

**स०**—पांच होन देतों बाई. (फार मोलाची आंगठी असतां हा सराफ बाईस फसवून थोडे होन देतो, आणि आंगठीवर पुष्कळ पैदास करील, असें जाणून शेजारचा दुकानदार सराफ याच्या अंतःकरणांत मत्सर उत्पन्न झाला, आणि ती **नहीमुलखा** त्या पहिल्या सराफास होय म्हणणार त्याचे अगोदर तो दुसरा पुढें येऊन बोलतो. )

**दुसरा स०**—अहो बाई, तुम्ही इकडे या, मी तुह्मांस दहा होन देतों. इतक्यांत तिसऱ्यानें शंभर केले. याप्रमाणें चढत चढत ती आंगठी दहा हजार होनांपर्यंत चढली. शेवट आपआपसांतच त्या सर्व सराफ मंडळींत कज्जे होऊन खून पडण्याची वेळ आली. "एक म्हणे प्रथम गिऱ्हाईक मीं पछाडलें, तेव्हां आंगठीवर माझा हक्क आहे. दुसरा म्हणतो आंगठी मी घेणार. तिसरा म्हणतो, या बाईची खुषी आहे; तेव्हां मर्जीस येईल त्याला ती देईल;" याप्रमाणें एकमेकांत भांडणें होऊन शेवट मोठी मारामारी झाली. त्या गर्दींत "धुम धर कीं मार" असा तडाका चालला होता. याप्रमाणें गोंधळ होऊन गेला. सगळ्या बाजारांत पळापळी झाली. कैक सुखवस्तु लोक रस्त्यानें जाणारे, त्यांनाही धक्कधक्के मिळाले मग सरकारी अम्मलदार तेथें येऊन त्यांनीं त्या सर्व सराफांस व त्या बाईस कैद करून सरकारवाड्यांत नेलें. चौकशीअंतीं ती आंगठी तीन लक्षांची ठरली, व हजार होन देऊन सर्व सराफ या बाईस ठकवीत होते, असें सिद्ध झालें. मग त्या सर्व सराफांपासून दहा दहा, होन दंड घेऊन सोडून दिलें, आणि बाईस **किंगरावती**जवळ नेलें. तेव्हां तेथें चौकशी झाली, ती—

**किंगरावती**—बाई तूं कोण, आणि आंगठी कोणाची?

**नही०**—येथें एक महा साधु फकीर आले आहेत त्यांची मी दासी, आणि आंगठीही त्यांचीच आहे.

**किंगरा०**—साधु कोठें उतरले आहेत?

**नही०**—शहराबाहेरील बागेंत उतरले आहेत.

**किं०**—आंगठी घेऊन तूं कां गांवांत आलीस?

न०—पोटाचा सरंजाम घ्यावा, व बाकी राहिलेले होन गरीबांस वांटून द्यावेत म्हणून.

किं०—आंगठीची किंमत तीन लक्ष होन आहेत, आणि तितके होन तूं वांटणार काय ?

न०—होय सरकार.

किं०—शाबास ! एकून तुमचे साधु फार औदार्यशील आहेत. आणि अशा अमोल वस्तु त्यांच्या संग्रहास आहेत; तेव्हां ते कोणी तरी महान् किमयीवाले; किंवा पूर्वींचे तरी श्रीमान् असावेत असा तर्क होतो. असो, माझे मनांतून त्यांचें दर्शन घेण्याची इच्छा आहे, तर तें होईल काय ?

न०—होय सरकार. आज सायंकाळीं ते फेरीकरतां शहरांत येणार आहेत, त्या वेळेस सर्वांस दर्शन होईल.

किं०—ठीक आहे. तर मग ही आंगठी मी विकत घेतें, आणि फकीरबावांस माझा निरोप सांगा कीं, शहरांत आलां तर या अनाथास दर्शन दिल्याशिवाय जाऊं नका. असें म्हणून तीन लक्ष होनांचे छकडे तिनें गाडींत भरण्याचा हुकूम केला, आणि गाडी सिद्ध झाल्यावर किंगरावतीनें ती नहीमुलखेच्या स्वाधीन केली. ती घेऊन नहीमुलखा मार्गस्थ झाली, आणि प्रथम बाजारांत दोघांला पुरेशी शिधासामुग्री घेऊन नंतर उरलेलें द्रव्य गोरगरीबांस वांटीत वांटीत शहराबाहेरील बागेंत जाती झाली.

इकडे अकबरशहा भुकेनें व्याकुळ होऊन नहीमुलखेस कां उशीर लागला म्हणून वाट पहात चिंताक्रांत बसला होता. इतक्यांत नहीमुलखा जाऊन पोहोंचली. तों तिच्यामागें शहरांतील हजारों गोरगरीब भिकारी लागून बागेपर्यंत " मी तसाच राहिलों, मला द्या, मला द्या. " असें म्हणत मागें लागत आले होते. नहीमुलखेनें उशीर लागण्याचें कारण वगैरे सांगून त्वरित स्वयंपाक केला, आणि उभयतांचीं जेवणें होऊन तीं विश्रांतीकरितां अंमळ निद्रिस्त झालीं.

संध्याकाळीं फकीरबावा शहरांत येणार म्हणून चहूंकडेस गडबड होऊन राहिली आहे. सरकारवाड्याचे रस्त्यावर तर पैसा देऊन उभें राहण्यास जागा मिळेना. दर्शनाकरितां लाखों माणसांचा जमाव जमून ठिकठिकाणीं मंडळींचे थवेच्या थवे उभे राहिले आहेत, आणि आतां स्वारी येईल, मग

स्वारी येईल, आले आले, बागेंतून निघाले, असा सर्वांच्या तोंडांतून शब्द ऐकूं येत आहे. पांच वाजण्याचा सुमार झाल्याबरोबर **किंगरावती**-ही फकिराचे दर्शनाविषयी उत्कंठित होऊन शृंगार करून आपले महालांत बसली आहे. कोणाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून खिडकीस चिकाचे पडदे सोडले आहेत. खिडकीवाटें तिनें खालीं पाहिलें, तों लाखों मनुष्यांचा रस्त्यावर अगदीं चेप होऊन राहिला आहे. त्यांत कोणी घोड्यावर, कोणी गाडींत, कोणी उंटावर, कोणी अंबारींत बसून जात असल्यामुळें ती पाहण्यासारखी शोभा दिसत होती. याप्रमाणें फकिराच्या दर्शनास **किंगरावती**सह मंडळीचा थाटमाट पहात आहे.

इकडे **अकबरशहा**ची दोन घटका विश्रांति वगैरे झाल्यावर मग तो शहरांत जाण्याकरितां निघाला. हळू हळू शहरांत येत आहे, तों कैक उतावळे लोक त्याला शहराबाहेरच सामोरे आले, आणि नमस्कार करून शेंकडो लोक बावांच्या मागें पुढें चालले आहेत. नंतर **अकबरशहा** शहरांत येऊन पोहोंचला. मग तर एकावर एक दर्शनाकरितां माणसें आदळूं लागलीं. रस्त्यानें पाय पडण्यास जागा नाहीं अशी गर्दी झाली. फकीरबावाची स्वारी हळू हळू राजवाड्यापुढें येऊन पोहोंचली. अहाहा ! काय स्वरूप त्यांचें ! जरी प्रवासाचे दुःखामुळें **अकबरशहा** अगदीं निस्तेज झाला होता, तरी त्याची राहिलेलीच कांति पाहून गांवांतील सर्व लोकांस व मुख्यत्वें **किंगरावती**स पराकाष्ठेचा मोह उत्पन्न झाला. **अकबरशहा**चें सुहास्यवदन असून किंचित् शोकग्रस्त झालेला मुखचंद्र, दोहीं बाजूंस धनुष्याकार काळ्याभोर भिंवया, त्याचे आंत पूर्ण पाण्यानें भरलेले तेजदार मोठे डोळे, नासिक पाहून शुकानें अरण्य स्वीकारलें; विस्तीर्ण दैवशाली ज्याचें भाळ शोभतें आहे. अहाहा ! गाल तर तारुण्यरसानें मुसमुसीत भरले आहेत काय असें वाटे. संपुष्टाकार कोंवळ्या ओंठावर पुरुषत्वाची निशाणी नूतन उद्भवत आहे. दांत पाहून तर पृथ्वींतील रत्नेंच गुप्त झालीं, ह्मणून फारशीं कोणास सांपडेनात. अहाहा ! असा तो मनोवेधक तेजदार **अकबरशहा**चा चेहरा पाहून कोणती तरुण स्त्री मोह पावणार नाहीं बरें ? त्या शहरांतील बहुतेक स्त्रिया त्या फकीरबावाकडेस कामदृष्टीनें पाहूं लागल्या. मग **किंगरावती**चेंच मन कसें राहील ? जनलज्जेमुळें **किंगरावती** बाहेर न दाखवितां आपले मनांतच म्हणूं लागली:—“ अरेरे ! धिक्कार असो

माझे देहास ! मी आपलें अमोल तारुण्य व्यर्थ दवडतें आहें. पहा, संपूर्ण पृथ्वींत मजसारखी हतभाग्य कोणी नसेल. स्वाधीनची गोष्ट असून मी व्यर्थ दिवस घालवितें आहें, यास काय म्हणावें? मनुष्यजन्मीं सुखाची गोडी जर घेतली नाहीं, तर मग देह वागवून उपयोग काय ? या फकिरास पाहून कधीं आजपर्यंत न झालेली दु:सह व्यथा मला झाली. आतां काय करूं ? माझ्यानें दम कसा धरवतो ! कदाचित् त्यास बोलावून आणिला, आणि आपला हेतु कळविला, तर तो सिद्ध झालेला फकीर या गोष्टीस रुकार तरी कसा देईल ? हाय हाय ! माझ्या संपूर्ण देहाची आग होत आहे. ( दासी दोहींकडे उभ्या राहून वारा घालीत होत्या त्यांस म्हणते ) नकोगे नको ! मला आतां विंझणवारा नको, त्यायोगानें मला जास्त दाहा होऊं लागला. हे पुष्पहार माझे गळ्यांतून काढा. यांत सर्प घातलेत कीं काय ? माझे कोमल देहास वारंवार दंश कोण करतो ? " असें म्हणून पुन: मनांत म्हणते—( रस्त्याकडेस टक लावून ) " अहाहा ! काय हा सुंदरपणा ! ईश्वरानेंच स्वत: हा देह बनविला काय ? किंवा मजसारख्या व्रतस्थ स्त्रियांचा व्रतभंग करण्यास हा पुतळा या लोकीं आला काय ? काय निटस बांधा आहे ! कांति किती तेज:पुंज, सुकुमारत्व तरी तसेंच आहे. मला वाटतें, कोणत्या तरी राजकुलांतील हें रत्न असावें, माझ्या बोलावण्योंन या कामांध स्त्रीच्या महालीं ते येतील काय ? छि: ते कसचे येतात ! येतील. " द्रव्येण सर्वे वशा:" हें कवीचें वाक्यसुद्धां खोटें आहे. कारण, अशा पुरुषास द्रव्याची तरी काय गरज आहे ? ज्यानें हंहं म्हणतां तीन लक्ष होन सकाळीं गोरगरिबांस वांटून टाकले, तो माझ्या द्रव्यानें मला वश होईल काय? ह्याच्या संपूर्ण चिन्हांवरून हा पूर्वींचा खचित कोट्याधीश श्रीमंत असावा असा तर्क होतो; परंतु कांहीं तरी प्रापंचिक कारणानें पश्चात्ताप पावून यानें हा वेष धारण केला असावा. कसेंही असो, ह्याचा स्नेह संपादिल्यावांचून हा प्राण आतां रहात नाहीं." **किंगरावती** असा विचार करीत आहे, तों त्या फकीरबावाची स्वारी थेट त्या **किंगरावतीच्या** महालाखालीं आली. तेथें तर हजारों लोक दर्शनाकरितां वाट पहात आहेत. कित्येक जारिणी आपली कामवासना त्याच्याशीं कोणत्या रीतीनें साधेल ह्या विचारांत आहेत, आणि **किंगरावती** तर अगदीं बेहोष झाली आहे. अशा समयीं

फकिरानें वर तोंड करून, **काबुलदरीनें** आपल्या अंतःकाळीं सांगितलेला दोहरा म्हटला,—आधींच त्याचें उत्कृष्ट स्वरूप, त्यांत कंठ मधुर, त्यामुळें सर्व लोकांचें अंतःकरण अगदीं त्याच्या " काय मुखांतून निघतें " इकडेस लागलें होतें. त्यानें तो सवाल म्हटलेला सर्व लोकांनीं लक्ष्यपूर्वक ऐकला. त्यांत **किंगरावतीच्या** हृदयांत तर तो पूर्ण ठसून त्यांतील थोडाबहुत अर्थही ती समजली.

### दोहरा.

दिल किसीकू देना नही, दिलसे देना दिल ॥
नहि मिला तो नहि मिला, कम् दिलकू मत् मिल ॥ १ ॥

**अकबरशहा** फकिराचा सवाल ऐकून **किंगरावती** अगदीं घाबरी झाली, आणि आपल्या दोनें तीन दासी फकिरास वर आणण्यास तिनें खालीं पाठविल्या. त्या दासी मोठ्या जलदीनें येऊन फकीराच्या पायावर त्यांनीं डोकीं ठेविलीं, आणि हात जोडून पुढें उभ्या राहून म्हणाल्याः—" फकीरबावा, आमचें सरकार ज्या **किंगरावती राणी**साहेब त्यांनीं आपणास दर्शनाकरितां विनंति केली आहे कीं, यावज्जन्मांत मी कोणाच्या दृष्टीस पडलें नाहीं, आणि कधीं पडत नाहीं. सबब साईनीं मेहरबानी करून वर येण्याची तसदी घ्यावी." महाराज, राणीसाहेब दर्शनाखातर फार उतावळ्या झाल्या आहेत. आपण समर्थ आहां, आपणास रंक आणि राव सारखेच आहेत. दर्शनाकरितां दीन झालेल्या माणसास पावन करणें हा साधूंचा धर्म आहे. याकरितां साई, हेतु पूर्ण करावा." उभय दासींचा करुणाशब्द ऐकून **अकबरशहास** दया आली, आणि मनांत विचार करितो कीं, " मुख्य येथपर्यंत येण्याचा मूळ उद्देश हाच आहे. **किंगरी** मिळण्याकरितां आपल्यास केव्हां तरी **किंगरावतीची** भेट घेतलीच पाहिजे. मग मानानें जावें हें बरें, न जाणो अशी वेळ पुनः येते कीं नाहीं कोण जाणे. आतां जरी आपण **काबुलदरीच्या** वियोगानें फकीर-वेष धरला आहे, तरी वडिलांचे कामाकरितां या तरुण **किंगरावतीची** भेट घेण्यास हरकत नाहीं, आणि तसें करण्यास **काबुलदरीची** परवानगीही आहेच, मग हरकत काय? फक्त **काबुलदरीच्या** उद्देशाप्रमाणे कोणतेही स्त्रीस वश होऊन दिल मात्र देणें नाहीं, बाकी **किंगरावती**-

च्या महालीं जाण्यास प्रत्यवाय आहे असें नाहीं." असा विचार करून **अकबरशहा** त्या दासीस म्हणाला, " चला, तुमची धणीन ज्यापेक्षां दर्शनाकरतां इतकी उतावळी झाली आहे, त्यापेक्षां आम्हीही तिच्या भेटीसाठीं फार उत्सुक झालों आहों. चला, मला वर घेऊन चला." फकिराचे मुखांतील ही अमृतवाणी ऐकून दासीस पराकाष्ठेचा हर्ष झाला, आणि एक तर हें आनंदाचें वर्तमान सांगण्यास पुढें धांवत गेली, आणि एकीनें फकिराचा हात धरून ती हळूहळू **किंगरावतीचे** महालीं त्याला नेऊं लागली.

पहिल्या दासीनें **किंगरावतीस** फकीर वर येतात असें वर्तमान सांगतांच ती धांवतच आनंदानें जिन्यापर्यंत सामोरी गेली, आणि मोठ्या आदबीनें **अकबरशहाचा** हात धरून आपल्या महालांत नेऊन रत्नखचित चोपाळ्यावर त्यास बसविलें. **किंगरावती** आपल्या हातांत वाळ्याचा पंखा घेऊन त्यास वारा घालीत उभी राहिली. मित्र हो, अशा वेळीं तो जोडा फारच शोभायमान दिसूं लागला. त्यास उपमा तरी कशाची द्यावी ? आपल्या महाराष्ट्र भाषेंत कोणत्याहि विषयाच्या वर्णनाची पूर्वीच्या महान विद्वान कवींनीं एक एक सीमा करून ठेविली आहे. म्हणून एखाद्या विषयास अलीकडे पराकाष्ठेचें पूर्ण स्वरूप देण्याचें काम कोणास पडलें तर ते लागलींच पूर्वी केलेल्या त्यांच्या सीमेस जाऊन मिळतात म्हणजे झालें. परंतु त्यापेक्षांही वर्णन जास्त असावें असें जर मनांत आलें, तर पुढें भाषेंत शब्दच सांपडत नाहींत. असो.

**अकबरशहा** ( फकीर ) त्या वेळीं चोपाळ्यावर बसला असतां, साक्षात् मदनाप्रमाणें त्याचें स्वरूप दिसूं लागलें आणि **किंगरावती** तर रतीच काय अशी शोभूं लागली. फकिराचे मुखाकडे वर दृष्टि उचलून पहाण्यास फारच भीड वाटत असल्यामुळें, तिनें मर्यादेनें खालीं मान घातली आहे. अहाहा ! काय ती टवटवी आणि काय तें सुंदर तेज ! प्रत्यक्ष मदनानेंच तिच्याकरितां अवतार घेतला काय ? असो. **किंगरावती** उभी असतां मनांत विचार करते--" परमेश्वरा, तुझ्या उपकारास आतां उतराई नाहीं. अरे, आजपर्यंत रक्षण केलेलें यौवनद्रव्य आतां खर्चण्याची वेळ आणलीस खरी, आणि आतां तें ठेवून तरी काय उपयोग ? शेवटीं अग्नीला अर्पणच करणें कीं नाहीं ? त्यापेक्षां पात्र पाहून दान करावें हें बरें नव्हे

का ? पण तें ह्या स्वारीनें घेतलें तर द्यायचें, नाहीं तर अग्नीला अर्पण करीन. परंतु दुसऱ्या पुरुषास नख दाखविणार नाहीं. " प्रिय वाचकहो, **किंगरावतीच्या** मनांत कामवासना येऊन जशी तिची अवस्था झाली, तशीच ह्याचीही इकडे झाली. साधुत्व आणि औदासीन्य सर्व त्या वेळीं मागें म्हटलें. कामरूपी घोड्यावर " मनाजीराव " स्वार होऊन तरवार गाजविण्याच्या बेतांत आले. यानेंही हळूच मधून मधून तिच्या मुखाकडे पाहून पुनः पाहिलें न पाहिलें असें करावें, आणि जशी कांहीं ध्यानींमनींही गोष्ट आलेली नाहीं असें दाखवावें. परंतु तें सारें आवरल्यानें आंवरेना. **किंगरावतीस** पाहून तो मागील सर्व विसरला. त्याला वारंवार असें वाटे कीं, " मी स्वप्नांत आहें काय ? बसलों आहें हें इंद्रभुवन किंवा चंद्रभुवन ? हा चोपाळा अधांत्रीं आहे कीं जमिनीवर आहे ? सुगंधयुक्त वायु अंगास कसा लागतो आहे ! हा कोणी बुद्धिपुरःसर घालतात, कीं बाहेरून सजीव झुळूक येते ? गुलाब, आंबर, पाच, मोतिया इत्यादि अत्तरांचा परिमळ या महालांत भरला, कीं मीच भ्रमिष्ट झालों ? इंद्रियदेवतेची बदली झाली काय ? शेंकडों रंग-बे-रंग चहूंकडेस काय चकचकत आहेत ! तें सारें असो. पण फार वेळ माझ्याजवळ उभी आहे ही कोण ? ( मनांत ) अरे **अकबरा**, अशी तेजःपुंज मूर्ती या मृत्युलोकीं कधीं तूं पाहिली आहेस का ? आतां ही रंभा, का अप्सरा, कीं उर्वशी, या तीनपैकीं हिला कोणती ओळखूं ? अहाहा ! केवळ रतीच आहे असें वाटतें. अरे **अकबरा**, तुजकरितांच ती कामभूत झाली आहें असें दिसतें. आणि नेत्र तरी किती चंचल आहेत ? वा ! कोण भाग्यशाली हिचा भोक्ता असेल ? धन्य त्याची ! त्यानें इह लोकींचें पूर्ण सुख घेतलें, ह्यांत संशय नाहीं. असो, मी तरी किती निर्दय ! ती प्रहरभर मजसमोर उभी असून मीं द्वाडानें तिला क्षणभर बस सुद्धां ह्मणून म्हटलें नाहीं. आतां काय करूं ? तिला खचित माझा रोष आला असेल. पण तें सारें असो. **अकबरा**, आपण होऊन हिच्या महालांत आलों आहों, किंवा हीच आपल्या महालांत येऊन उभी राहिली आहे कोण जाणे ! पण माझ्या महालांत ती येण्यास मी प्रथम तरी कोणत्या ठिकाणीं मुकरर बसलों आहें हें तरी मला कोठें कळतें ? आणि तो मी किंवा मी मी ह्याचा तरी कोण निर्णय करील ? " असें ह्मणुन पुनः दचकल्यासारखा पाहूं लागला.

फकिराची अशी चंचलवृत्ति पाहून **किंगरावती** हळूच म्हणाली.— " महाराज, ( हात जोडून ) असे चंचल कां झाला ? संकोच कां धरतां ? आज आपल्या दर्शनानें ही स्त्री कृतकृत्य झाली. साई, कांहीं दिवस मज अभाग्याच्या घरीं वास्तव्य करून मला पुनीत करावें असा हेतु आहे. मर्जी झाल्यास हें सर्व राज्य आपल्यावर खुरबान करून मीहि फकिरीण होतें. साई, सर्वांस मुकलें तरी चिंता नाहीं. परंतु आपला प्रसाद व्हावा अशी इच्छा आहे. " **किंगरावतीचें** हें भाषण ऐकून आपण स्वप्नांत नसून खरोखरीं जागे आहोंत, अशी त्याची खातरी झाली, नंतर तिच्याशीं कांहीं भाषण केलें तें येणेंप्रमाणें:—

**फकीर**—अगे तूं कोण, तुझें नांव काय. राहण्याचें ठिकाण कोणतें, आणि मला वर बोलावण्याचें कारण काय इतकें सांग; ह्मणजे आह्मी येथून चालते होतों. संध्याकाळ होत चालली आहे, आम्हांस तर अझून लांब दीड कोस परत बागेंत जाणें आहे. त्या ठिकाणीं आह्मीं उतरलों आहों; म्हणून त्वरा करून तुझें वृत्त सांग, आणि आम्हांस रजा दे.

**किंग०**—( हात जोडून ) साई, माझें नांव **किंगरावती.** मी या देशाची व शहराची मालकीण आहें. परमेश्वरकृपेनें मला कोणत्याही प्रकारें न्यूनता म्हणून नाहींच. पृथ्वीतलावर मजसारखें मोठें राज्य कोणाचेंही नसेल. माझा सैन्यसिंधु पाहून जलसिंधुही लज्जा पावेल. कुबेरही मजपुढें दरिद्री; पराक्रमानें इंद्रही क्षणभर भूतळीं आणीन; स्वरूपानें लक्ष्मीस लज्जित करीन. महाराज, दयाळू ईश्वरानें या मशकास इतकें शिखरीं चढवून बसविलें आहे ! शिवाय मुख्य सांगण्याचें कलम राहिलें आहे तें हें कीं, प्रस्तुत ईश्वराचे दयासागरांतील बहुतेक वृष्टि याच दीनावर आहे ह्यांत संशय नाहीं. याचा बळकट पुरावा सांगतें कीं. वर सांगितलेलीं संपूर्ण सुखें मला अनुकूल असून, आणखी एक वस्तु मला अशी लाधली आहे कीं, त्या योगें जें ब्रह्मदेवाच्यानेंही होणार नाहीं, तें मज गरिबाच्या हातून घडून येतें. अशी वस्तु कोणती म्हणाल तर तिचें नांव **किंगरी.** ती एका अवलियानेंच मला दिली आहे. तिच्या नादानें जन्मबहिरा प्राणी असला तरी त्याला ऐकूं येऊं लागतें, जवळ असल्यास शरीरास भीति नाहीं, निरंतर यश देणारी, आणि स्वरानें जग मोहणारी. साई, तिचे गुण मी किती सांगूं ? अशी उत्तम गुणी केवळ सुखाची खाण जी

**किंगरी** ती मजजवळ आहे, त्या योगानें येथील सर्व सुखांची मी मालकीण आहें, आणि त्यावरूनच माझें नांव **किंगरावती** असें पडलें आहे. महाराज, इतकेंही सर्व अनुकूल असून मला आतां फारच पश्चात्ताप झाला आहे. साई, जो माझ्या झालेल्या दुःखाचा परिहार करील त्याला ह्या किंगरीसुद्धां संपूर्ण राज्य देईन, त्याकरतां किती संकटें भोगावीं लागलीं तरी भोगीन, पण तें सौख्य आतां प्राप्त झालें पाहिजे. अरेरे ! आजपर्यंत व्यर्थ आयुष्य गेलें ! धड इहलोक ना परलोक ! व्यर्थ हें अमोल वय घालविलें ! महाराज, तुम्हांसारख्यां मनमोहक पुरुषाशीं कधीं हंसून भाषण केलें नाहीं. अशा कोमल पायांची कधींहि या दुष्ट हातांनीं चाकरी केली नाहीं. आनंदभरांत मग्न असतां कधीं प्राणप्रियकरांवर रुसलें नाहीं. असा सुवर्णचंपककांती देह संनिधानीं असून कधीं मंचकावर शयन केलें नाहीं. अरेरे ! व्यर्थ तारुण्य गेलें. परलोकीं वंशोद्भवावांचून गतिही नाहीं. शिव शिव ! आतां कोणास माझी दया येईल काय ? मला पश्चात्ताप झाला असतां लागलींच त्याचें शांतवन होण्यास ईश्वरानें आपली प्रेरणा केली आहे काय ? नसेल. हें माझें बोलणें ऐकून साई महाराज, आपण रागावलां असाल, पण नसाल रागावलां. कारण, आपले चर्येवरून आपण दीनदयालु आहांत अशी खात्री होते. तर मग त्वरा करा आतां. सर्वांगांत स्मराचा संचार झाल्यामुळें अमर्याद भाषणें निघालीं, त्याबद्दल माफी करा. मजवर कृपा तर करालच. पण न जाणो, " ही स्त्री इतकी निःसंग आहे कीं माझी हिची ओळख नसतां मजबरोबर पहिल्या भेटीसच अमर्यादपणें वागली, तेव्हां पुढें काय ! " असें कांहीं आपल्या मनांत आलें असेल, परंतु मी तशी नव्हें. मीं आजपर्यंत केलेला दुर्घट पण मला भोंवला. तो मजकूर अंमळ लांबलचक आहे, म्हणून तो आतां सांगण्याची वेळ ही नव्हे; परंतु त्याचा सारांश इतकाच कीं, " मनासारखा नवरा मिळेपर्यंत लग्न करावयाचें नाहीं " आणि तें करावेंच असेंही मनांत फारसें वाटत नसे. कारण, पुरुष तेथून निर्दयी, घातकी, बेइमानी, असे बहुदोषी असतात, तेव्हां त्यांच्याशीं प्रसंगच नको, असें माझ्या मनांत होतें. परंतु मनायोग्य नवरा मिळाल्यास लग्न करण्याचा माझा कांहींसा निश्चय होता खरा. तेव्हां त्याप्रमाणें आज घडून आलें. साई महाराज, आतां या चातक पक्ष्याची तृषा शांत करावी. "

**किंगरावतीचें** हें भाषण ऐकून **अकबरशहा** आपल्या मनांत तिचे सर्व रंग समजला; परंतु किंगरी हातीं आली पाहिजे म्हणून त्याच वेळेस त्यानें तिला दुःख दिलें नाहीं. त्यानें मनांत विचार केला कीं, " हिच्या मनांत आपल्याविषयीं कामवासना उत्पन्न झाली आहे, परंतु एक वार जो देह **काबुलदरी**च्या प्रीतीस अर्पण केला तो केला. तिच्या पश्चात् आतां अशी गोष्ट पुनः करणें नाहीं. जरी स्वरूपानें अति रूपवती आहे, आणि आपण स्नेह केल्यास वेळेस आपली सर्व संपत्तीही अर्पण करील, व राज्याचें प्रमुखत्व मला देऊन आपण दासी होईल, इतकी जरी ही लंपट झाली आहे, तरी तसें केल्यावर माझी **काबुलदरी** मला स्वर्गीं हंसेलना ? अरेरे ! अशी स्त्री पुनः मिळणार नाहीं, आणि आतां तिच्या पश्चात् आपल्यास संसारसुख घेणें नाहीं. मरणकालपर्यंत फकीरवेषानें तिच्या थडग्याजवळ वस्ती मात्र करावयाची. इतकें मात्र खरें आहे कीं, आतांच या **किंगरावतीस** ' नाहीं, ' म्हणून सांगणें बरोबर नाहीं. कारण, अद्यापि किंगरी हातीं येणें आहे, तेव्हां किंगरी मिळेपर्यंत तिच्याप्रमाणें कांहीं वागलें पाहिजे. " असा विचार करून त्यानेंही किंचित् तिच्या बोलण्यास रुकार दाखविला म्हणजे तिच्या चंचल नेत्रांकडे पाहून किंचित् हास्यवदन केलें. तेव्हां **किंगरावतीस** असें वाटलें कीं, साई माझ्या हेतूस खचीत मान्य आहेत. असो.

याप्रमाणें **किंगरावतीस** वाटल्यावर मग तिनें **अकबरशहाची** फारच योग्य रीतीनें बरदास्त ठेविली.

**किंगरावती** आणि फकीर असें बोलत असतांच तेथें संध्याकाळ झाली, नंतर फकीरानें तिला परत बागेंत जाण्याविषयीं विचारलें, तेव्हां तिनें ती रात्र तेथें राहण्याविषयीं त्यास अतिशय आग्रह केला, आणि **नहीमुलखा** बागेंत एकटीच राहिली होती, तिलाही बोलावणें पाठवून वाड्यांत आणविलें. तेथें **अकबरशहा** चोपाळ्यावर बसला असतांच तिची आणि त्याची ( **अकबराची** आणि **नहीमुलखेची** ) भेट झाली. सुमारें दोन घटका रात्र झाल्यावर **किंगरावतीनें** साईस हातीं धरून वाड्याच्या मधल्या चौकांत नेलें. तेथें चंदनाचा चौरंग, रुप्याचीं उष्णोदकानें भरलेलीं घंगाळें, सुगंधिक तेल व पाच, मरवा, केतकी, हिना, गुलाब, चमेली इत्यादि अत्तरांनीं सोन्याच्या वाट्या भरून ठेविल्या होत्या, तशाच स्वच्छ सफेत कपडे

नेसून दोघी तरुण दासी अंगास लावण्यास व पाणी घालण्यां सउभ्या होत्या. तरतऱ्हेचीं उटणीं व डोकीचे मसाले सिद्ध होते. अशी सर्व नाहाण्याची तयारी पूर्वींच त्या ठिकाणीं केली होती. **अकबरशहास** तेथें नेऊन चंदनी चौरंगावर तिनें बसविलें, आणि प्रथम आपल्या हातांनीं ती अंगास लावूं लागली. अहाहा ? कोणत्या पुरुषास मोह उत्पन्न होणार नाहीं बरें ? स्त्रीपुरुष परस्पर सारख्या प्रतीचीं, तरुण व रूपवान, एकांतांत असून त्या चतुर स्त्रीनें जर असे कामोत्पत्ति करणारे विलास चालविले तर त्या वेळीं कोणता पुरुष मोह पावणार नाहीं बरें ? तेव्हां प्रस्तुत तुम्ही वाचतां आहां, असा अमोल जोडा असून त्या एकांतांत ती **किंगरावती** केवळ अप्सरेतुल्य अशी अंगास लावते आहे, तेव्हां **अकबरशहा**-फकिराच्या मनांत कोणती स्थिति उत्पन्न झाली असेल, त्याची तुम्हीच कल्पना करा.

**किंगरावती** अंगास लावतांना वरचेवर आपल्या नेत्रशस्त्रानें त्यास घायाळ करीत आहे; आणि मधून मधून तिचा पदर एके बाजूस सरके, तेव्हां पदराखालील गृहस्थ फकिरास " तुम्ही आपले पवित्र हस्तांनीं आपला स्पर्श करा, म्हणजे आम्ही फार दिवसांचे आशाभूत गृहस्थ तृप्त होऊं, " अशी संज्ञा करीत होते. तें पाहून तर **अकबराचे** पोटांत कामसमुद्रास अधिकाधिक भरतें येऊं लागलें; परंतु तो मोठा विचारी होता, म्हणून त्यानें तें उघडकीस येऊं दिलें नाहीं. असो. दोन घटका नाहाणें होईपर्यंत आपण का स्वर्गलोकींच का इंद्रभुवनीं आहोंत असें त्यास वाटलें. नाहाणें झाल्यावर एक अति उत्कृष्ट भरजरी पायजमा त्यास नेसवून अंगावर उत्तम व सुवासिक सर्व पोषाक घातला, आणि तऱ्हेतऱ्हेचे जवाहीर **किंगरावतीनं** आपल्या हातांनीं त्याचे अंगावर चढविले, उत्तम तऱ्हेच्या हलक्या पादुका त्याचे पायांत घालून हातीं धरून त्यास महालांत घेऊन गेली.

तेथें जेवणाची तयारी पूर्वींच करून ठेविली होती. रत्नखचित ताट सोन्याच्या आडणीवर ठेविलेलें, त्यांत जिलबी, घिवर, मांडे, पुऱ्या, बासुंदी, दूधपाक, केशरीभात, साखरलाडू , बुंदी, मोतींचूर, दूधपेढे आणि त्याचे जातिधर्मांत खातात असे कांहीं उत्तम मांसाचे पदार्थ असे वाढिले

होते, शिवाय उंची मद्य रत्नखचित पेल्यांतून भरून ठेविलें होतें. अशा तयारीचीं तेथें दोन पात्रें वाढलीं होतीं.

**अकबरानें** त्या महालांत पाय ठेवून चहूं बाजूंस पाहिलें, तों अहाहा! काय तें स्थळ होतें? इंद्रभुवनही त्यापुढें तुच्छ! जेथें शेंकडों हंड्या सुवासिक मेणवत्त्यांनीं जळत होत्या, वरती सर्व छतही कांचेचें असल्या कारणानें चहूंकडे चक्‌चक् चक्‌चक् नेत्रांस भासूं लागलें. महालांतील भिंती सुवर्णपाण्यानें घोटून अगदीं तोंड दिसेशा केल्या होत्या; म्हणून त्याही लखलख लखलख करीत होत्या; कारागिरानें त्या घोंटींव भिंतींवर हुबेहुब चित्रें कोरलीं होतीं. व तीं आतां बोलतील काय असें वाटत होतें. चौफेर दोन दोन खणांचे मोठमोठे स्वच्छ आरसे लाविले होते. यामुळें अष्टदिशांस आरसे महाल किती आहेत याचा सुमारच समजेना. त्या **अकबरशहा** फकिरास तर शेंकडों त्यासारखे **अकबरशहा** प्रत्येक महालांत उभे आहेत काय असें वाटूं लागलें. मोत्यांच्या झालरी चमकत होत्या. मध्यभागीं एक उत्कृष्ट शिशवी वर्तुळाकार टेबलावर चित्रविचित्र मखमली गालिच्या टाकून दिला असून त्याभोंवती किनखापानें मढविलेल्या अशा कांहीं खुर्च्या व कोचें मांडलीं होतीं. अहाहा! नुकत्याच तोडलेल्या पुष्पांचे तुरे ठेविले होते; त्यामुळें सर्व महालांत जाई, जुई, पाच, बकुल, मोतिया, गुलनार, गुलछबू, मोगरा, मालती सदागुलाब, मरवा, दवणा इत्यादि पुष्पांचा सुवास भरून गेला होता, ठिकठिकाणीं पूर्ण दिवस भरलेले उत्तम केवडे व त्यांचीं पत्रें खोंचून ठेविलीं होतीं. शिवाय त्या महालाचे चारी कोंपऱ्यांत चार टेबलांवरून केशरकस्तुरीचे लहान डबे व तऱ्हेतऱ्हेच्या उत्कृष्ट अत्तराच्या कुप्या बुचें काढून ठेविल्या होत्या त्यामुळें तर त्या महालांत जाण्याचा अवकाश, तों एकदम सुवासाचा भपकारा नाकांत शिरे.

**अकबरानें** पुढें जाऊन पाहिलें तों त्या मधील टेबलावर, देशोदेशींचीं वर्तमान पत्रें, कल्पित कादंबऱ्या, नाटकें इत्यादि विषयांचीं मनोरंजक पुस्तकें मांडून ठेविलीं होतीं. असें पाहून लागलीच त्यास आपल्या देशाचें, शहराचें आणि वृद्ध बादशाहाचें स्मरण झालें कीं कदाचित् (**फरहताबाद**) आपल्या शहराचेंहि येथें वर्तमानपत्र आलें असेल, तर तिकडील वर्तमान काय आहे हें समजेल. पहा, आपणांस निघून सुमारें अकरा वर्षें होत आलीं. इतक्या वेळांत **फरहताबाद** शहराची व माझ्या बापाची कांहींच

हकीगत कळली नाहीं. असा विचार करून त्या टेबलावर वर्तमानपत्रें इकडचीं तिकडे आणि तिकडचीं इकडे उचलून ठेवीत आहे. इतक्यांत **फरहताबाद**शहरचें वर्तमानपत्र त्याच्या दृष्टीस पडलें; मग काय विचारावें! त्याला एकदम ब्रह्मानंद झाला, आणि त्याबरोबर मोठ्यानें आनंदाची टाळी वाजवून मोठ्या लगबगीनें **फरहताबाद** या सदराखालील मजकूर वाचूं लागला. त्या वेळेस **किंगरावती** त्याचे मागेंच होती; परंतु ती चतुर असल्यामुळें तिनें त्याच्या आनंदांत अडथळा केला नाहीं. ती मनांत ह्मणते कीं, "सर्व वर्तमानपत्रें सोडून त्यानें **फरहताबाद** शहरचेंच जेव्हां वर्तमानपत्र शोधून काढलें, तेव्हां **फरहताबाद**चा हा गृहस्थ आहे यांत संशय नाहीं. कारण, कोणताही मनुष्य आपला स्वदेश सोडून कोणत्याही परदेशांत जरी गेला, तरी त्याला आपल्या देशाची प्रीति कधीं सुटत नाहीं, व तेथें असतां तो मनुष्य आपल्या देशाची हकीगत कळावी, आपल्या शहराची कमजास्ती बातमी समजावी, याविषयीं फार खटपट करीत असतो, हें उघड आहे. तेव्हां हे फकीर महाराज त्याच शहरचे आहेत यांत संशय नाहीं. आतां मुकाट्यानें येथें उभें राहून हा कोणाचा मजकूर वाचतो, त्यानंतर ह्याच्या मनाची स्थिति कशी होते, हें आपणास समजण्याची आतां चांगली संधि आहे."

असा विचार करून **किंगरावती** तेथेंच उभी राहिली, आणि तिनें मजकूर ऐकला तो येणेंप्रमाणें:—

"**फरहताबाद** शहरीं अलिकडे धान्य वगैरे फार स्वस्त झाल्यानें गरीब लोकांचा चांगला गुजारा होऊं लागला आहे. आसपासच्या ज्या ज्या देशांत महर्गता उसळली आहे, त्या त्या देशांतील गरीब लोक या शहरांत येऊन गुजारा करीत आहेत. येथील सरकारचें फारच ह्मातारपण होऊन ते अगदीं उदास झाले आहेत. कारण, त्यांचा वडील पुत्र जो **अकबरशहा** तो त्यास सोडून आज बारा वर्षें होत आलीं, कोठें गेला आहे कोण जाणे! या पुत्राच्या दुःखानें आमचे खावंद फार शोकग्रस्त आहेत. तथापि, ईश्वरकृपेनें सरकारास आणखी दोन पुत्र झाले आहेत. त्या योगानें अंमळ प्रथम पुत्राचें दुःख कमी झालें आहे **अकबरशहा**च्या शोधास यत्न सुरू आहेत, परंतु अद्यापि पत्ता नाहीं. ईश्वर करो, आणि शोध लवकर लागो."

असें वर्तमान वाचतां वाचतां **अकबरशहाची** कांहीं चमत्कारिकच अवस्था झाली. त्यास घटकेंत आनंद आणि घटकेंत शोक असे दोन्ही विकार एकदम होऊं लागले. आपणास ईश्वरानें बंधु दिले म्हणून त्यास हर्ष होऊं लागला, व हर्ष होत आहे इतक्यांत त्यांच्या ह्मातारपणीं आपण त्यांस शोक दिला व बहिरें केलें, वगैरे स्मरण होऊन दुःख वाटूं लागलें.

असो, असा सुमारें एक तास गेल्यावर **किंगरावतीची** खात्री झाली कीं, हे फकीरबाबा **फरहताबादचे** बादशहाजादे आहेत, यांत संशय नाहीं. परंतु कांहीं दुर्मिळ कार्याकरितां बाहेर पडले असावे.

असो, आपणास उत्तम पुरुष मिळाला यांत संशय नाहीं. कारण पूर्वीं मी याचे स्वरूपास जरी भुललें होतें, तरी याचें फकिरवेषाकडे पाहून किंचित् मनास वाईत वाटे; परंतु आतां संशय फिटला. जसा स्वरूपानें हा उत्कृष्ट आहे तसा अधिकारानेंहि मोठा आहे. कारण, **फरहताबादच्या** बादशहास पुत्र झाले ह्मणून यास आनंद होण्याचें कारण काय ? तेव्हां त्या बादशहाचा हा कोणी खचित जवळील संबंधी असावा. बरें, तो ह्मातारा व पुत्र त्यास सोडून गेला, म्हणून दुःख होण्याचें कारण काय ? तेव्हां हा निःसंशय त्याच्या पोटचा मुलगा असावा. बाहेर गांवची किंवा परक्या मनुष्याची एखाद्या बऱ्या वाईटाची गोष्ट जरकरतां आपण ऐकली, किंवा वर्तमानपत्रीं वाचली, तर आपणास खऱ्या कळवळ्यावांचून इतकें दुःख होणार नाहीं. आणि आतां तर यास जास्ती पश्चात्ताप झाला आहे, यावरून खचित तेथील बादशहाचा हा पुत्र असावा असो. कोणी कां असेना ! आपल्या मनानें उचल केली खरी, मग बादशहाचा पुत्र असो, किंवा एखादा पाणक्या असो; आतां काय त्याचें ? आपण पूर्वींच याचे स्वरूपास आंदण झालों. **किंगरावती** असा विचार करून लागलीच **अकबरशहास** ह्मणाली, " महाराज, फारसे वाचण्यांत नादावलांत ? हीं ताटें वाढून निवून गेलींना ?

असा शब्द होतांच **अकबरानें** मागें पाहिलें, तों **किंगरावती**. मग काय ? जरा हिरमुसल्यासारखा होऊन लागलींच वाढलेल्या ताटाजवळ येऊन बसला. मग **किंगरावतीसह** उभयतांचीं भोजनें फार आनंदानें झालीं.

**किश्वरसिता मेहरबशेला** ह्मणाला, " ते उभयतांच जेवीत बसले असें नाहीं; तर त्यांनीं आपल्या शेजारीं **नहीमुलखेसही** घेतलें होतें

अशा आनंदानें भोजन झाल्यावर अकबरशहाचा हात धरून किंगरावतीनें त्यास शय्यास्थानीं नेलें. तेथचा थाट काय विचारतां ? अहाहा ? केवळ रतीचें मंदीरहि त्यापुढें तुच्छ ! वाः ! अशा तरुण बिनमोल स्त्रीपुरुषांचें वर्णन एखादा नुसतें जरी करील, तर त्याची सुद्धां धन्यता समजली पाहिजे. परंतु उत्कृष्ट स्त्रीपुरुषांच्या जोड्याचें वर्णन करण्यास सामर्थ्य कोणत्या कर्त्याच्या अंगीं आहे ? कोणत्याही नसेल. फार तर काय ? भाषेचेच अंगांत शब्दशक्ति नाहीं. मग वर्णन कराणारानें काय करावें. काय शब्द नवे तर उत्पन्न होत नाहींत ? फार उत्तम स्त्री झाली म्हणजे तिला रति म्हणावें आणि उत्तम पुरुष असला ह्मणजे त्यास मदन ह्मणावें ह्मणजे झाली सीमा ! परंतु परमेश्वरी मूर्तींत अशी एखादी भट्टी उतरते कीं, तिला उपमा देण्यास सवडच नाहीं. असो, शय्यास्थानीं गेल्यावर उभयतां ( किंगरावती आणि अकबरशहा फकीर ) हीं स्त्रीपुरुषें फारच शोभूं लागलीं.

पलंगावर पराच्या गाद्या; त्यावर सुगंधी पुष्पांची शेज; उशाकडे उंची अगरबत्त्या जळत आहेत; मच्छरदाणीस भरगच्ची गोंडे लोंबत आहेत; पलंगाचे मध्यभागीं शांतपणानें चंद्रकांचेची हंडी जळत आहे; तसेंच दोन बाजूंस सुवर्ण चवक्यांवरून चंद्रप्रकाश दिवे लाविले आहेत, कीं जेणेंकरून प्रकाश तर पुष्कळ पडावा; परंतु नेत्रांस इजा होऊं नये. अशा कांचेच्या दिव्यांपासून चहूंकडे थंड प्रकाश पसरला आहे. पलंगाच्या उशाकडे खिडक्यांना वाळ्याचे पडदे सोडून दिले आहेत. अहाहा ! काय तो थाट ! नपुंसकासही कामविकार होईल. मग पुरुषास तर होईलच. अहाहा ! पलंगावर एक मोठ्या वाळ्याचा पंखा अडवा बांधून त्याची दोरी महालाचे दरवाज्यास छिद्र पाडून बाहेर काढून दिली होती, आणि त्या ठिकाणीं चार दासी दोरी ओढण्यास ठेविल्या होत्या. शाबास ! किंगरावतीसारखी चतुर बायको होणार नाहीं. अकबरास तिनें त्या ठिकाणीं नेल्याबरोबर प्रथम उत्तम उंची अत्तरें आपल्या हातानें त्याचे देहास लावलीं. नंतर सुगंधी पुष्पहार गळ्यांत घातले. हातांत गजरे घालून त्रयोदशगुणी सोळा विडे पुढें ठेविले, आणि एक विडा हातांत घेऊन किंगरावती अकबरशहास घ्या म्हणून म्हणत लाजून उभी राहिली आहे. ” मेहरबश सरकार, आतां तुम्हीच सांगा कीं, त्या वेळचा

तो देखावा कसा दिसला असेल ? आणि त्या पुरुषाचें तरी किती भाग्य सांगावें ? अशा महालांत अशी स्त्री मनःपूर्वक अनकूळ होऊन कोमल हातानें विडा देत असतां पुरुष नाहीं म्हणेल काय ? असा मायेचा पुतळा कोण आहे ? आणि असें एकपत्नीव्रत कोण संभाळतो ? किंवा आपल्या वचनास कोणता पुरुष जागेल ? कोणी नाहीं. परंतु धन्य त्या **अकबराची** कीं अशा प्रसंगांत पूर्ण घेरला गेला असून त्यानें तिळभरहि आपलें अंतःकरण जाऊं दिलें नाहीं. त्यानें मनांत विचार केला कीं, एकवार जें **काबुलदरीस** वचन दिलें तें दिलें. पुनः हा देह व दिल दुसऱ्यास देणार नाहीं. ही संपत्ति आणि त्रैलोक्यसुंदरी प्राप्त झाली म्हणून काय वचनास टळूं ? अहाहा ! धन्य **काबुलदरी** ! कीं, जिनें मजकरितां आपल्या प्राणासही खर्चीं घातलें, आणि काय तिचे उपकार ! तिनें त्या प्रसंगीं दया केली नसती, तर आज हा **अकबरशहा** जिवंत असता काय ? प्रसंगास उपयोगीं पडेल तें मनुष्य आपलें, आणि त्यासच तन, मन आणि धन अर्पण करावें, एरवीं " ताज्या घोड्यावरील गोमाशा " पुष्कळ मिळतील, नुस्त्या स्वरूपास भुलणाऱ्या स्त्रिया सहस्त्रावधि मिळतील, परंतु एकापेक्षां दुसरा सुंदर दृष्टीस पडला कीं लागलीच पाहिल्यास सोडचिठ्ठी, किंबहुना तितक्यानेंही पुरी न पडून त्यास यमसदन पाहावें लागतें. बरें, वेळेस कठिण प्रसंग प्राप्त झाला असतां ह्या स्त्रिया प्राणास प्राण दिला तरी देतील काय ? तर तेंही नाहीं, लाखांत एखादी सांपडली तर कोण जाणे. या योग्यतेची एक **काबुलदरी** मात्र होऊन गेली खरी. आतां तशी स्त्री आपणास पुनः मिळणार नाहीं. आणि मिळाली तरी **काबुलदरीच्या** वचनांत गुंतल्यामुळें आपणास तसें कर्तव्य नाहीं. तेव्हां या **किंगरावतीचे** श्रम व्यर्थ जाणार आहेत. बरें, तिनें श्रमी न व्हावें म्हणून स्वच्छ आतांच नाहीं म्हणावें, तर किंगरी हातीं येणें आहे ती न आली तर वृद्ध पित्याचे कर्ण नीट न होऊन मी त्यांच्या दोषांतून मुक्त होणार नाहीं. तेव्हां अशा संकटास काय करावें ? किंगरी हातीं येईपर्यंत **किंगरावतीची** आशा न मोडतां ही जे जे प्रकार करील त्या त्या प्रकारांस आपलें थोडें थोडें अंग दाखविलें पाहिजे. " असा विचार करून **अकबरशाहा** तिला वश असल्याचीं चिन्हें दाखवूं लागला.

वाचकहो, मागें वाचलेल्या शय्यास्थानीं **किंगरावतीनें अकबरास** नेऊन सर्व प्रकारें त्याची वैवाहिक पूजा केली, आणि त्याचा हात धरून त्यास

पलंगावर बसविलें. पूर्वींच तिनें महालाचीं दारें कवाडें वगैरे बंद केलीं. होतीं. मग उभयतांखेरीज तेथें तिसरें कोणी नाहीं असें पाहून **किंगरावतीनें** त्याचे कंठास मिठी घातली.

**किश्वरासिता** ह्मणाला, " कां **मेहरवश** ? पुरुषाची छाती व वचनाची सचोटी कितपत असते पाहिलीना ? असा प्रसंग स्त्रियांवर आल्यास त्यांच्यानें पातिव्रत्य सांभाळवेल काय; नाहीं. पुरुष एकवचनी व एकदिली खरे. असें असतां विनाकारण पुरुष बेमानी म्हणून तुम्हीं हत्त्या केल्या. बरें झालें तें झालें; परंतु अजून तरी सावध व्हा आणि दुर्धर प्रतिज्ञेचा त्याग करून राहिलेलें आयुष्य सुखांत घालवा. "

**किश्वरासिताचें** भाषण ऐकून **मेहरवश** म्हणाली, " महाराज, आपण ह्मणतां त्याप्रमाणें सर्व तजवीज होईल; परंतु गोष्ट तेवढी पुरी सांगा. पुढें काय झालें ? तो **अकबर** तिला वश झाला काय ? नसेल झाला. कारण, तो मोठा दृढमनाचा होता; पण कदाचित् झालाही असेल. उभय तरुणांस एकांत मिळाला तर पातिव्रत्य दोघांतून एकाकडून तरी घसरणारच. सांगा हो सांगा, मग पुढें काय झालें ? "

**मेहरवशे**चा आग्रह पाहून **किश्वरसिता** पुढें सांगूं लागला. तो ह्मणाला, **किंगरावतीनें** गळ्यास मिठी घातली तेव्हां पुढें आपला व्रतभंग होणार असा **अकबरानें** विचार करून ह्मणाला, " **किंगरावती,** पुढील योग होण्याचे पूर्वीं माझें एक तुजजवळ मागणें आहे, आणि तें दिल्यावर मी तुझा हेतु पूर्ण करीन; पण जी जिन्नस मी मागणार, ती पुनः तूं परत घेऊं नयेस आणि घेणार नाहींस असें पूर्वीं वचन दिलें पाहिजे. माझे हातून कितीही आणि कोणतीही चूक किंवा अपराध झाला तरी ती वस्तु परत घेणार नाहीं. याविषयीं वचन दे, आणि ती जिन्नस पूर्वीं माझे स्वाधीन कर. नंतर काय तो दुसरा विचार. "

**किंगरावती** म्हणाली, " फकीर महाराज, काय वस्तु पाहिजे ती बेलाशक मागून घ्या. आणि ती कितीहि किंमतीची असली तरी मी नाहीं म्हणणार नाहीं, दिल्यावर कधीं परत घेणार नाहीं. फार तर काय खावंद, हें सर्व राज्य, शरीर आपल्यास अर्पण केलें आहे, मग वस्तूची शंका कशाला ! जी इच्छा असेल ती मागा, आणि हें घ्या वचन. "

**किंगरावतीचें** वचन मिळाल्यावर **अकबरशहा** म्हणाला, " तुजजवळ

जी किंगरी आहे, ती किंगरी मला बक्षीस दे, आणखी कांहीं नको." असें ऐकल्याबरोबर **किंगरावतीनें** किंगरी काढून स्वाधीन केली, आणि पुनः परत घेणार नाहीं म्हणून वचन दिलें.

किंगरी हातांत पडल्याबरोबर **अकबरशहा किंगरावतीस** म्हणाला—"झालें माझें कार्य ! आणि जातों आतां मी. तूं जें मनांत आणिलें आहेस तें माझे हातून साफ होणें नाहीं. कारण एका स्त्रियेच्या वचनांत मी गुंतलों आहें, तेव्हां तुझे हेतु मजकडून पूर्ण होणार नाहींत. हा मी चाललों पहा."

**अकबराचें** भाषण ऐकून **किंगरावती** खरकन् उतरून गेली, आणि काळी ठिक्कर पडली. सर्वांग रागानें तप्त झालें आणि मनांत म्हणते—"अरेरे ! घात झाला. पुरुषाची जात बेइमानी खरी. पूर्वीं मला सर्व कलमीं वचनीं गुंतवून अखेर दगा दिला. मीं वचन दिलें. तसें या मेल्याचें घेतलें नाहीं, आणि व्यर्थ श्रम केला. मीं कायावाचामनानें लंपट होऊन याचा विश्वास धरला; परंतु यानें वरकांतीं सर्व भाव दाखवून अखेर मान कापली. यापूर्वीं जी मी पुरुषाचें मुख पहात नव्हतें, तेंही व्रत पुरें झालें नाहीं, आणि हेंही सुख मिळालें नाहीं. आतां काय करूं ? पृथ्वीचें मोल किंगरी तीही गमावून बसलें, आणि परत घेणार नाहीं असें वचनही देऊन चुकलें. आतां काय करूं ? यानें फसविलें खरें. मेल्यानें किंगरी उपटण्याकरतांच फकिरी वेष धरला होता काय ? हाय हाय ! सर्वांगांत मदनानें कहर केला ह्याचें शांतवन कसें करूं ? या मेल्यास नाहीं म्हणावयाचें होतें, तर पूर्वीं कां नाहीं म्हटलें ? आतां किंगरी तर परत घेणें नाहीं. परंतु सूड कसा उगवूं ?"

**किश्बरासिता** म्हणाला, "**मेहरबश**" अशी ती विचार करीत असतां तिच्या अंगाची अगदीं लाही होऊन गेली. अगोदर कामानें व्याप्त झालेली, आणि तत्संबंधी हिरमोड झाल्यावर मग काय विचारतां ! असा संताप झाला कीं, सांगतां सोय नाहीं. तिचें अगदीं देहभान जाऊन लाल होऊन गेली. मग काय ? त्या आवेशांत तिनें आपली दिव्य समशेर काढून **अकबराचे** मानेवर ठेविली, आणि आतां फटका मारणार, इतक्यांत मेघगर्जनेसारखी गर्जना होऊन पलंगाखालून त्या क्षणींच एक भव्य पुरुष बाहेर निघाला आणि त्यानें तीच समशेर घेऊन त्याच वेळेस **किंगरावतीचे**

तुकडे तुकडे केले, व **अकबरास** पोटाशीं धरून तो फार प्रेमानें कडकडून भेटला.

एकाएकीं बाहेर येऊन हें मजवरील अरिष्ट चुकविणारा कोण ? म्हणून **अकबरशहा** त्यास न्याहाळूं लागला, परंतु पक्कीशी ओळख पोहोंचेना. तेव्हां त्या मनुष्यानें पायावर डोकें ठेवून आपलें नांवगांव सांगितलें. तेव्हां एकदम **अकबरशहा** म्हणाला, " कोण ? **शादपूरच्या** राजाचा पुत्र तूं **प्रेमकुंवर** काय ? अहाहा ! **प्रेमकुंवरा**, तूं कसारे आलास ? शाबास, तूं उपकार जाणणारा खरा. मीं केलेला उपकार फेडून तूं आपलें ऋण मजवर चढाविलेंस खरें. शाबास ! तुझीच माय तुला व्याली. पण तूं इकडे कसारे आलास ? **अकबराचें** भाषण ऐकून **प्रेमकुंवर** म्हणाला—" महाराज, तुम्हांला आणि **नहीमुलखेला** गांवाबाहेर बसवून **काबुलदरी** आणि मी पंचवीस हजार फौजेसुद्धां संध्याकाळच्या सुमारास त्या **सुवर्णपुरींत** शिरल्यावर मग काय विचारतां ? प्रथम शहरांत पुष्कळ कहर करून नंतर वाड्यांत शिरलों, तेथें **चंदानुरीला** शोधीत असतां **काबुलदरीनें** फारच पराक्रम केला, परंतु पुढें **चंदानुरीनें** कपट करून **काबुलदरीस** धरून मारलें, आणि एके घटकेंत सर्व वाड्याचा व बाहेरचा बंदोबस्त केला हें वर्तमान कदाचित् आपण ऐकलेंही असेल. **अकबरशहा** महाराज, मग जेव्हां आपल्या लोकांस धराधरी झाली, त्या गर्दींत मी तुम्हांस पहिल्या ठिकाणीं पहाण्यास आलों, परंतु तुम्ही तेथें नव्हतां. मग त्या सर्व गर्दींत तुमचा शोध करीत असतां, आपल्या शिपायांपैकींच एक घोडेस्वार भेटला. त्यानें मला ओळखून आपली हकीगत सांगितली. तो म्हणाला, " **प्रेमकुवरजी**, झालेला प्रकार महाराजांस व **नहीमुलखेस** सांगून त्यांना त्या जाग्यावरून पळवून लाविलें; आतां आपणही त्यांचा शोध करून त्यांस जाऊन मिळा, जा. " महाराज, याप्रमाणें शिपायानें सांगितल्यावर मी आपला शोध करीत करीत व सुगावा लावीत लावीत तुमच्या मागोमाग या **मोहनीपुरांत** दाखल झालों. येथें आल्यावर असें समजलें कीं, आपण फकीराच्या वेषानें वाड्यांत प्रवेश केला आहे. मग मीही वाड्यांत प्रवेश करण्याकरितां यत्न करीत असतां प्रथम **नहीमुलखेची** माझी गांठ पडली, आणि तिनें फारच युक्तीनें मला या महालांत आणून सोडलें. येथें. पलंगा-

खालीं लपून बसलों होतों, म्हणूनच हा प्रसंग टळला." **किश्वरसिंवा** म्हणाला, **मेहरवश**, याप्रमाणें **प्रेमकुंवराची** हकीगत ऐकून मग **अकबरानें** आपली सर्व हकीगत **मोहिनीपुरा**पर्यंत झालेली त्यास सांगितली. अशा परस्परांच्या सुखदुःखाच्या गोष्टी होत आहेत तोंच उजाडलें. मग नंगी समशेर हातांत घेऊन **अकबरशहा** व **प्रेमकुंवर** दोघेहि बाहेर पडले, आणि शहरांतील सर्व लोकांस झालेली हकीगत सांगितली. ते म्हणाले, " कसें काय शहरवासी जनहो ? आतां प्रकार तर असा घडला खरा. पुढें युद्ध करणें असेल तर ज्यांची छाती असेल त्यांनीं समोर यावें. नाहींतर सर्वजणांनीं आमच्या या **नहीमुलखेस** राज्याभिषेक करावा. "

**किंगरावती** मरण पावली, आणि हे दोघे शूर मोठे लढवय्ये आणि कोण्या तरी राजाचे पुत्र आहेत असा गांवांतील सभ्यांनीं विचार करून **नहीमुलखेस** गादी देतों असें सर्वांनीं कबूल केलें. नंतर दुसरे दिवशीं तेथील राज्याचा अधिकार **नहीमुलखेस** देऊन अठरा कारखान्यांचा बंदोबस्त या उभयतांनीं उत्तम प्रकारें करून टाकिला.

**मोहिनीपुरास** महिना पंधरा दिवस स्वस्थता करण्यास लागले. आणि सर्व फौजेचें आधिपत्य **प्रेमकुंवरानें** पत्करलें. पुढें थोड्याच दिवसांत सर्व फौज घेऊन **नहीमुलखेसह अकबरशहानें सुवर्णपुरीवर** हल्ला केला, आणि तेथील दुष्ट **चंदानुरीस** ठार मारून तें राज्य **प्रेमकुंवरास** दिलें. इतकें कृत्य आटपल्यावर **अकबरशहा फरहताबादेस** ( आपले घरीं ) सर्व मंडळीसह किंगरी घेऊन दाखल झाला.

मग तेथील आनंदास काय पहावें ? बारा वर्षें पुत्र परागंदा झालेला ईश्वरकृपेनें लाखों फौजेसहित प्राप्त झाला, मग बादशहास किती आनंद झाला असेल बरें ? अहाहा ! बादशहा सर्व सैन्यासह पुत्रास भेटण्यास सामोरा आला. शहरांतील सर्व मानकरी कोणी हत्तीवर, कोणी पालखींत, कोणी घोड्यावर, असे बसून **अकबरशहास** सामोरे आले. चहूंकडे वाद्यें वाजूं लागलीं. घरोघरीं लोक आनंदचिन्हें प्रदर्शित करूं लागले. संध्याकाळचे सुमारास तर शहरांतील सर्व लोक राजवाड्यासमोर जमले. राजवाड्यापासून ते बाहेरील **मोहजादबागेपर्यंत** एकच गर्दी होऊन गेली. खिडक्यांतून पडदे सोडून गरती स्त्रिया पहात बसल्या. कैक

लोकांनीं स्वारी पहाण्याकरतां त्या रस्त्यावर भाड्यानें जागा घेतल्या रस्त्यावरून तऱ्हतऱ्हेचीं दुकानें बसलीं होतीं. ठिकठिकाणीं फकीरलोक सवाल म्हणत होते. फौजदार आणि घोडेस्वार रस्त्यावरून घोडे दवडीत होते. गर्दी फार झाल्यामुळें रस्त्यावरून शेंकडों तंटे व मारामाऱ्या होऊं लागल्या, आणि अशा धांदलींत तिकडून एखादी मानकऱ्याची गाडी आली म्हणजे त्याखालीं कैक माणसें चेंगरूंही लागलीं. राजवाड्यापासून थेट मोहजादबागेपर्यंत एकसारखे दुतर्फा दिवे लाविले होते. याशिवाय सहस्रावधि मशाली पेटविल्या होत्या. डंके, तुताऱ्या, शिंगें यांच्या आवाजांनीं दशदिशा भरून गेल्या होत्या. ठिकठिकाणीं निशाणें व जरीपटके हत्तीवरून व उंटावरून शोभत होते. चहूंकडे मानकऱ्यांचे चोपदार “ निगा रखो मेहेबान, सलाम ” असे पुकार करीत उभे होते. राजवाड्यांत तर नाचरंग चालला आहे. हंडीशीं हंडी आणि झुंबराशीं झुंबरें एकसारखीं लागून राहिलीं आहेत. त्यांतून सुवासिक मेणबत्त्या जळत होत्या. हारतुऱ्यांच्या पांट्या डोकीवर घेऊन माळी लोक धूम इकडून तिकडे पळत आहेत. अशी एकच गडबड होऊन गेली आहे. अशा थाटांत हत्तीच्या अंबारींतून **अकबरशहाची** स्वारी वाजतगाजत मोठ्या डौलानें वाड्यांत गेली. मग सर्व लोकांचे मुजरे झाले. कचेरीचा थाट तर अवर्णनीयच बनून गेला होता. असो, याप्रकारें सर्व शहरांत त्या दिवशीं आनंदीआनंद भरून गेला. नंतर दोन्ही बाजूंस अमिरउमराव आणि मध्यभागीं बादशहा **अकबरास** शेजारीं घेऊन बसला. आणि समोर नाचरंग होत होता; परंतु बादशहास त्यांपैकीं कांहींच ऐकूं येत नाहीं असें पाहून **अकबरानें** नाच बंद करण्यास सांगितला. मग नाच बंद झाल्याबरोबर आपली किंगरी काढून वाजविण्यास आरंभ केला. अहाहा ! काय ती किंगरी ! कीं जिचा स्वर ऐकल्याबरोबर सर्व सभा गार होऊन भुजंगासारखी डोलूं लागली, व बादशहास स्वच्छ रीतीनें ऐकूं येऊं लागलें. याप्रमाणें एक तासभर ती शांत रीतीनें वाजविल्याबरोबर बादशहाचे कर्ण पूर्ववत् उत्तम झाले, आणि अगदीं हळू बोललें तरी साफ ऐकूं येऊं लागलें. मग काय वृद्ध बादशहानें **अकबरास** घट्ट पोटाशीं धरलें आणि त्याच्या नेत्रांवाटें आनंदाश्रु वाहूं लागले.

इकडे **हयातबीस** असें झालें होतें कीं, केव्हां एकदां **अकबरास** कड-

कडून भेटेन. आणि याकरतां ती फार वाट पहात होती, तोंच **अकबरा**-ची स्वारी मातोश्रीच्या महालांत गेली. मग काय तेथील आनंदभेटीचा प्रकार कोणीं वर्णन करावा ? तिच्या स्तनांतून दुग्धधारा सुटल्या, नेत्रांतून प्रेमाचा पूर चालला. मग **अकबरास** पोटाशीं धरून **हायातबी** ह्मणाली, " बेटा, आह्मां अनाथांस शोकाग्नींत टाकून दूरदेशीं कां गेला होतास ? तुजवांचून आम्ही किती दीन झालों बरें ? " हें मातोश्रीचें वचन ऐकून **अकबरानें** उत्तर दिलें, " आई, आईबापांच्या पोटीं येऊन जर त्यांना आपल्याकरतां अनिर्वाच्य दुःख प्राप्त झालें, तर तो पुत्र असून काय उपयोग ? मजकरितां बाबांचे कान जाऊन ते बहिरे झाले, त्यापेक्षां मीच उपजतांच मेलों असतों तर दुनिया ओस पडली असती काय ? " या प्रकारें मायलेंकरांचें बोलणें होऊन त्यांनीं तो दिवस आनंदांत घालविला. दुसरे दिवशीं बादशहानें **अकबरशहास** तक्तावर बसविण्याची तयारी केली; परंतु त्यानें त्या गोष्टीस रुकार दिला नाहीं, आणि आपले धाकटे भावास गादीवर बसवून आपण पूर्ववत् फकिरी वेष धारण करून **काबुल-दरीच्या** थडग्याजवळ राहण्याकरितां निघाला. त्यानें असें करूं नये म्हणून बादशहानें, गांवांतील सभ्य लोकांनीं, **प्रेमकुंवरानें**, आणि **नहीमुलखेनें** होतील तितके यत्न करून त्यास सांगितलें, परंतु त्यानें सर्वांस एकच जबाब दिला कीं, " फक्त वडिलांचे दोषापासून मुक्त होण्या-करतां मी **फरहताबादेस** पुनरपि आलों, नाहींतर आलों नसतों. हल्लीं जरी माझा देह येथें आहे, तरी पंचप्राण **काबुलदरीच्या** थडग्यांत आहेत; याकरितां हा सर्व जन्म आतां तिला अर्पण केला आहे, म्हणून मी तेथें राहणार; आतां संसारसुखाचा अनुभव मला घ्यावयाचा नाहीं. तुम्हां सर्वांस माझी भेट व्हावी असें वाटल्यास त्या ठिकाणीं येत जा म्हणजे झालें. "

असें सांगून **अकबरशहा काबुलदरीच्या** थडग्याजवळ जाऊन तेथें फकीर वेषानें झोंपडी बांधून राहिला, आणि **नहीमुलखा किंगरावतीचें** राज्य करूं लागली, व **प्रेमकुंवर सुवर्णपुरीच्या** राज्याचा बंदोबस्त करून आपण आपल्या **शादापुरास** चालता झाला. इकडे **फरहताबादेस** वृद्ध बादशहानें धाकट्या पुत्रास अधिकार देऊन आपण **हायातबीसह मोह-जाद** बागेंत जाऊन तेथें ईश्वरचिंतन करीत कालक्रमणा करूं लागला.

इतकी गोष्ट सांगून **किश्वरसिता** म्हणाला,—“ **मेहरवश** सरकार, आतां कोणती जात उत्तम, स्त्रीजात कीं पुरुषजात? पहा, **चंदानुरी**चा आणि **सुवर्णनुरी**चा प्रकार तुम्हीं ऐकिलात. विनाकारण दुराग्रह धरून त्या पुरुषांस छळीत होतां, परंतु पुरुष एकदिलाचे खरे. त्या **अकबरानें** एकवार जें **काबुलदरी**स वचन दिलें तें दिलें. पुनरपि तो **किंगरावती**सारखी स्वरूपानें उत्कृष्ट स्त्री व अमोल राज्य मिळत असतांही वश झाला नाहीं. अहाहा! पुरुषांची दया तरी किती! शूरपणा तसाच! प्राणास प्राण देणारे तसेच! एकवार जिला आपली म्हटली, तिजकरतां प्राणही खर्ची घालतील. परोपकार करणारेही तसेच. त्याच **प्रेमकुंवरानें अकबरा**चा उपकार कसा फेडला ऐकला ना? तेव्हां स्त्रियांपेक्षां सहस्त्रावधि उत्तम गुण पुरुषांचे ठिकाणीं जास्त निघतील. स्त्रिया काय कपटी तशाच, विश्वासघाताची तर वस्तीच तेथें, साहसकर्मी तशाच, प्रसंगास उपयोगी पडावयाच्या नाहींत, अविचार तर त्यांचा जन्माचा सोबती; आणि इतकेंही असून एकदिली नव्हेत. एकापेक्षां दुसरा सुंदर पुरुष दृष्टीस पडला कीं झाल्या त्याला वश! अरेरे! सकळ दोषांची खाण काय त्या स्त्रिया. त्यांच्याशीं शहाण्यानें प्रसंग करूं नये, व त्यांच्या वाऱ्यासही उभें राहूं नये. यत्किंचित् त्यांचें दर्शन जरी झालें, तरी देहांतप्रायश्चित्त भोगावें लागतें; तेव्हां सुज्ञ जन स्त्रियांना कधींही न भुलोत, इतकेंच देवाजवळ मागणें मागतों. **मेहरवश**, स्त्रीजात इतकी निंद्य, व पुरुषजात सर्वस्वी वंद्य असें असतांही तुम्ही लग्न करीत नाहीं, आणि सहस्त्रावधि राजपुत्रांस मारून टाकून अजूनही तो क्रम सुरू ठेविला आहे यास काय म्हणावें? आतां आजपर्यंत झालें तें झालें; परंतु अजून तरी ही दुर्धर प्रतिज्ञा सोडून लग्न करा, व इहलोकच्या आणि परलोकच्या सुखास पात्र व्हा कसें.”

**किश्वरसिताचें** हें भाषण ऐकून **मेहरवश** अगदीं लाल झाली, आणि आपली समशेर नग्न करून त्याचे अंगावर धांवून आली; तेव्हां **किश्वर** अगदीं घाबरा होऊन हां, हां, हां, करून म्हणाला—“ सरकार, आतां काय मी चुकलों? पुरुष योग्य असें माझेकडून सिद्ध झालें नाहीं काय? कोणती शंका राहिली ती मला समजून सांगा, आणि नंतर वार करा. मजकडून कोणती चूक झाली ती सांगितल्यावांचून मारणें हें तुम्हां सुज्ञास योग्य नाहीं.”

**किश्वरसिता**चें भाषण ऐकून **मेहरवश** म्हणाली.—" मूर्खा, तूं काय म्हणाला होतास कीं, मी सांगतों या गोष्टींत पुरुष योग्य न ठरवून दिल्यास मग मला मारावें. तर आतां जी गोष्ट सांगितलीस, त्यांत पुरुष दोषमुक्त ठरला काय? मूर्खा, तुझ्याच तोंडावाटें न्याय झाला. त्या **किंगरावतीनें अकबरा**चे मानेवर तरवार ठेविली ती यथायोग्य ठेविली. कारण, तो **अकबरशहा** मोठा दिलदार व दयावंत होता ह्मणून तूं सांगितलेंस, परंतु तो लुच्चा आणि मोठा मतलबी होता. आपला मतलब ह्मणजे किंगरी हातीं येईपर्यंत कशीं गुलामानें वश झाल्याचीं चिन्हें दाखविलीं! तो मोठा एकदिली होता, तर प्रथमच त्या गरीब **किंगरावतीस** आशा दाखवायाची नव्हती. त्या बिचाऱ्या **किंगरावतीनें** प्रथम काय त्याचें वाईट केलें होतें? त्याला तिच्या हेतूप्रमाणें वागावयाचें नव्हतें, तर स्वच्छ नाहीं म्हणावयाचें होतें, पण किती गुलाम लुच्चा, किं प्रथम हिला नकार दाखविला तर कोण जाणे ही किंगरी देते कीं नाहीं. आपमतलबीपणानें असा विचार करून व फकिरी साधुपणाचा वेष धारण करून विनाकारण मतलबानें त्या गरीब **किंगरावतीस** मारलें. अरेरे! पुरुषांची जातच मतलबी. आपलें काम होईपर्यंत तेवढे गोड; परंतु पुढें गळा कापणार. तेव्हां **किश्वरा,** पुरुष असे मतलबी असतात ह्मणूनच मी त्यांस ठार मारतें; आणि त्यांचें तोंडसुद्धां पहात नाहीं. लग्नाचें नांव कशास? मूर्खा, सांग, तुझी गोष्ट फुकट गेली कीं नाहीं? आणि पुरुषजात मतलबी असते कीं नाहीं? चल हो पुढें, मला फटका मारूं दे."

प्रिय वाचकहो, **मेहरवशे**चें भाषण ऐकून व तिचा राग पाहून **किश्वरास** पुनः प्रथम दिवस आठवला आणि ढळढळ नेत्रांतून धारा सुरू झाल्या. काय करावें आणि काय नाहीं हें त्याला कांहींच सुचेना, परंतु तसाच हिय्या करून तो ह्मणाला, " **मेहरवश** सरकार, पुरुष मतलबी असें या गोष्टींत सिद्ध झालें खरें; परंतु ही गोष्ट सांगतांना माझें अगदीं लक्ष्य चुकलें. कृपा करून जर कोप शांत कराल तर दुसरी गोष्ट अशी सांगतों कीं, त्या गोष्टींत पुरुष सर्वथैव दोषमुक्त आहेत अशी तुमची खात्री होईल. परंतु या वेळेस मजवर दया करा." **किश्वरसिता**ची ही विनंती ऐकून **मेहरवश** किंचित् शांत झाली, आणि " सांग तर सांग, कोणती गोष्ट सांगतोस ती. ऐकूं दे एकदांची ती मला," असें ह्मणाली.

आतांचें मरण चुकलें याबद्दल ईश्वराचे आभार मानून **किश्वरसिता** दुसरी गोष्ट सांगण्यास सिद्ध झाला; परंतु तितक्यांत दोन प्रहर रात्रीचा दिल्लीदरवाज्यावर डंका पडला. ह्मणून **मेहरबश** आपल्या महालांत गेली आणि **किश्वरसिता** तेथेंच निद्रिस्त झाला.

सृष्टिक्रमाचे नियमाप्रमाणें प्रातःकाल होतांच चहूंकडे पक्षी किलबिल करूं लागले. महालाच्या खिडकींतून गार वारा येऊं लागला. **किश्वरसिताचे** अंगास गार वायूची झुळूक लागल्याबरोबर तो एकदम दचकून जागृत झाला आणि चहूंकडे बावरल्यासारखा पाहूं लागला. कारण, आमच्या मित्रांनीं मागें वाचिलेंच आहे कीं, पूर्व दिवशीं रात्रीं गोष्ट पुरी झाली, परंतु ती **मेहरबशेला** कबूल न झाल्यावरून तिनें पुनः नरसिंहावतार घेतला होता, ह्मणून **किश्वरसितानें** दुसरी उत्तम गोष्ट सांगण्याचें कबूल केलें, व नानाप्रकारचीं मनोरंजनयुक्त भाषणें केलीं; त्यावरून **मेहरबश** कांहीं सदय होऊन ती " दुसरी योग्य गोष्ट सांग, नाहींतर छाटून तुकडे तुकडे करीन. " असें म्हणाली होती. असो, याच कारणानें **किश्वरसिता** जागृत झाल्याबरोबर बावरल्यासारखा झाला, व त्याला कांहींच सुचेना. तो मनांत म्हणूं लागला कीं, " ईश्वरा, सोड रे सोड. अरे, आजन्मांत जो प्रसंग नाहीं तो भोगणें माझ्या कपाळीं यावें काय? म्हणजे हा **किश्वर** स्त्रियांना भिऊन धास्तींत पडावा काय? हर हर! हजारों शूरांची मजसमोर येण्याची छाती नव्हती त्या मीं **मेहरबशेच्या** धाकानें का दचकून जागें व्हावें? हाय हाय! यापेक्षां मरण बरें. माझा डोळा फिरला कीं, शेंकडों श्रीमान् व कामगार लोक थरथरां कांपत असत, त्या माझ्या काळजानें धडधड करावें काय? तस्मात् परमेश्वरी सत्ता विलक्षण आहे. एके ठिकाणीं आपण असें वाचलें नव्हतें का? कीं, एका बादशहानें एका अवलियास प्रश्न केला कीं, "अवलिया महाराज, पुरषांना मरण कोणतें?" त्यानें जबाब दिला कीं, " स्त्रियांच्या स्वाधीन होणें." तेव्हां पुरुष कसाही रूपवान असो, गुणवान असो, ऐश्वर्यवान असो, परंतु प्रसंग गुदरला कीं, नाइलाज होऊन स्त्रीच्या बसांत जातो, आणि मग तो इहपरत्र सर्व सुखांस मुकून जन्मभर दुःखाधिकारी होतो. हर हर! उंच पर्वतावरून खालीं पडणें कपाळीं आलें तरी हरकत नाहीं, विषप्रयोगानें जीव देणें भाग आलें तरी हरकत नाहीं, सुयांच्या पिंजऱ्यांत वर्षानुवर्ष दुःख काढावें लागलें तरी चिंता नाहीं, फार तर काय, या शरीरास कितीही दुःख

झालें तरी व प्राण गेला तरी हरकत नाहीं; परंतु स्त्रीच्या ताब्यांत राहणें हें पुरुषास मरणाहीपेक्षां मरण. असें हें कर्म भोगणें मला प्राप्त झालें काय ? देवा ! नकोरे नको ! अरे, यापेक्षां पूर्वीचे उन्हातान्हांतील हाल मला पुरवले. परंतु हें सौख्य नको. पूर्वी आठ आठ दिवस उपास पडत होते ते बरे; परंतु येथें राहून हें पक्वान्नांचें ताट नको. तेथें कांटयांत, खडकावर, मातींत निद्रा घेत होतों तें बरें, पण येथील छप्परपलंग नको. अरेरे ! मना, या वरकांती थाटास भुलून मोहपाशांत पडलास काय ? अरे, नव्हेरे नव्हे ! स्त्रीप्रीति, स्त्रीमोह, स्त्रीसौंदर्य, स्त्रीममता हीं सारीं वरकांतीरे वरकांती. असें असतां या थाटास भुललास काय? अरे, अरण्यांत दुष्ट लोक साधूंचीं सोंगें घेऊन बसत असतात; मग त्या वाटेनें भोळे बिचारे पांथस्थ लोक दोन प्रहरच्या वेळीं पाणी पाणी आणि अन्न अन्न करीत येतात. नंतर त्या दुष्टांचा स्वच्छ आश्रम, दारीं तुळशीवृंदावन व तेथें एक निशाण लाविलेलें, तसेंच आंतील मंडळी माळामुद्रा धारण करून एकाग्रतेनें स्नानसंध्या व ईश्वरभजन करीत बसलेली इत्यादि थाट पाहून बिचारे गरीब प्रवासी, 'येथें पाणी मिळेल काय ? ' असा त्यांना प्रश्न करतात. अरेरे ! हा प्रश्न ऐकून ते दांभिक लोक किती मोहजाळ पसरतात ! अहो पांथस्थ भोळे लोक हो, तुम्ही आतां दोन प्रहरच्या वेळीं आमच्या आश्रमीं आलांत, याकरतां भगवंताचा प्रसाद घेतल्याशिवाय पुढें जाऊं नका. " असें म्हणून गार पाणी, स्वच्छ केलेल्या पक्वान्नांचीं ताटें असें त्यांच्यापुढें आणून ठेवितात. मग काय किडबरा, ते बिचारे पांथस्थ त्या थाटास भुलून घोरांत पडतात, व जवळ असेल तें सर्व जाऊन वेळेस प्राणासही मुकतात. तद्वत् या स्त्रियांचीं चरित्रें असतात. प्रथम त्यांच्या स्वरूपास व वरवर गोड भाषणास पुरुष भुलला कीं झालें त्याचें वाटोळें ! असो, तात्पर्य काय कीं, काळ फिरला म्हणजे सारे प्रकार होतात. 'अगोदर बुद्धि जाते आणि मग भांडवल जातें, ' ही म्हण अगदीं पूर्ण अनुभवसिद्ध खरी आहे. असो, आपण या दुष्ट मानभावी स्त्रीच्या स्वाधीन झालों खरे, आतां तळमळ करून काय होणार ? तें सारें असो, पण काल्ची गोष्ट सांगण्यांत तरी आपलें लक्ष्य कसें चुकलें ! तीच गोष्ट जर बिनचुक झाली असती, तर कशी तरी आज आपली यांतून सुटका झाली असती, पण तें होणार कोठून ? आपला कर्मयोग चुकण्याची वेळ कोठें आली आहे अजून ? आज पुनः

कालच्यापेक्षां सुंदर गोष्ट तरी माझ्यानें कशी सांगवेल? माझें चित्त कोठें आहे ठिकाणीं? अरेरे! गोष्ट सांगून हिचें लक्ष्य वळेल, आपण हिच्या तडाक्यांतून सुटूं, आपल्या वृद्धांस दुःखसमुद्रांतून काढूं, आणि पुढें **माहेजहा** प्राप्त करून घेऊं,वगैरे प्रकार आतां होतील असें दिसत नाहीं. तेव्हां व्यर्थ हाल सोशीत दिवस काढावे यांत कोणता लाभ? हिच्या तडाक्यांतून आपण वांचूं हा संभवच नको. मग पुढें हिच्या हातून मरावें त्यापेक्षां आतां आपल्याच हातीं मरून जावें हें काय वाईट?

मित्रहो, याप्रमाणें सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत **किश्वरा**चा तो सर्व दिवस काळजींतच गेला. मग प्रहर रात्रीचे सुमारास **मेहरवशेनें किश्वरास** बोलावण्याकरतां दोन दासी धाडल्या.

त्या वेळीं, **किश्वरसिता** महालाच्या खिडकींत उभा राहून जीव द्यावा, कीं गोष्ट सांगावी या विचारांत निमग्न झाला होता. इतक्यांत सरकारांनीं बोलाविलें आहे असे दासीचे शब्द ऐकून प्रथम थोडा चपापला. परंतु पुढें लागलीच त्यास अवसान येऊन तो म्हणतो, " जीव देण्यास आपण काय मूर्ख आहों? **मेहरवश** म्हणजे बिशाद काय? आजच्या गोष्टीनें तिला पूर्ण वेडी करून पुरुषांविषयीं उत्तम रीतीची तिची खात्री करीन. " असा विचार करून दासीस म्हणाला, " चला, हा पहा निघालों. " असें म्हणून **मेहरवशे**जवळ गेला.

तेथें गेल्यावर नेहमींप्रमाणें **मेहरवशेनें किश्वरसितास** जवळ जागा दिली आणि म्हणाली, " महाराज, आतां आपल्या गोष्टीस आरंभ करा पाहूं. मी आजची एवढी गोष्ट ऐकेन, पुढें याही गोष्टींत जर कालच्याप्रमाणें घसराल, तर मग मात्र भीड ऐकणार नाहीं. "

**मेहरवशेचें** भाषण ऐकून **किश्वरसिता** मनांत म्हणतो, " काय बिशाद आहे आज घसरेन! आजच्या गोष्टींत पुरुषगुणांविषयीं पूर्ण खातरीच करतों. " असें म्हणून गोष्ट सांगूं लागला.

---

# रात्र चौथी.



तो म्हणाला—" पूर्व दिशा प्रफुल्लित झाली म्हणून चहूंकडेस आनंदानें पक्षी किलबिल करूं लागले. इंद्रादिक देवही ज्यांच्या तेजास भितात, असे अरण्यवासी महा तपोधन ऋषि आपापलें स्नानसंध्यादि नित्य कर्म करण्यास प्रवृत्त झाले. कोणी भागीरथीकांठीं, कोणी क्षिप्राकांठीं, कोणी नर्मदाकांठीं, कोणी प्रवराकांठीं आनंदानें ब्रह्मकर्म साधीत आहेत. तसेंच, महान धार्मिक जे यवन, तेही मक्का वगैरे योग्य ठिकाणीं आपल्या धर्माप्रमाणें अरुणोदयीं निमाज पढत आहेत. रात्रभर अमृतस्त्रावानें तृप्त होऊन सर्व वनस्पति आनंदानें टवटवीत दिसत आहेत, व आपल्या अंगांतिल खरा उत्तम गुण, तो जगप्रसिद्ध व्हावा या बुद्धीनें मंद वाहणाऱ्या वायूच्या स्वाधीन करीत आहेत. प्रत्येक बागेंतून व मळ्यांतून वांगीं, कारलीं, मुळे, शेंगा, लिंबें, मिरच्या, ताजी कोथिंबीर, तसेच पेरू, रामफळें, सीताफळें, अंजीर, द्राक्षें, केळीं, पपनस, अननस, जांभळें, साखरलिंबें, चकोत्रीं इत्यादि उत्तम फळांचें सहस्त्रावधि हारे भरून, माळी व बागवान लोक मोठ्या घाईनें शहरांत नेत आहेत.

चहूंकडे कांहीं धुई व कांहीं प्रकाश असें असून समोरचे धुईंत गुंडाळल्याप्रमाणें **रत्नपुर** शहर दिसूं लागलें. घटकेंत नागचांफ्याचा, घटकेंत सोनचांफ्याचा, घटकेंत हिरव्या चांफ्याचा असा सुवास येऊं लागला. क्षिप्रानदीचें पाणी निर्मळ स्वच्छ स्फटिकाप्रमाणें दिसूं लागलें. अहाहा ! काय ती बहार ! दोहीं बाजूंस संगमरवरी बांधीव घाट एकसारखे लागून जाऊन शेंकडों देवालयें सुशोभित दिसूं लागलीं. त्यांत कित्येक देवालयांचे सुवर्ण कळस असल्यानें, व अरुणोदयीं त्यांवर किंचित् प्रकाश पडल्यामुळें, ते कळस चमचम चमका मारीत होते. घाटावरून तर फारच मौज दिसत होती. कित्येक स्नानें करताहेत, कित्येक वस्त्रें धुताहेत; कोणी स्त्रिया कंबरेवर कलश घेऊन शहरांत जात येत आहेत; देवळांवरून व झाडांवरून राघु, मैना, साळुंक्या आनंदानें शब्द करीत आहेत. शहरांतिल राजवाड्यावर व नामांकित देवालयांतून चवघडे सुरू झाले होते आणि त्यांतून ब्याहाग रागिणींचे सूर कर्णास आल्हाद देत आहेत.

अहाहा! अशा वेळीं अशी शोभा पाहून कोणा पुरुषास आनंद होणार नाहीं बरें? असो, मेहरवश सरकार, हा सर्व थाट पाहून एका सुकुमार व सुस्वरूप राजपुत्रास परमावधीचा आनंद झाला! पण लागलाच तो दुःखी व विरही होऊन त्याचे डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. क्षिप्रावतीचे अलीकडील कांठीं तो बसला होता, आणि तेथूनच वर सांगितलेली शोभा त्यानें अवलोकन केली.

मेहरश सरकार, त्या राजपुत्राचें स्वरूप वर्णन करण्यास माझ्या वाणींत शक्ति नाहीं. अहाहा! अशा राजबिंड्यावर असा प्रसंग येणें ही केवढी विधात्याची चूक! शुद्ध केतकीप्रमाणें ज्याची शरीरकांति; प्रफुल्लित कमलाप्रमाणें नेत्र; सरळ नासिका; विस्तीर्ण भाळ व त्यावर केशरी गंध व त्यामध्यें कस्तुरीचा तिलक. मस्तकीं भरजरी मंदील; कानांत पाचेची बिगबाळी; मिश्रु कोठें फुटली आहे कोठें नाहीं. गळ्यांत मोत्यांचा हार, त्यांत पाच, हिरे, रत्नें अशीं जडलेलीं होतीं. पाचमिश्रित मोत्यांची कंठी त्या सुकुमार नाजूक कंठास किती शोभत होती याचें वर्णन करवत नाहीं. अंगांत पातळ जाळीदार दोरब्याचा आंगरखा होता; त्यामुळें आंतील स्वच्छ मैलागिरीची केशरउटी दिसत होती. डावे हातांत एक उत्कृष्ट रत्नखचित सिंहमुखी कडें शोभत होतें, आणि दोहीं हातांत हिरे, पाच, लाल, पुष्कराज यांच्या मुद्रिका शोभत होत्या. अहाहा! काय ते हात! किती त्यांचा नाजूकपणा! ज्याच्या पदरास मोत्यांचे घोस लाविलेले असा भरजरी शेला कंबरेस लपेटला होता. तसाच खालीं उत्तम भरजरी पायजमा पोटऱ्यांपर्यंत वर चढविलेला होता. ते पाय तरी किती सुंदर! त्यांत हलका फूल, आंत गादी असलेला असा जोडा घातला होता. अहाहा! त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें कीं, प्रत्येक माणसास वेगळी वेगळी कल्पना व्हावी. तरुण व चतुर अशा स्त्रीनें जर त्याकडे पाहिलें तर लागलीच तिनें कामानें अगदीं वेडें होऊन जावें. वृद्ध मनुष्यांनीं पाहिलें असतां पुत्रवत् मोह उत्पन्न व्हावा, व शूरांनीं पाहिलें असतां पंचाननासारखा गंभीर दिसावा. मेहरवश सरकार, असा केवळ मदनासारखा सुस्वरूप व सिंहासारखा पराक्रमी असा तो असतांही वर सांगितलेल्या ठिकाणीं फार दुःखांत होता. ह्मणजे त्याचे हात बांधले असून लोखंडी मोठ्या पिंजऱ्यांत अडकाविलें होतें. असा तो राजपुत्र पिंज-

त्यांत अडकलेला असतां, त्यानें रत्नपुरीची शोभा क्षिप्रेच्या अलीकडील तीरानें पाहिली. त्या वेळेस त्याला त्या अपूर्व देखाव्यानें आनंद झाला खरा. परंतु लागलींच आपल्या शहरची, प्रिय मातापितरांची व तरुण प्रियसखीची आठवण होऊन त्याला अतिशय रडें कोसळलें. आणि दीन वदनानें तो धाय धाय रडूं लागला. अरेरे ! ! बिचाऱ्याची समजूत तरी तेथें करतो कोण ! काहीं वेळ रडून रडून तो आपणांशींच म्हणतो, " हाय हाय ! आतां मी यांतून सुटेन काय ? माझे प्रिय वृद्ध बापास व आईस जेव्हां मला धरून नेल्याचें वर्तमान समजलें असेल, तेव्हां त्यांनीं किती शोक केला असेल बरें ! देवा, माझ्या आईस मी एकुलता एक ना ? मी व्हावा म्हणून आईनें किती नवस केले ! किती ब्राह्मणभोजनें, किती तीर्थयात्रा, किती दानधर्म ! हाय हाय ! आतां तिची दशा कशी झाली असेल ! मजकरतां सर्व शहरांत दीन वदनानें शोध करीत आळीआळींतून फिरली असेल. अरे राम ! मजवांचून क्षणभर जिला चैन पडत नव्हतें, आतां ती आज दोन महिने कसे लोटीत असेल " ? ( मनाशींच ) आई, मी काय करूं ? मी दाटून का तुला दुःख दिलें ? अगे, निजलों असतां अवचित दुष्टानें घाला घालून मला बांधून पिंजऱ्यांत घालून या ठिकाणीं आणलें, याला मी काय करूं ! तुला माहीत आहेच कीं जर मी सावध असतों तर माझ्या समोर हजारों धांवून आले तरी दाद दिली नसती; परंतु गैर सावधपणांत कोणीं दुष्टानें हें कृत्य केलें कोणास माहीत ? ह्मटलें असतां जरी मी एवढा पराक्रमी होतों, तरी कोणासही एक दिवस संपत्तीच्या जोरानें किंवा अधिकाराच्या जोरानें दुःखविलें नाहीं व उन्मत्त होऊन कधीं कोणास गर्व दाखविला नाहीं. असें असतां कोण्या पुण्य पुरुषानें आपल्या मायलेकरांची ( तुझी व माझी ) तुटातूट केली. ईश्वर जाणे. असो, ईश्वरचरणीं जर आपली खरी निष्ठा असेल, व आजपर्यंत पुत्रवत् यथान्याय प्रजेचें पालन केलें असेल, आणि माझ्या हातून जर खरी तुमची सेवा व वचनांत राहणें झालें असेल, तर ईश्वर इतक्याही संकटांतून पार पाडून आपली भेट करील. नाहींतर ईश्वराची इच्छा. पण आई, इतकें मात्र तुला शेवटीं सांगणें राहिलें, तें आतां तुला कसें कळेल ? " तूं माझ्या मागें शोक करूं नकोस. कारण, शोक केलास तर लवकर क्षीण होशील, आणि मी कदाचित् वांचलों तर मग तुझी भेट कशी होईल ? हें सांगणें

तसेंच राहिलें. असो. पण आई. तूं शोक करून क्षीण होऊं नकोस, तर धीर धरून माझी वाट पहा. " ( आपल्याशींच ) अरेरे ! हें माझें बोलणें काय उपयोगी ! कारण, आईच्यानें शोक कसा आंवरेल ! अरे नऊ महिने पोटांत वाढविलें ना ? आणि हवें तें पुरवून एवढें मोठें केलें, तेव्हां तिनें आतां शोक आंवरावा ? मजकरतां तिला सर्व ब्रह्मांडभर दुःख आठवून स्तनांत पान्हा भरला असेल.

**किश्वर** ह्मणतो—" **मेहरबश** सरकार याप्रमाणें तो राजपुत्र पिंजऱ्यांत बसून आपणांशींच शोक व विचार करूं लागला. त्याला दुःखाचे उमाळ्यावर उमाळे येऊं लागले, आणि पुनः तो आपणांशींच म्हणतोः—

आई, यदा कदाचित् तुझा शोक आवरला असता, पण एक कारण आहे ना ? त्यामुळें दुप्पट शोक होत असेल. तें कारण हेंच कीं, तुझ्या महालांतूनच थेट माझ्या महालावर दृष्टि जाते, तेव्हां त्यांत मी नाहीं असें पाहून तुझ्या पोटांत धस्स झालें असेल. मग शोकाचें विस्मरण कसें होईल ? आई, माझा महाल, माझे प्रेमानें बाळगलेले राघु, सांळुक्यादि पक्षी, माझी लहान कट्यार, माझा लहान घोडा, माझा रथ, तशींच हरणें, ससे, इत्यादि पाहून तुला शोकाची विस्मृति होईल काय ? नाहींगे नाहीं. आज दोन महिन्यांत तुझें अस्थिचर्म मात्र राहिलें असेल. अरेरे ! ( डोळ्यांत आंसवें येऊन ) आई, माझ्यासारखीं लेंकरें का तुला दहा पांच आहेत ? माझी बसण्याची जागा, तशाच खेळण्याच्या वस्तु, आभ्यासाचा सरंजाम, ( बुकें वगैरे ) पाहून तुला क्षणोक्षणीं दुःखाचे उमाळे येत असतील. आई इतकेंही कदाचित् सहन होईल परंतु माझे मित्र ( प्रधानपुत्र वगैरे ) येऊन तुला विचारीत असतील कीं **सुंदरलाल** कोठें आहे ? ( त्याचें स्वतःचें नांव ) तेव्हां तुझी कशी अवस्था होत असेल ! माझी मूर्ति डोळ्यापुढें उभी राहून हृदय सद्गदित होत असेल. मग अशी तुझी अवस्था पाहून बाबांनीं तरी तुझी समजूत काय करावी ? त्यांस तरी सुख कोठचें ? मजवांचून त्यांचे पंचप्राण नेत्रीं आले असतील. अरेरे ? शास्त्रीबावानें नेहमीं सांगावें कीं, सर्व ' शोकांत पुत्रशोक मोठा कठिण, ' आणि तो लागलाच माझे बाबांच्या अनुभवास आला काय ? अरेरे ! वृद्धपणीं मनुष्यास शोक न व्हावा म्हणून पुत्र हा त्याला अशोकवृक्ष असतो. आणि माझ्या बाबांचा मी अशोकवृक्ष उन्मळून पडलों काय ? "

**किश्वरासिता** म्हणतो—“ **मेहरबश** सरकार, असा तो **सुंदरलाल** राजपुत्र आईबापांचें स्मरण करीत असतां एकदम त्याला आपल्या बायकोचें स्मरण झालें. मग तर काय तो अगदीं वेड्यासारखा झाला, व पुनः आपल्या मनाशींच म्हणतो —अरे, आईला व बाबांला दु:ख किती झालें असेल याचा तर विचारच नको, पण माझे सुंदरीला किती दु:ख झालें असेल! जागृत झाल्यावर मी पलंगावर शेजारीं नाहीं, असें पाहिल्याबरोबर ती घाबरी झाली असेल, अरेरे? मग काय घरांत विचारण्यास तिची छाती झाली नसेल. परंतु दीन वदनानें व लज्जेनें ती आपल्या सासुबाई( माझी आई ) समोर जाऊन उभी राहिली असेल. मग काय तिच्या दु:खाच्या सागरास भरतीच आली असेल. ( उसासा टाकून ) ईश्वरा, काय मीं पाप केलें होतें, म्हणून माझे प्रियसखीची व माझी तुटातूट केलीस? हल्ली पिंजऱ्याच्या व्यथेंत आहें, पण ही कांहींच नाहीं. अशी प्राणसखीची विरहव्यथा मला जाळीत आहे. आतां काय करूं? प्रिये, तुला मी टाकून आल्याबद्दल राग आला असेल, पण कसें करूं, तुला सुखानें का मीं अंतर दिलें? अगे, दिवसांतून तुला पाहिल्यावांचून जर एक क्षण गेला, तर मला युग लोटल्याप्रमाणें वाटत होतें ना? तो मी आज दोन महिने तुला सोडून राहीन कसा, याचा विचार कर. असो, आतां ईश्वरकृपेनें जें होईल तें खरें. पण प्राणसखे, मी येईपर्यंत प्राण टाकूं नको. कारण, तसें केलेंस तर माझी काय अवस्था होईल हें अनुमान तुझ्या लक्ष्यांत सहज येईल. मी जरी या दुर्धर यातनेंत सांपडलों आहें, तरी मला पूर्ण भरंवसा आहे कीं, मी खचीत ईश्वराघरीं निरपराधी आहें; ह्मणून इतक्याही संकटांतून खास पार पडणार. याकरतां प्रियसखे, माझी कांहीं वेळ वाट पाहून मग जीवाचें काय करणें असेल तें कर. मी ह्मणतों या गोष्टी खऱ्या, परंतु सखे, तुझ्यानें विरहाचे दिवस काढवणार नाहींत. घडोघडीं तुला माझें स्मरण होत असेल, आणि इंद्रभुवनातुल्य मंदीर शून्यघराप्रमाणें भासत असेल. अरेरे! शेजेकडे पाहून तर तुझ्या पोटांत ढवळून दु:खाचा उमाळा येत असेल. हाय हाय! सखे, माझा देह पिंजऱ्यांत आहे, परंतु पंचप्राण तुझ्या प्रीतीकडे लागले आहेत. असो, तुला कांहीं कमी नाहीं. माझीं वृद्ध आईबापें तुला अंतर देणार नाहींत. कारण, माझ्या मागें त्यांना काय ती तूंच. पुत्र तूं, मित्र तूं, सून तूं, कन्या तूं, सर्व गणगोत काय तें तूंच. याक-

रितां काळजी करूं नकोस. फक्त मी नाहीं, तर मीही जलदच तुझ्या भेटीला येईन."

क्रिश्बरासिता ह्मणतो—" मेहरबश सरकार, याप्रमाणें तो सुंदरलाल राजपुत्र विरहदुःखांत अगदीं गढून गेला होता. त्याजबरोबरचे रखवालदार शिपाई जे होते, त्यांनीं विचार केला कीं, आज इतके दिवस आपण वाट चालत आहोंत पण असें शहर, अशी आम्राई व असें क्षिप्रेसारखें पाणी कधींच पाहिलें नाहीं. याकरितां आजचा सर्व दिवस मुक्काम येथेंच करावा; ह्मणजे शहरही पाहण्यांत येईल, व येथें उत्तम प्रकारचा बाजार असेल, तेव्हां कांहीं सुंदर जिनसा, कापड वगैरे घेऊन उदयिक पुढें कूच करूं." असें, ह्मणून त्यांनीं उंटावरील बोजा खालीं उतरला.

नंतर कोणी स्वयंपायकाची तजवीज पाहूं लागले, कोणी स्नानाकरितां क्षिप्रेवर गेले, कोणी सरंजाम आणावयास शहरांत गेले, व दोन असामी मात्र पिंजऱ्याभोंवतीं नग्न तरवारीनें पाहरा करीत होते. आठ वाजण्याचा सुमार होता. अशा वेळीं सुंदर, सफेत चंद्रपूरचें पातळ नेसलेली व सफेतच दोरव्याची जरीकांठी चोळी, तसेंच अंगावर सर्व सफेत मोत्यांचेच दागिने व त्यांत कोठें कोठें स्वच्छ हिरे चमका मारीत आहेत अशा प्रकारें लक्षावधि किंमतीच्या अलंकारांसहित व शेंपन्नास बटकींसहित पूजेच्या सरंजमासुद्धां चंपावती क्षिप्रातीरावर येऊन पोहोंचली.

क्षिप्रेपलीकडे जाण्यास तेथून एक सुंदर संगमरवरी दगडांचा छोटासा पूल बांधिला होता. त्या पुलावरून चंपावतीची स्वारी क्षिप्रेश्वराजवळ येऊन ठेपली. अहाहा ! काय त्या चंपावतीचें स्वरूप व भाग्य वर्णन करावें ! असो, तें वर्णन करण्याचा समय पुढें आहे.

चंपावती देवळांत शिरून तिनें यथासांग शिवपूजन केलें, आणि प्रदक्षिणेकरितां देवळाचे पश्चाद्भागीं आली. तों तेथेंच त्या आम्राईत मागें सांगितलेला सुंदरलालाचा पिंजरा व तो सर्व खटला उतरला होता.

चंपावती आणि सुंदरलालाची परस्पर दृष्टादृष्ट होतांच दोघांसही अतिशय मोह उत्पन्न होऊन दोघेंही मूर्छित झालीं. तेव्हां चंपावतीच्या सर्व सख्या घाबऱ्या होऊन त्यांनीं तिला सावध होण्याचे उपाय चालविले. कोणी पदरानें वारा घालूं लागल्या, कोणी रत्नखचित झारींतल्या गार

पाण्याचें सिंचन करूं लागल्या. कोणी थरथरां कांपूं लागल्या, आणि कित्येक शहरांत गेल्या. अशी **चंपावती** मूर्छित झाल्यानें जिकडे तिकडे सर्व गडबडच झाली.

इकडे **सुंदरलालाचीही** पिंजऱ्यांत तीच अवस्था झाली. परंतु त्याला सावध कोण करतो ? असो, सुमारें एका घटकेनें **चंपावती** सावध होऊन हळूच उठून बसली. परंतु चेहरा अगदीं उतरून गेला होता. इकडे **सुंदरलालही** अंमळ सावध होऊन, ती कोण असावी याविषयीं विचार करूं लागला, आणि तिचें अपूर्व स्वरूप न्याहाळून पाहून मनांत कल्पना बांधूं लागला.

तो मनाशींच म्हणतो काय—ही का रंभा आहे ? अहाहा ! स्वरूप पण स्वरूप, याचें नांव स्वरूप. किती सुंदर हा बांधा आणि काय हें तेज ! अहाहा ! मला वाटतें ही ह्या शहराची मालकीण असावी वः ! जसें शहर आहे, व आसपासचा सर्व देखावा अति सुंदर आहे. तशी मुख्य मालकीणही फारच सुंदर आहे. ईश्वरा, हिच्या क्षणभर सुखाकरितां मला वाटतें महान् तपश्चर्या करणारे, व कडकडीत ब्रह्मचर्य चालविणारेही लाळ घोंटतील यांत संशय नाहीं. मला वाटतें कीं, ही स्त्री मृत्युलोकींची खचीत नाहीं. पण स्वर्गीं तरी अशी कोठून आणावी ? ब्रह्मदेवाची स्वरूप करण्याची व मूस ओतण्याची परीक्षा होऊन चुकली आहे, आणि त्यानें आपल्या पूर्ण कसबानें एक दोन मूर्ति ओतल्या आहेत. तेव्हां त्यांच्या कसबाची अगदीं तेथेंच सीमा झाली. म्हणजे—एक रंभा बनविली आहे, आणि अशाच प्रकारच्या **तिलोत्तमा, उर्वशी** वगैरे मूर्ति घडविल्या आहेत, पण त्या कामांत त्याची पूर्ण चतुराई खर्चून गेली. हल्लीं त्याजवळ कांहीं नाहीं. तेव्हां अशी मूर्ति, मला वाटतें कीं, समुद्रमंथनाच्या वेळीं, चवदा रत्नांत निघाली असावी. अहाहा ! पण आपल्याला काय उपयोग ? तूर्त आपण या संकटांत आहोंत. प्रसंग कठिण आहे. यांतून कसे सुटूं, याचा मला विचार पडला आहे. जर मोकळा असतों, तर हिच्या भेटीचा यत्न केल्याशिवाय राहिलोंच नसतों.

**सुंदरलाल** असा विचार करीत आहे, इतक्यांत शहरांतून मेणा आणि शेंपन्नास मुत्सद्यांसह तिच्या बापाची स्वारी येऊन ठेपली.

मग **चंपावती** बरीच हुशार झालेली पाहून तिला बापानें पोटाशीं धरलें

# परशियन् नाईट्स

अथवा

## किश्वरसिता.



पूर्वीं परशिया देशांत अश्वताबाद्नामें मोठी प्रसिद्ध राजधानी होती. हा देश विस्तीर्ण व सुपीक असून यांतील प्रजाही सुखी असे. हें शहर सुरेख रीतीनें वसविलें असून सभोंवतीं मजबूत चिरेबंदी तट असे. तसेच, मोठमोठे दरवाजे चोवीस, व तटाबाहेर आसपास चोहोंकडे दोन दोन मैलपर्यंत गर्द आंबराई व बागबागाईत होती. यामुळें दुरून पाहाणारास मोठी रमणीय शोभा दिसत असे. शहरांत जिकडे तिकडे सुंदर व रुंद अशा बांधीव सडका असून प्रत्येक रस्त्यावर दुतर्फा रांगेनें एकसारखीं तऱ्हतऱ्हेचीं दुकानें लागून गेलीं असत. मनुष्यांची वस्ती जरी पुष्कळ दाट होती, तरी येथील बादशहाची कारकीर्द उत्तम असल्यानें या शहराची वसाहत फार निर्मळ होती. अश्वताबाद शहरीं सावसावकारी व व्यापारधंदा नेहमीं सचोटीनें चालत असे. येथें चोरी, चहाडी, दगाबाजी वगैरे प्रकार फारच कमी होते. कारण, सर्व लोक सुखी; जो तो उदमी व व्यापारी; तसेच, बहुतेक सरकारी व सावकारी [illegible] नोकर असल्या कारणानें सर्व शहरांतील प्रजा आबादीआबाद असे.

अशा या सुंदर शहराचा व मोठ्या सुपीक देशाचा पालन करणारा जो बादशहा, त्याचें नांव ऐकण्यास आमचे वाचक उत्सुक झाले असतील यांत संशय नाहीं. त्याचें नांव अख्तरशहा. हा स्वाभावानें शांत व गंभीर मनाचा, शूर व न्यायी, तसाच धूर्त आणि विलक्षण शहाणा असा होता. अख्तरशहा दिसण्यांतही सुंदर पुरुष असे. यास दोन लग्नाच्या बायका होत्या. त्याही स्वरूपानें त्याच्या संपत्तीस शोभणाऱ्या व आवडत्या अशा होत्या. या बादशहास आसपासचे बहुतेक राजे करभार देत असत. सारांश, पृथ्वींतील एक चतुर्थांश भाग याचे स्वाधीन असून यास

आणि म्हणाला, " बेटा **चंपावती**, तूं अशी कां झालीस? तुला कसें काय वाटतें?" इत्यादि प्रश्न करून मेण्यांत घातली आणि शहरांत घेऊन गेला.

**चंपावती**ला त्वरेनें बापानें शहरांत नेल्यामुळें तिला तो कोण वगैरे विचार करण्यास अवकाश झाला नाहीं. परंतु घरीं गेल्यावर जी तिची अवस्था झाली ती अगदीं सांगतां येत नाहीं. तिनें वडिलांस व आईस सांगितलें कीं, " महालांत तुह्मी व इतर मंडळींची गर्दी होईल तर मला स्वस्थ वाटणार नाहीं. याकरितां तुह्मी सर्व बाहेर जाऊन मजजवळ माझी आवडती **गिरजा** दासी मात्र असूंच द्या, व माझी प्रकृति स्वस्थ होईपर्यंत जर कोणाला मला भेटणें झालें, तर एकेकानें भेटावें." असें ऐकून तिच्या बापानें तिची त्याप्रमाणेंच बरदास्त ठेवली.

नंतर सर्व मंडळी उठून गेली. **चंपावती**चे खोलींत **गिरजे**शिवाय दुसरें कोणी नसल्यामुळें **चंपावती**ला **सुंदरलाला**विषयीं विचार करण्यास अवकाश सांपडला, व ती जों जों त्याविषयीं विचार करूं लागली, तों तों तिला विरहदुःख अधिक अधिक होई.

**चंपावती** मनांत विचार करते कीं, आतां काय करूं! त्या मनोहराची माझी भेट कशी होईल? अहाहा! ती मूर्ति अगदीं डोळ्यांसमोर दिसत आहे. काय तें स्वरूप! आणि अशा सुंदर पठाणास कां पिंजऱ्यांत रहाणें कपाळीं यावें? अरेरे काय दुःख भोगीत आहे! पण असा अन्याय तरी त्याचे हातून काय झाला असावा! त्याचे चेहऱ्यावरून तर तो बिलकूल दुर्व्यसनी दिसत नाहीं, आणि मग पिंजऱ्यांत कां घातला कोण जाणे! मुखाकडे पाहिल्याबरोबर मोहनीच पडली, आणि त्या वेळेपासून माझें देहभान ठिकाणीं नाहीं. काय करूं? (पुनः थोडा विचार करून आपल्याशींच) एकंदरींत त्याच्या स्वरूपावरून, पोषाकावरून आणि नेत्रातील चंचलपणावरून तो खचीत राजपुत्र असावा यांत संशय नाहीं. अहाहा! तन, मन, धन हें तर मीं मनापासून अर्पण केलें, आतां कांहीं होवो; बाबानें जरी मान कापून ठेविली, तरी त्याचा अन्य भ्रताराविषयीं आग्रह खचीत ऐकणार नाहीं. मीं कायावाचामनानें पिंजऱ्यांतील प्रिय सख्यास माळ घातली. आतां असें करावें कीं, आईकडे जाऊन स्वच्छपणें मनांतील हेतु सांगावा, व पिंजऱ्यांतील जांवई पहाण्यास चल म्हणावें. छी! पण ती ऐकेल कशी? एक परीं ती ऐकेल, पण बाबा कसा ऐकेल? अ-

रे रे ! एवढें कठिण दिसलें. आणि आपण तरी भीड सोडून हा मजकूर कसा बोलावा ? हाय हाय ! सर्वांगाची आग झाली, आतां त्या शामसुंदराची भेट कोण करील ? मेल्यांनीं पुर्तेपणीं त्या राजीवाक्षास पाहूंहीं दिलें नाहीं. अरेरे ! तो अझून त्या ठिकाणीं असेल काय ? असला तरी माझें येथून जाणें कसें होतें ? मला कोण जाऊं देईल ? तो कोण, कोणत्या अपराधांत सांपल्यामुळें पिंजऱ्यांत पडला आहे, आला कोणीकडून व जातो कोणकिडे वगैरे मजकूर कसा समजेल ? तर चैन पडत नाहीं. आतां काय करूं ?

**मेहरबश** सरकार, याप्रमाणें त्या **चंपावतीला सुंदरलाल** राजपुत्राचें अगदीं वेड लागलें. नंतर ती आपल्या **गिरजा** दासीस म्हणाली—" अगे **गिरजे**, आतां कसें करूं ? मला वाराबिरा बाई नको घालूं, माझे अंगाची जास्त आग होत चालली. तशीच ही अंगाची उटी धुऊन काढ लवकर. अगे, मोहऱ्या वाटून लाविल्याप्रमाणें आग होते. हे पुष्पहार काढ काढ लवकर. हे का हार समजून सर्प माझे गळ्यांत घातले काय ? सर्वांगास दंश कोण करीत आहेत ? **गिरजे**, हें अंगावर जागजागीं काय घातलें आहेस ? ह्या दागिन्यांनीं माझे अंगास चहूंकडे तिडका लागल्या. काढ काढ लवकर; तशीच ही वेणीबिणीग कशाला आज गुंफलीस ? तुला माहीत नाहीं काय ? कीं, माझे प्राण कांट्यांच्या पिंजऱ्यांत दुःख काढीत आहेत ? सोड लवकर ही वेणी, आणि पाणी आण लवकर; प्राणनाथ दीन वदनानें कारागृहांत असतां मीं मुखांत विडा खाऊन मुख लाल बुंद केलें काय ? चल मला गुळणा करूं दे. अगे पण **गिरजे**, मला वाटत होतें कीं, तुजसारखी शाहणी नाहीं कोणी. पण आतां खातरी झाली कीं, तुजसारखी मूर्ख नाहीं कोणी. अगे, माझा प्रियकर किती दुःखांत दिवस काढतो आहे, हें तूं आज समक्ष पाहिलेंस ना ? असें असतां मला पलंगावर पुष्पशय्येवर निजविलेंस काय ? शाबास ! हीं माझे शय्येवर पुष्पें नाहींत, तर खैराचे निखारे आंथरल्याप्रमाणें माझ्या अंगाची आग होत आहे, मला खालीं उतर उतर लवकर."

याप्रमाणें **चंपावती** विरहानें अगदीं संतप्त होऊन घरांत जाई, बाहेर येई, गच्चीवर जाई, फिरून बाहेर येई, खालीं बसे, पुनः उठून उभी राही, अशी तिची अवस्था झाली.

इकडे चंपावती मेण्यांत बसून गेल्यावर सुंदरलालाचीही तीच अवस्था झाली. पण उपाय काय ? तो बिचारा निरुपाय होऊन मनांतले मनांत पुष्कळ चुरमुरला. शेवटीं रहावेना, तेव्हां आंतले आंत त्यानें पुष्कळ तरफड केली व अतिशय शोक करून मनमुक्त रडला. पण सारें व्यर्थ झालें. कारण, तेथें त्याचें शांतवन करतो कोण ? तळमळ करीतच आंत बसावें लागलें.

असो, सुंदरलालाबरोबर जे रखवालदार लोक होते, त्यांनीं त्या ठिकाणीं यथास्थित आपलीं जेवणें वगैरे करून स्वस्थ झोंपा घेत निजले. सुंदरलालास त्यांनीं नित्याप्रमाणें एक भाकरी वर चटणीचा गोळा ठेवून पिंजऱ्यांत टाकून दिली होती; परंतु त्यानें, तीही त्या दिवशीं खाल्ली नाहीं. त्याचें सर्व लक्ष्य त्या दिवशीं चंपावतीकडे लागलें होतें. असो, स्वार व शिपाई वगैरे लोक संध्याकाळचा दोन घटका दिवस राहीपर्यंत निजले होते. निजून उठल्यावर त्यांचा संवाद झाला तो येणेंप्रमाणेः—

भवानीराव—कसें काय गड्यांनो आमच्या विचाराला असें येतें कीं आजची रात्रसुद्धां या ठिकाणींच काढावी. कारण, असें शहर पुनः पुढें लागणार नाहीं. त्यांतून आपण आज किती दिवसांचे बंदिस्त गडी; आज रात्रीं शहरांत इकडे तिकडे सैलबिईल करूं व जरा दारूपाणी, व्हय नव्ह करूं, आन उंद्यां मंग ह्मोर जाऊं. तुमच्या इच्याराला एतय कीं नाई ?

लिंबाजीराव—हां हां, बरोबर भवानीराव, तुम्ही म्हनता हें अक्शी खर. व्हयनका एक दिवस आधिक. आधिक लागला म्हुन काय झालं ?

याप्रमाणें त्या दिवशीं सर्वांचा राहण्याचा बेत होऊन ते राहिले, व रात्रीं ते आपल्या संकेताप्रमाणें चार चहूंकडे शहरांत गेले, आणि सुंदरलालाजवळ दोन पहारेकरी मात्र होते.

इकडे प्रहररात्रीच्या सुमारास चंपावतीला विरह उत्पन्न होऊन ती अगदीं वेडी झाली. तेव्हां तिची दासी गिरजा तिला म्हणाली, “ बाईसाहेब, आपण भ्रमिष्ट होणार कीं काय ! हें काय असें ? तो प्राणनाथ व्हावा असेल, तर आईसाहेबांकडे जा, आणि हेतु निवेदन करा, ह्मणजे होईल कार्य. उगीच वेडचासारखें कां करावें ? गिरजेचें भाषण ऐकून चंपावती म्हणाली—गिरजे, तूं ह्मणतेस ही गोष्ट खरी, परंतु त्या किल्लीनें तें कुलूप उघडणार नाहीं, उलटें विघ्न मात्र होईल, धडधडीत बिडचा

घातलेला व पिंजऱ्यांत अडकविलेला, अशा चोरास किंवा गुन्हेगारास मला द्या, असें ह्मटल्यानें ते ऐकतील काय ? त्यांतून बाबानें आपल्या बाहिणीस वचन दिलें आहे कीं, " चंपावती, तुझे चंद्रशेखरास देईन, तेव्हां ती भीड मोडून या धडधडीत गुन्हेगाराच्या स्वाधीन मला करतील काय ? ही गोष्ट होणें नाहीं. तेव्हां गिरजे, चल आपण क्षिप्रेवर जाऊं. आणि रामकुंडाजवळ डोह आहे कीं नाहीं त्यांत उडी घालूं, ह्मणजे सुटलों यांतून. पण माझे-बरोबर तूं कशाला उगीच जीव देतेस ! मी आपली एकटीच जातें ह्मणजे झालें.

चंपावतीचें बोलणें ऐकून गिरजा म्हणाली, " बाईसाहेब, जिकडे तुह्मी तिकडे मी. तुह्मीच जीव देणार, मग मला वांचून काय करणें आहे ? याक-रितां चला आपण रामकुंडावर जाऊं." असें म्हणून दोघीही तिकडे जाण्यास निघाल्या. चंपावतीनें आपल्या अंगावरील दागिने सर्व काढून ठेविले, आणि फक्त पांढरें शुभ्र चंदेरी पातळ व दोरव्याची भरजरी चोळी इतक्याच बेतानें गिरजेसहित बाहेर निघाली.

चंद्र बराच वर येऊन चहूंकडेस गार हवा पडली होती. शहरांत अगदीं सामसूम झाली असून शोकी लोक मात्र रस्त्यांतून सहल करीत होते. चांदणें स्वच्छ सफेत पडलें होतें म्हणून विलासी लोक गच्चांवरून व सज्जांवरून बसले होते. कित्येक आपले छपरी पलंग चांदण्यांत मांडून हवेंत निजले होते. क्षिप्रावतीचें पाणी शांत व स्थिर असें वहात होतें. राजवाड्यावर व क्षिप्रेश्वराच्या देवळांत मध्यान्हींचे चवघडे सुरू झाले होते, असो. अशा वेळीं सुंदरलाल राजपुत्र पिंजऱ्यांतून ही चांदण्याची शोभा पाहून व क्षिप्रावतीचे घांट वगैरे देखावे पाहून, तसेच मध्यान्हींचे चवघड्याचे सूर ऐकून फार आनंदी झाला. परंतु लागलाच पुनः त्यास विरह झाला कीं, अहाहा ! देवा, अशा वेळीं, माझी तरुण प्राणसखी कशी व्यथा काढीत असेल ? चंद्रा, तुला तरी लज्जा नाहीं काय ? कारण, माझ्या प्राण-सखीच्या मुखास तुझी उपमा साजते, तेव्हां तूं नुसता चंद्र आणि तो मुख-चंद्र असे सारख्या नांवाचे असतां समदुःखानें कां वागत नाहीं ? पहा, या वेळेस तूं आनंदी आहेस, पण तुझा नांवकरी जो मुखचंद्र तो विरहानें दुःखी असेलना ! हा वेड्या, अशा या कपटरूपी स्नेहानेंच क्षयी झाला आहेस, नाहीं तर स्वच्छ असतात. असो. याप्रमाणें सुंदरलाल कांहीं वि-

रहांत व कांहीं आनंदांत असा असतां, एकदम उत्तम तालसुरांवर सवाल ऐकू आला. परंतु त्याचें मन स्थिर नसल्या कारणानें प्रथम त्याला तो स्पष्ट ऐकूं आला नाहीं. यास्तव त्यानें त्याच धोरणानें त्या दिशेकडे आपले कान लाविले; इतक्यांत पुनः मधुरस्वराचा करुणारसानें युक्त असा सवाल ऐकू आला.

" लाख नही और करोड नही, नही प्रीतनका मोल."

याप्रमाणें त्या मधुर अमृतवेळीं नाजूक कोकिलेतुल्य कंठांतील सवाल **सुंदरलाला**चे श्रवणीं आल्याबरोबर, मग काय तो अगदीं लुटपुट होऊन गेला, आणि मनांत विचार करतो कीं, " अहाहा! कोण्या सुंदरीचा हा मधुर कंठ असावा ? मला वाटतें तिला गीतनृत्याची उत्तम माहिती असावी. अरेरे ! या वेळेस जर माझी आवडती सतार असती, तर मींही थोडी छेडली नसती ? आतां काय करूं ! सर्वस्वीं घात झाला. या बंधांत कसा सांपडलों कोण जाणे. या प्रतिबंधांत नसतों, तर मींही आपल्या उत्तम कंठानें तालसुरावर एकादी लहर फेंकून कोण सवाल म्हणत आहे, तिचा गर्व खालीं केला नसता काय ? " **सुंदरलाल** असा विचार करतो आहे, इतक्यांत पुनः सवाल कानीं आला. परंतु पहिल्यापेक्षां बराच जवळून आलासा वाटला; तेव्हां **सुंदरलाल** पुनः विचार करितो कीं, हें काय ? हें शहर जसें दिसण्यांत शोभिवंत दिसत आहे, तसे यांत गुणी जनही आहेत असें वाटतें. वः! काय चमत्कार हा ! ! सकाळीं एक सुंदर स्त्री आली होती, तिनें तर आपल्या स्वरूपानें व तारुण्यानेंच मला वेडें केलें आणि आतां कोण गावयास आली आहे कोण जाणे ! हिनें तर नुसत्या कंठावरच, व सवालांतील गोड अक्षरांवरच मला राजी केलें. आतां काय करूं ? ती जवळपास उभी राहून जेव्हां सवाल करीत आहे, तेव्हां हा खचीत कोणास तरी लागून प्रश्न आहे यांत संशय नाहीं. आतां असें करावें कीं, प्रश्न कोणास कां असेना, परंतु उत्तर आपण द्यावें ह्मणजे झालें. आतां जरी आपण या बंधांत आहों, तरी मुखावाटें कांहीं म्हणण्यास हरकत आहे, अशी गोष्ट नाहीं. त्यांतून आज हे दुष्ट लोकही चार चोहोंकडेस गेले आहेत आणि कांहीं आहेत, ते सर्व मद्यपानांत निमग्न होऊन झोंपा घेत आहेत. तेव्हां या वेळेस फारसा प्रत्यवाय दिसत नाहीं. याप्रमाणें विचार करतो आहे इतक्यांत आणखी तिसऱ्यानें सवाल आला.--

" लाख नही और करोड नही, नही प्रीतनका मोल."

याप्रमाणें सवाल ऐकतांच **सुंदरलालांनीं** लागलेंच उत्तर दिलें.—

" आख फिरे वहा घाय हुवे यही प्रीतनका मोल."

आपल्या सवालाचें उत्तर पिंजऱ्यांतूनच मिळालें असें पाहून **चंपावतीस** जो आनंद झाला; तो लिहितां पुरवत नाहीं. मग लागलींच तिनें दुसरा सवाल केला.—

" घायाळ घुमे घायमो लोह बरसत है नयन "

सवाल ऐकतांच पुनः **सुंदरलालानें** उत्तर दिलें—

" बर्सी लगी प्रेमकी बिन देखे नही चैन."

उत्तर ऐकतांच **चंपावती**ची अगदीं खातरीच झाली कीं, हा पुरुष असा तसा, मूर्ख माणसांतला व हलकट कर्म करून या शिक्षेंत सांपडलेला नव्हे; तर हा खचीत कोणी तरी राजकुलांतील धूर्त आणि चतुर असा आहे. परंतु कांहीं कपटरूपानें यांत सांपडला असावा. असो, आतां पुढें इलाज काय करावा ?

**चंपावती** व **गिरजा** अशा विचारांत पडल्या आहेत, तो **सुंदरलाला**चे पिंजऱ्यासभोंवती एकच शिपाई सावधगिरीनें पहारा करीत होता. त्यानें या दोघींस पाहून हातानें इशारा केला. वरकड सर्व पहारेकरी व अंमलदार सुराबाईच्या स्वाधीन झाल्यानें बेशुद्ध होऊन नागवेउघडे लोळत होते. असो. शिपायाचा इशारा यांना पुरतेपणीं समजला नाहीं म्हणून ह्या तेथेंच कांहीं विचारांत घोटघोटाळून उभ्या राहिल्या होत्या.

आपला इशारा त्यांना समजला नाहीं, व या वेळेस सर्व बेशुद्ध आहेत, असें पाहून तो शिपाईच **चंपावती**जवळ येता झाला.

शिपाई जवळ येतो आहे, असें पाहून या दोघीही फारच घाबरल्या आणि तेथून पळावें असा विचार केला, पण त्यांचा पायच उचलेना. अंगाचा थरकांप झाला, व भीत भीत हळू हळू मागें पाय काढूं लागल्या. **सज्जनसिंगानें** ( त्या शिपायाचें नांव ) असा विचार केला कीं, आपल्यास पाहून त्यांनीं पळ काढला आहे, तेव्हां हांक मारून त्यांस आश्वासन द्यावें हेंच योग्य. असा विचार करून तो म्हणाला, " अहा बायांनो, अहो बायांनो, कृपा करून क्षणभर उभ्या रहा. आणि या गरीब मनुष्याचा कांहीं मजकूर

ऐकून घ्या. तुमच्या चेहऱ्यावरून तुम्ही खचीत येथील सत्ताधीश असाव्यात असें मला वाटतें. तेव्हां कृपा करून दम धरा हो, दम धरा. माझा आणि माझ्या यजमानाचा जर दुःखवृत्तांत ऐकाल तर खचीत तुम्हांला आम्हांविषयीं दया येईल. मी हें बोलणें लबाडीनें बोलत असलों तर परमेश्वर साक्ष आहे. तो मला जन्मभर अन्न देणार नाहीं. आतां कदाचित् दुसरी शंका तुम्हांला असेल कीं, गोड बोलून धरण्याचा विचार आहे कीं काय कोण जाणे ! पण नाहीं हो नाहीं, तसें कांहीं नाहीं. मीच तुम्हांजवळ विनंति करतों कीं, आम्हांला यांतून सोडवा. तेव्हां मग मीच तुम्हांस काय म्हणून धरीन ? याकरितां बायांनो, कृपा करून क्षणभर थांबा."

**सज्जनसिंगाचें** भाषण ऐकून **चंपावती**चा व **गिरजे**चा संशय जाऊन उलटी दया आली, आणि त्या दोघीजणी, **सज्जनसिंग** जवळ येईपर्यंत तेथें थांबल्या. नंतर **सज्जनसिंग** जवळ आला आणि प्रथमतः दोघींच्याही चरणीं मस्तक ठेवून हात जोडून समोर उभा राहिला; त्या वेळीं **सज्जनसिंगाचे** नेत्रांवाटें अश्रुही फारच गळाले. तेव्हां हा सर्व प्रकार पाहून **चंपावतीनें** त्यास प्रश्न केला कीं तूं कोण, आम्हांस येथें थांबवून धांवत कां आलास व सद्गदित होऊन तुझा कंठ कां भरून आला ? वगैरे सर्व तुझा काय दुःखरूपी मजकूर असेल तो सांग. मग तुझें दुःख आमच्यानें कमी होण्यासारखें असल्यास करूं.

**चंपावतीचें** भाषण ऐकून **सज्जनसिंग** म्हणाला, बाईसाहेब, माझें वृत्त मीं सांगण्यापूर्वीं जर कृपा करून तुम्ही आपलें वृत्त सांगाल, तर फार मेहेरबानी होईल, आणि त्यानंतर मला दुसरें आणखी कांहीं सांगावयाचें आहे, तेंही सांगण्यास ठीक पडेल. हें ऐकून **चंपावती** म्हणाली—अरे भल्या मनुष्या, मी कोण हें समजण्याची तुझी इतकी जर उत्कंठा आहे, तर सांगतें आतां ऐक. तूं ज्या जमिनीवर उभा राहिला आहेस ती सर्व जमीन व या आसपास सहाशें कोशपर्यंत जी जमीन वगैरे आहे, या सर्वांचा मालक माझा बाप **चंपकराज** राजा ( तिच्या बापाचें नांव ) आहे. हें समोर क्षिप्रेकांठीं जें शहर दिसत आहे तें माझ्या बापाचें राजधानीचें मुख्य शहर आहे. याचें नांव **रत्नपूर**. हत्ती, घोडे, पालख्या, म्याने वगैरे संपत्ति किती आहे याचा अंतच नाहीं. इतकें सर्व असून त्यांना पोटीं कांहींच नव्हतें, आणि नेहमीं नवस व दानधर्म करितां करितां वृद्धदशा प्राप्त होत आली तरी संततीस ठिकाण नाहीं. शेवट त्यांची अगदीं निराशा

झाली होती, परंतु ईश्वरकृपेनें मी त्यांच्या शुद्ध उदरीं जन्मलें. आतां मजवर किती ममता असेल हें सांगणेंच नको. मी कांहीं मोठी झालें तेव्हां माझे गुण व सौंदर्य पाहून त्यांना अगदीं अतोनात सुख व्हावें. पण एके दिवशीं मी आणि माझ्या आतेचा मुलगा एके ठिकाणीं खेळत असतां, त्या वेळीं माझ्या प्रारब्धानें आपली तार तोडली, आणि पुढें होणाऱ्या सर्व सुखाचा कळस केला; काय सांगावें ? ( किंचित् थांबून ) तसें झालें नसतें तर आज काय असला मोहरा जाऊं दिला असता काय ? अरेरे ! ! आतां काय करूं ? अरे भल्या मनुष्या, याप्रमाणें मी कोण हें सर्व तुला निवेदन केलें. आतां तूं कोण, हें लष्कर कोणाचें, पिंजऱ्यांत कोण कैदी घातला आहे, व इतका कडक अपराध त्यानें पिंजऱ्यांत घालण्यासारखा तरी कोणता केला आहे, वगैरे सर्व मजकूर सांगून माझे कर्ण तृप्त कर.

चंपावतीचें बोलणें ऐकून सज्जनसिंग म्हणाला, मी आपली हकीगत तर सांगतोंच, परंतु मग तुम्हीं सांगतां सांगतां मुख्य प्रकार गाळलात यांत संशय नाहीं. कारण, तुमच्या आतेचा मुलगा आणि तुम्ही खेळत असतां पुढें काय झालें हें अगदींच चोरलेंत, व पुढें येथें येण्याचें कारणही चोरून सांगितलें नाहीं. तेव्हां असें करूं नका; जें कांहीं असेल तें या दासास समजावें अशी इच्छा आहे. मग इतःपर मर्जी आपली; परंतु सांगितल्यास मी कांहीं तरी आपल्या उपयोगीं पडेन. याप्रमाणें सज्जनसिंगाचें बोलणें झाल्यावर चंपावती म्हणाली, आतेचा मुलगा आणि मी खेळत असतां, माझ्या बापाच्या मुखावाटें असें निघालें कीं, त्या योगानें माझ्या सर्व तारुण्याचा तसाच सौंदर्याचा लागलीच ऱ्हास होऊन मीं आपल्या प्राणाची आस सोडली. त्या वेळीं मी लहान असल्याकारणानें मला कांहीं समजत नव्हतें, परंतु पुढें समजूं लागल्यावर मला चैन पडेनासें झालें. मी आपल्या मनांत म्हणें कीं, "सर्व पंचपक्वान्नांचा पाक सिद्ध झाला आहे परंतु मुखांत पडत नाहीं. कारण, त्यांत सर्पानें येऊन पूर्वींच गरळ घातलें आहे." भरजरी शालू बनवून संपूर्ण तयार झाला आहे, परंतु नेसण्यास उपयोगी नाहीं. कारण उंदरानें अगोदरच येऊन छिद्र पाडून ठेविलें आहे. सुवर्णाचा दागिना, सुंदर झाला आहे, परंतु अंगावर घालण्यांत अर्थ नाहीं. कारण त्यांतील अस्सल सोनें मुळींच सोनारानें काढून घेतलें

आहे." **सज्जनसिंगा**, माझ्या देहाकडे व तारुण्याकडे पाहून मला असें वाटावें ? हरहर ! खरेंच, नाहीं का तर ? हें माझें कपाळ एवढें मोठें असून करंटें निघालें. हे डोळे कमळाप्रमाणें असून आंत फुलें पडण्याची वेळ आली, नाक सरळ उंच असून मला नाकीं जा म्हणतें. कां कीं ह्याचा भोक्ता नाहीं म्हणून. मुख चंद्राप्रमाणें तेज:पुंज असून तें राहूच्या तडाक्यांत सांपडेन म्हणतें. अरेरे ! एक जर गोष्ट मनायोग्य नाहीं तर हें संपूर्ण मौल्य वाण होऊं पहात आहे. आतां काय करूं ? नाजूक हातानें साजूक पक्कान्नें का त्या मेल्या घमंड्यास वाढूं ? काय, असें करणें म्हणजे गर्दभापुढें गायन किंवा षंढापुढें पद्मिनी नव्हे का ? अगर धनगरास अत्तरांत माखल्याप्रमाणें नव्हे का ? त्या मेल्याला अत्तराची परीक्षा काय माहीत ? हा हिना, या अत्तरांत धुंदी नेहमीं असते; हा गुलाब, यांत उदासपणा असतो; हा पाच, यांत उग्रता असून इमानी नव्हे; इत्यादि प्रकार तो धनगर सांगेल काय ? नाहीं. तो आपला ह्मणणार, एकून अत्तरें उत्तम खरीं, पण जरा कसर आहे; तेवढी नसती तर कढईच्या तेलाच्या तोंडांत मारली असती. असो, त्याप्रमाणें माझा आतेचा मुलगा जो आहे तो कुरूप आणि त्यांत अवगुणी; असा मूर्खांतला मूर्ख आहे. असें असतां मी आणि तो जेव्हां एके ठिकाणीं खेळत होतों तेव्हां माझ्या बाबांनीं अशी वाणी काढली कीं, " माझी **चंपावती** या **चंद्रशेखरा**च्या तरी पायगुणानें वांचो. देवा ! वांचली जगली तर मी इचें लग्न याच्याशींच लावीन." असे शब्द आमचे बाबा चारचौघांसमक्ष बोलले. तेव्हां तें आतां मला नडणार आहे. मला तर तो दृष्टीसमोरही आवडत नाहीं, आणि बाबांचा तर त्यास देण्याचा संकल्पच झाला आहे. मजकरितां पुष्कळ श्रीमान् व रूपवान् राजपुत्र चालून येऊन अजूनही आर्जव करीत आहेत; परंतु बाबांचा निश्चय ढळत नाहीं. तेव्हां आतां तूंच सांग कीं, हा देह मी आतां कशास ठेवूं आणि कसा ठेववेल ? माझें सर्व सौंदर्य वायां गेलें कीं नाहीं ? आज सकाळीं देवास ह्मणजे जवळील क्षिप्रेश्वरास आलें तों तुह्मीं चालविलेली पिंजऱ्यांतील मूर्ति अवलोकन केली. काय सांगूं ? तेव्हांपासून जी माझी वृत्ति झाली ती सांगतां सोय नाहीं. मीं लागलींच मनाचा निश्चय केला कीं, लग्न करीन तर याच मनमोहनाबरोबर करीन; नाहीं तर करणार नाहीं. असो, हा विचार घरीं जाऊन केला, परंतु बाबांच्या हातून हा नवरा आप-

णास खास मिळणार नाहीं असा निश्चय पाहून, व मला अगदीं मदनानें कासावीस केलें ह्मणून प्राण देण्याचा मीं निश्चय केला आणि, ताबडतोब या माझ्या **गिरजेस** बरोबर घेऊन रामकुंडावर डोहाच्या कांठीं गेलें. तेथें उडी टाकावी तों इतक्यांत कांहीं विचार मला सुचला, आणि अंतकाळीं पिंजऱ्यांतील शामसुंदराची मूर्ति एकदां तरी डोळ्यांनीं पहावी ह्मणून रामकुंडावरून परभाऱ्या आह्मी दोघीही इकडे आलों. आतां येथें येऊन सवाल ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, ज्याकरितां आह्मी जीव देणार तो मनुष्य तरी शहाणा आहे कीं नाहीं कोण जाणे? नाहीं तर वरून रूपानें सुंदर दिसतो आहे, परंतु मर्मज्ञ असल्यास सर्व उपयोग; नाहीं तर काय? सकाळीं दृष्टिभेट झाली तेव्हां माझ्याप्रमाणें तो घायाळ झाला किंवा नाहीं, हें पहाण्याकरितां मी सवाल बोललें आणि याच कारणाकरितां जीव देतां देतां परत आलें. माझ्या मनांतील हेतु हाच कीं, आपण ज्याकरतां प्राण देणार, तो मनुष्य निदान समंजस तरी पाहिजे; नाहीं तर मूर्खाकरतां व्यर्थ अमोल प्राण कां घालवावा! आतां हा मनुष्य तर चांगला शहाणा आहे याविषयीं माझी खातरी झाली. परंतु हा भ्रतार मिळावयाचा नाहीं यास्तव हा देह मी आतां गंगार्पण करितें, आणि त्याकरितांच परतून पुनः रामकुंडावर चाललें होतें, तों तूं हांक मारून उभें केलेंस. असो, मी जीव तर देणारच. पिंजऱ्यांतील मनुष्याच्या अकलेविषयीं जशी माझी खातरी झाली तशी तो कोण व पिंजऱ्यांत कां नेतां, ही शंका तेवढी दूर कर, ह्मणजे प्राण सुखरूप रीतीनें जातील. दादारे, तूं आपली आतां हकीकत सांग.

**चंपावतीचें** भाषण ऐकून **सज्जनसिंग** फार आनंदी झाला. आणि ह्मणाला, “ बाईसाहेब, आतां ऐका. मी कोण व पिंजऱ्यांतील मनुष्य कोण हें सांगतों. लोकांस ठकवून, चोरी करून, विश्वासघात करून अगर खून वगैरे करून तो मनुष्य पिंजऱ्यांत पडला नाहीं. तर फक्त प्रीतीमुळें पिंजऱ्यांत सांपडला आहे. बाईसाहेब, याकरितां स्त्रियांशीं खरी प्रीति करूं नये. खरी प्रीति केली कीं, प्राणास धोका पोंचतो. प्रथमतः त्या आपली प्रीति पुरुषांना विश्वासूपणानें दाखवितात, आणि नंतर कपटानें आपले इच्छित हेतु पूर्ण करून घेऊन त्यास फशीं पाडतात. स्त्रियांचें स्वरूप व गोड गोड बोलगें इत्यादि प्रकारांस पुरुष भुलून त्यांच्यांशीं खरी प्रीति करतात,

आणि नंतर असे धोक्यांत पडतात. कारण, पुरुष जसे मोकळ्या अंतःकरणानें खऱ्या प्रीतींत पडतात तशा स्त्रिया पडत नाहींत. अरेरे ! स्त्रियांचे दुष्ट गुण तोंडानें किती उच्चारावे ! सोन्यासारखा पति असला तरी, यःकश्चित् कुरूप जाराशीं त्या रममाण असतात. फार तर काय सांगूं ? भर्ता रूपवान्, तसाच गुणवान्, ऐश्वर्यवान्, मताप्रमाणें चालणारा, चार लोकांत सूर्यासारखी ज्याची कीर्ति, असा जरी आहे, तरी तिची प्रीति जारावर असते. असो. याप्रमाणें स्त्रियांचे सहस्त्रावधि दोष असतात ते कोठवर वर्णन करावे ! मूळ जन्मापासून स्त्रियांशीं प्रसंगच आणूं नये हें उत्तम. आणि ज्याला खरोखरी अनुभव आला तो तर कधींच पुनः त्यांच्यांशीं प्रसंग आणणार नाहीं. तुमचें ह्मणणें आहे कीं, पिंजऱ्यांतील पुरुष भर्ता मिळावा, परंतु तो पुनश्च स्त्रियांशीं प्रीति ह्मणून कधींच करणार नाहीं अशी माझी खातरी आहे. कारण, हल्लीं त्याच योगानें तो अनिर्वाच्य दुःख भोगीत आहे." **सज्जनसिंगा**चें बोलणें ऐकून **चंपावती** ह्मणाली, "**सज्जनसिंगा**, असें तुटक तुटक काय सांगतोस. सर्व वृत्तांत आरंभापासून सांग. कोणत्या स्त्रीच्या प्रीतीनें तो पिंजऱ्यांत पडला, त्याचें कारण काय झालें ? वगैरे मला समजूं तर दे." **सज्जनसिंग** ह्मणाला—"बाईसाहेब, कोणत्या स्त्रीच्या ह्मणून काय विचारतां ? प्रत्यक्ष लग्नाच्याच स्त्रीचे इतके खेळ. आतां पूर्वीपासून सांगतों श्रवण करा. येथून नैर्ऋत्य दिशेस पांचशें मैलांवर **कांचनपूर** ह्मणून शहर आहे. तेथें **कांचनवर** नांवाचा राजा राज्य करीत आहे. त्याला एकुलता एक मुलगा **सुंदरलाल** नांवाचा असून घरीं सर्व संपत्ति अगणित आहे. सर्व बडीवार आतां सांगत नाहीं. **कांचनवर** राजानें **सुंदरलाल** पुत्राचें मोठ्या समारंभानें लग्न केलें, आणि अति सुंदर अशी बायको **सुंदरलालास** केली. तिचें नांव **चंद्रावती. चंद्रावती**ची आणि **सुंदरलाला**ची अतिशय पुढें प्रीति जमली. ती अशी कीं, **चंद्रावतीस** पाहिल्यावांचून **सुंदरलालास** क्षण जातां उपयोग नाहीं. रात्रंदिवस महालाच्या बाहेर त्याच्यानें पाय ठेववत नसे; तो आपल्या राणीस जिवापलीकडे संभाळीत असे. त्याला तिच्या नादानें दुसरें कांहींच सुचेना. त्याचे अगदीं लहानपणचे जिवलग मित्र त्याला भेटण्यास जरी आले, तरी त्यानें भेटीस वेळ नाहीं असा निरोप धाडावा. नेहमीं तो **चंद्रावती**च्या गळ्याशीं गळा लावून बसलेला असे.

**सुंदरलाला**चे शहाणपणाचे कीर्तीवरून व त्याचे वर्णनीय स्वरूपाचे आफवेवरून हजारों लोक बाहेर गांवांहून त्याचे भेटीस येत. परंतु त्याची गांठ कोठें पडे ? मग एखादा कोणी प्रसिद्ध मनुष्य आला असल्यास **कांचनवर** राजानें बुद्धच्या सभा करून **सुंदरला-लास** बळेंच बोलावूं पाठवावें. बापाचें बोलावणें आलें म्हणजे मग मात्र त्याचा निरुपाय होई, आणि त्याला आपल्या प्रियसखीस सोडून कचेरींत येणें भाग पडे. परंतु जरी कचेरींत गेला, तरी त्याचें लक्ष्य सर्व **चंद्रावती**कडे लागत असे. तो इतका शहाणा असतांही कोणीं कांहीं विचारल्यास त्यानें भलतेंच वेड्यासारखें उत्तर द्यावें. त्याला त्या सभेंतही चहूंकडे **चंद्रावती** दिसावी. शिवाय जेवणांत **चंद्रावती**, लिहिण्यांत **चंद्रावती**, सर्व काम-काजांत **चंद्रावती**चें रूपडें दिसावें. बाईसाहेब, याप्रमाणें **सुंदरलाल** राजपुत्र अगदीं पूर्ण स्त्रैण बनला, आणि **चंद्रावती**च्या ह्मणण्याप्रमाणें पूर्ण वागूं लागला. तिनें ह्मटलें कीं, अमक्यास फांशीं दिलें पाहिजे; कीं **सुंदरलालानें** लागलींच त्याला फांशीं द्यावा; आणि तिनें अमक्यास दिवाणाचीं वस्त्रें द्या ह्मटलें, कीं लागलींच तो झाला दिवाण ! **चंद्रावती** करील ती पूर्वदिशा झाली. **कांचनवर** राजाचा वृद्धापकाळ झाल्यामुळें त्याच्यानें तो राज्याचा गाडा चांगला नीट रीतीनें हांकला जात नसे. तेव्हां अर्थातच सर्व कारभार **सुंदरलाला**चे हातीं आला. परंतु **सुंदरलाल** **चंद्रावती**च्या स्वाधीन असल्यामुळें **चंद्रावती**चें प्राबल्य विशेष झालें. कधीं कधीं हे बोभाटे **सुंदरलाला**चे बापापर्यंत जात; परंतु तो वृद्धपणीं पुत्रमोहानें अगदीं घेरला होता. यामुळें बहुतेक अंधार झाला. असें झालें तरी प्रजेला बरोबर न्याय मिळत असे, व कधीं प्रजेवर जुलूम म्हणून झाला नाहीं. फक्त **चंद्रावती**चें प्राबल्य विशेष झाल्यानें द्रव्याचा व्यय होऊं लागला, आणि कामगार लोकांच्या नेहमीं बदल्या होऊं लागल्या; एवढाच काय तो फेर. **सुंदरलालही** वृद्ध मातापितरांची आज्ञा कधीं उल्लंघन करीत नसे. फक्त **चंद्रावती**वर प्रीति अतिशय असल्यानें तिच्या कह्यांत तो गेला होता. असो; याप्रमाणें **सुंदरलाल** तिजवर अ-गदीं फिदा असतांही, व तो रूपानें मदनाप्रमाणें असतांही, ती **चंद्रावती** **महान् दुष्ट जारकर्मी असे. तो चमत्कार काय सांगूं ! लागलींच अंगावर शाहरे येतात. बाईसाहेब, जो पिंजऱ्यांत अडकला आहे तोच हा**

**सुंदरलाल** आणि हें कृत्यही त्याच जारिणीचें. काय सांगावें ! हा **सुंदरलाल** इतका शहाणा कीं, कैक बाहेरगांवचे वकील येऊन त्यास राज्यप्रकरणीं मसलत विचारून जात होते. असें असतां स्त्रियांच्या कपटानें ह्याचा शहाणपणा व्यर्थ गेला. अरेरे ! स्वरूप पाहिलेंना तुह्मीं ? हा असा सुकुमार, चतुर आणि विलासी असतांही " कुपात्रे रमते नारी " ही ह्मण अगदीं खरी झाली. ती दुष्ट **चंद्रावती** एका कुरूप मनुष्याबरोबर आपक होऊन बेलाशक निंद्य कर्म करीत असे, आणि त्याच्याच प्रीतमुळें तिनें **सुंदरलालास** पिंजऱ्यांत घातला आहे.

इतकी गोष्ट ऐकून **चंपावती** ह्मणाली, " अरेरे ! एकूण दुष्ट बायकोनें कां याची दशा केली ? तर मग हा पुनश्च कोणत्याच स्त्रीवर विश्वास कशाला ठेवितो आहे. ? कारे **सज्जनासिंगा**, इतकी ती बदचालीची असूनही याला कांहींच समजलें नाहीं काय ? अशा दुष्ट स्त्रीबरोबर प्रीति करण्याचें कारण काय ? जिचें पूर्ण मन आपणाकडे नाहीं, तिला आपलें तरी मन कशाला द्यावें ? अशी प्रीति काय उपयोगी ! " हाम चाहत है तुमको तुम चाहत कछुआवर । ए प्रीत क्या कामकी एकचित्त दो ठोर. " आपल्याला पूर्ण जो चाहिल त्यालाच आपण चहावें. नाहींतर काय उपयोग ! **सुंदरलाल** इतका सुस्वरूप असून व तिच्या तो वचनांत पूर्ण वागत असून ती अशी दुष्ट रीतीनें वागत होती, तर मग ठार मारून कां नाहीं टाकली ! अशा स्त्रीचा मुजाका कां धरला ? **सज्जनासिंगा**, सांगरे बा असें कां झालें ? "

**सज्जनासिंग** ह्मणाला—" या वेळपर्यंत **सुंदरलालास** त्याचे स्त्रीचें कृत्य कोठें समजलें आहे ? अजून तो तिच्याकरतां रडतोच आहे. पिंजऱ्यांत कसा सांपडलों वगैरे वर्तमान त्याला माहीत नाहीं व तिच्यावरील त्याची प्रीति अजून कमी न होतां तो उटला जास्त विरहांत आहे. कारण, त्याला त्यापैकीं कांहींच माहिती नाहीं. तो सर्व प्रकार मला मात्र इत्थंभूत माहीत आहे, आणि ज्या वेळेस त्याला समजेल त्या घटकेस तो तिचा जीव घेईल, व पुनश्च स्त्रियांचें तोंड पाहणार नाहीं. " **सज्जनासिंगाचें** बोलणें ऐकून **चंपावती** म्हणाली, " त्या **चंद्रावतीचें** दुष्ट कृत्य एकदां आरंभापासून मला सांग. तिनें कोणत्या कारणास्तव नवऱ्यास पिंजऱ्यांत अडकविलें वगैरे सर्व मेहरबानी करून सांग; म्हणजे मला कांहीं

पुढें सांगणें आहे तें सांगेन. नंतर **सज्जनसिंग** म्हणाला, " **सुंदरलाला**-ची आणि **चंद्रावती**ची अशी बहार असतां त्या गांवांत कोणी **शेखमोहिदीन** नांवाचा दुष्ट मुसलमान रहात होता. ' तो अगदीं गरीब होता, तरी मोठा जारकर्मी, दांडगा व गलेलठ्ठ असा बनलेला होता. त्यानें एकदां कोठें **जोधपूर**च्या राजाच्या लेकीची तसबीर पाहिली, तेव्हांपासून तिच्या स्वरूपास पूर्ण लंपट होऊन ती आपल्याला बायको मिळावी या खटपटीला तो लागला असे. पुढें असें समजलें कीं, ' हिचा एक पण आहे कीं, जो माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देईल, त्याला नवरा करीन. ' मग तो कोणत्याही जातीचा कां असेना. **शेखमोहिदीनास** असें समजल्यावर तो कंबर बांधून **जोधपुरास** चालता झाला. तेथें गेल्यावर पाहिलें तों त्यानें ऐकल्याप्रमाणेंच सर्व गोष्ट आहे. त्या प्रश्नांमुळें हजारों राजपुत्र हतवीर्य होऊन बंदींत पडले आहेत वगैरे सर्व प्रकार त्यानें पाहिला. **शृंगारवल्लरी** बायको मिळण्याचें काम फार अवघड आहे असें पाहून **शेखमोहिदीन** विचारांत पडला, व त्याला कांहींच सुचेना. शेवटीं तो हलकट जातीच्या चालीप्रमाणें देवधर्म व देवऋष्यादि खटपटी करूं लागला. ज्या ज्या ठिकाणीं कांहीं देवदेवरसपणाचें स्थान असेल, त्या त्या ठिकाणीं हा जाऊन **शृंगारवल्लरी**विषयीं खटपट करी. मग त्याला कोणी अंगारे देत व कोणी कांहीं यंत्रें करून देऊं लागले. कोणी म्हणत आमच्या देवाची जत्रा कर, म्हणजे **शृंगारवल्लरी** तुला आपोआप वश होईल. याप्रमाणें बरेच लोक अंगांत वगैरे लटकेंच आणवून **शेखमोहिदीना**जवळून मिळतील तितके पैसे उपटीत. याप्रमाणें तो वर्ष सहा महिने खटपटींत असतां एके दिवशीं सअसा चमत्कार झाला कीं, त्याच गांवांत कोणी **पिऱ्या** मांग म्हणून काळकाई देवीचा भक्त देवऋषी असे. तो महान् दुष्ट व जादूटोण्याचा आणि किमयेचा मोठा नादी असे. त्याला एके दिवशीं असें स्वप्न पडल्यासारखें वाटलें कीं, " मला बत्तीसलक्षणी, आईबाप जिवंत असलेला व स्वतः तरुण असून त्याची पत्नीही तरुण व सुस्वरूप असावी, असा राजपुत्र जर बळी देशील तर मी तुला असा एक मंत्र सांगेन कीं, त्याच्यापासून नित्य सवा शेर सोनें पैदा व्हावें, असें आई काळकाई बोलली. " याप्रमाणें स्वप्न पहातांच **पिऱ्या** सावध होऊन बत्तीसलक्षणी राजपुत्र कसा मिळतो या विचारांत

बसला इतक्यांत मागें सांगितलेला गलेलठ्ठ **शेखमोहिदीन** तोही त्याच दिवशीं अंगाऱ्याकरितां त्याजकडे आला होता. त्याची आणि **पिऱ्याची** गांठ पडल्याबरोबर **पिऱ्या शेखमोहिदीनास** म्हणाला, " गड्या, उभयतांचीं कामें फार अवघड आहेत. तेव्हां परस्पर परस्परांस जर मदत करूं, तर उभयतांचेही हेतु साध्य होतील. " हें ऐकून मग **शेखमोहिदीन** म्हणाला, " गड्या, सांग. तुला मजकडून मदत कोणती व्हावी ? तूं सांगशील ती गोष्ट मी ऐकण्यास कधीं अनमान करणार नाहीं. तुजकरितां हें शिर हातावर घेतलें आहे. परंतु कसेंही करून प्रश्नांचीं उत्तरें मला मिळवून दे, अगर आपण होऊन ती **शृंगारवल्लरी** मजवर फिदा होईल असा कांहीं अंगारा तरी दे. " **पिऱ्या** म्हणाला, " वेड्या, तुझ्या कामाची मिसल मीं आज किती एक दिवस लावून ठेविली आहे; पण इतके दिवस उगीच तुझें मन पाहिलें. अरे, त्या प्रश्नांचीं उत्तरें मला आई काळकाईनें मागेंच स्वप्नांत सांगितलीं आहेत. पण त्याबद्दल ती एक बत्तीसलक्षणी राजपुत्राचा बळी मागते. तो जर तूं आणीत असशील, तर तुला प्रश्नांचीं उत्तरें मिळतील. **शृंगारवल्लरीची** गरज असेल, तर कर खटपट. **पिऱ्याचें** बोलणें ऐकून **शेखमोहिदीन** म्हणाला, " गड्या, फार अवघड गोष्ट सांगितलीस. बत्तीसलक्षणी राजपुत्र कोठून आणूं ? दुसरा एखादा मनुष्य सांगशील, तर आतां धरून आणतों. बरें, तितकेंही करून आणीन, परंतु तो आहे कोठें ? तूं सांगतोस ? " **पिऱ्या** म्हणाला, " हा मूर्खा ! अरे, तुझ्या गांवचा जो राजा आहे त्याचा पुत्र **सुंदरलाल** नाहीं का बत्तीसलक्षणी ? मी सांगतों इतकीं सर्व कलले त्याला लागूं आहेत. याकरितां तो जर धरून आणशील तर तुझे व माझे दोघांचेही हेतु पूर्ण होतील. तर जा लवकर आणि कर उद्योग. "

**पिऱ्या** मांगाचें बोलणें ऐकून **शेखमोहिदीन** म्हणाला—" वेड्या, तो राजपुत्र मी कसा धरून आणूं ? कांहीं थट्टा आहे कीं काय ? अरे बारा वर्षें खटपट केली तरी त्याचें नख तरी दृष्टीस पडेल काय ? मग धरून आणावयाचें नांव कशाला ? कां मजजवळ कांहीं सैन्य आहे किंवा कांहीं मंत्रतंत्र आहे ? सांग त्याला कसा धरून आणूं तो ? परंतु ही खटपट करण्यास मी आळस करणार नाहीं. " इतकें ऐकून घेऊन **पिऱ्या** म्हणाला—" हा मूर्खा ! फुकट **शृंगारवल्लरीची** इच्छा मात्र करतोस, परंतु

अक्कल कवडीचीही नाहीं. अरे, एवढ्याशा राजपुत्रास धरून आणण्याची तुला हिकमत सुचेना, मग **शृंगारवल्लरीचें** प्रश्नोत्तर कसें देशील ? थुः ! मूर्खा ! अरे, कसाही पंचहत्यारी शिपाई बाका अमला, तरी तो आपल्या आवडत्या स्त्रीजवळ केवळ गरीब मेंढी असतो; तेव्हां पुरुषांना स्वाधीन करण्याची मुख्य किल्ली स्त्रियांकडे असते. तिला युक्तीनें अनुकूळ करून घेतलें कीं, तो झाला स्वाधीन. त्यांत गरिबापेक्षां श्रीमंतांचे घरीं स्त्रियांचें प्राबल्य फार असतें, आणि त्या लाडक्या असतात; यामुळें हवी तशी त्यांना श्रीमंत पुरुषांकडून मोकळेपणानें वागण्याची परवानगी असते. मग काय ? त्या करतील त्या मुकत्यार. त्यांना बोलतो कोण ? अरे, त्या मुख्य नवऱ्यासच आपल्या कह्यांत आणून ठेवितात, मग पुढील प्रकार कशास विचारतोस ? हवा तसा अंधेर होतो. असो, तेव्हां सांगण्याचें तात्पर्य काय कीं, बहुधा पुरुष स्त्रियांचे मोहांत असतात. ज्यास आपलें नाजूक कार्य करून घेणें असेल, त्यानें प्रथम श्रीमंतांचे घरीं त्यांच्या बायकांकडून प्रयत्न करावा, ह्मणजे झालें कार्य. याकरता तूं आतां असें कर कीं, प्रथम आपल्या शहरीं जाऊन **सुंदरलालाची** जी बायको **चंद्रावती** म्हणून आहे, तिची भेट घेऊन व तिच्याशीं उत्तम स्नेह साधून सांगितलें तें कार्य कर. मीं सांगितलें या द्वारानें यत्न केला असतां तुझे व माझे हेतु पूर्ण होतील. "**सज्जनसिंग** ह्मणाला," **चंपावती**बाई, याप्रमाणें त्या **पिऱ्या** मांगानें **शेकमोहिदिनास** उपदेश करून परत आपल्या शहरास पाठविलें. तेथें आल्यावर त्यानें मोठ्या दीर्घयत्नानें **चंद्रावतीला** वश करून घेऊन **सुंदरलालास** पिंजऱ्यांत अडकवून हल्लीं त्या **पिऱ्या** मांगाकडेस घेऊन चालला आहे. मी **सुंदरलालाचा** लहानपणींचा स्नेही व अजूनही त्याचा माझा अगदीं जीवस्य-कंठस्य स्नेह आहे. याजकरितां **सुंदरलालाला** धरून आणल्यावर मागें शोधाअंतीं बारीक रीतीनें मला मात्र हा सर्व इत्थंभूत शोध लागला. मग मागोमाग मी माझ्या **सुंदरलालाचे** जिवाचे रक्षणाकरितां भिकारी वेषानें निघून **शेखमोहिदिनास** चवथ्या मुक्कामावर गांठलें. मी दीनवदनानें त्याचें आर्जव करून त्याचे मंडळींत पहारेकऱ्यांचे टोळींत चाकरीस राहिलों. सर्व निजले तरी मी कधीं निजत नाहीं, व सर्व मद्य पिऊन उन्मत्त झाले तरी मी मद्यास शिवत नाहीं. कारण, माझ्या **सुंदरलालाचे** रक्षणाकरितां. हा दुष्ट **शेखमोहिदीन** केव्हां

माझ्या **सुंदरलाला**चा प्राण घेईल याचा नियम लागत नाहीं; याकरितां मी रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून **सुंदरलाला**भोंवतीं पहारा करीत असतों. मी **सुंदरलाला**चा स्नेही आहें, हें कोणास माहीत नाहीं. **सुंदरलालाचे** कृपादृष्टीनें मी घरचा तीन लक्षांचा जहागीरदार आहें. परंतु हा मजकूर समजल्याबरोबर त्याच पायीं सडा निघून आलों आहें. आतां कदाचित् परत जाऊन राजास सांगून याच्या पारिपत्यास लष्कर घेऊन येईन. परंतु मी गेल्यावर हे कोणत्या ठिकाणीं **सुंदरलाला**चा घात करतील याचा नियम नाहीं. तेव्हां काय करूं, **सुंदरलालास** सोडून माझ्यानें माघारीं जाववत नाहीं. दोन तीन वेळ एकांतीं मींही त्यास परत जाण्याविषयीं विचारलें, परंतु मीं जाण्याचें नांव काढलें कीं तो अगदीं घाबरा होऊन रडूं लागतो. तेव्हां मी कसा जाऊं ? मी गेलों तर मागें कोण आहे ? त्या दुष्ट **चंद्रावतीनें** ही गोष्ट अगदीं कोणासही कळूं दिली नाहीं. एकाएकींच **सुंदरलाल** नाहीं असा जेव्हां बोभाटा झाला. तेव्हां कोणासमुद्धां तपास लागला नाहीं. परंतु मी बारीक रीतीनें शोध काढून युक्तीनें यांना येऊन मिळालों आहें. असो, आतां ईश्वर काय रक्षण करील तें खरें. सर्व भरंवसा त्याच्यावर आहे. तुम्ही जरा थोर कुलांतल्या दिसलां म्हणून हांक मारून तसदी दिली. त्याबद्दल मात्र माफी करा. जातों आतां मी. कारण. तो दुष्ट **शेखमोहिदीन** अगर कोणी अंमलदार वगैरे सावध झाले तर फुकट त्रास होईल. ईश्वरकृपेनें उगीच आज ते जरा बेशुद्ध आहेत, म्हणून इतकें बोलण्यास तरी वेळ सांपडला.

**सज्जनसिंगा**चा वृत्तांत ऐकून **चंपावती**च्या डोळ्यांवाटें पाण्याच्या धारा चालल्या, आणि कांहीं केल्यानें तिचें रडें आंवरेना. मग स्फुंदत स्फुंदतच ती **सज्जनसिंगा**स म्हणाली, " जन्मास येऊन सार्थक केलेंस. अरे, मुख्य भूतदया ठेवणें हाच सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म आणि दुसऱ्यास हर-एक प्रकारें पीडा देणें हेंच सर्व पापांतील पाप. शाबास ! स्नेह्याकरितां गरीब वेषानें हें दुःख तूं काढीत आहेस. अरे, प्रसंगीं उपयोगीं पडेल तोच मित्र, आणि स्नेहधर्म असा पुरुषजातच संपादन करूं जाणे. आम्हांसारख्या स्त्रियांच्या हातून ती गोष्ट होणें नाहीं. आह्मी जारकर्मादि दोषसमुद्रांत मात्र गटंगळ्या खाणार. परंतु स्तुत्य गोष्ट आह्मां स्त्रियांकडून होणार नाहीं. असो. आतां माझी हात जोडून इतकीच प्रार्थना आहे कीं, तूं जशी

**सुंदरलाला**ची पाठ धरून त्याचा जीव रक्षण करण्याची मनांत तजवीज योजिली आहेस, त्याप्रमाणें **सुंदरलाल** मला पति मिळतील अशी एखादी तजवीज सांग. **सज्जनसिंगा**, यापुढें मीं काय करावें ? हा सर्व प्रकार तुजवर सोपवितें. निदान रामकुंडावर जाण्यास तर निघालेंच आहें. "

**चंपावती**चें बोलणें ऐकल्यावर **सज्जनसिंग** म्हणाला, " बाईसाहेब. आतां मी सांगतों असें करा. कारण, पुढील सर्व गोष्टींचा ज्यापेक्षां सर्व प्रकार मजवर सोंपवितां व **सुंदरलाला**वर ज्यापेक्षां आपण इतक्या प्रेमार्द्र झालां आहां. त्यापेक्षां मी सांगतों असें करा. **सुंदरलाल** जगण्याविषयीं होईल तितका मी यत्न करणार आहें, बहुधा सहस्त्र वाटेनें त्याचा प्राण वांचवून पुनः त्याची तुमची याच ठिकाणीं भेट करवीन. तेव्हां, तोंपर्यंत आपण आत्महत्त्या करूं नये, अशी माझी इच्छा आहे. पुढें त्याची तुमची भेट झाल्यावर परस्पर लग्नविधि. जो आहे तो त्याचे तुमचे योग्य विचारानें करा. स्त्रियांचें दुष्टकर्म व त्याच्या बायकोनें केलेलें दुष्टकृत्य, त्याची तुमची भेट होईपर्यंत मी त्यास सांगत नाहीं. कारण, तसें केल्यावर तो पुनः कधींच स्त्रियांच्या मोहांत पडणार नाहीं, अशी माझी खातरी आहे. असो. आतां मी जातों. **सुंदरलालास** वांचवून खचीत त्याची व तुमची भेट करवीन. म्हणून तोंपर्यंत तुम्हीं स्वस्थ असावें. **सुंदरलालास** वांचविणें. त्याच्या स्त्रियेस त्याच्याकडून योग्य शासन देणें, व त्याची तुमची भेट करविणें या तीन गोष्टी अगदीं माझ्या कर्तव्यकर्माप्रमाणें मी समजतों, आणि परमेश्वरकृपेनें हा माझा हेतु खचीत सिद्धीस जाणार यांत संशय नाहीं. "

**किश्वरसिता** म्हणाला, " **मेहरबश** सरकार, याप्रमाणें **चंपावती**चें आणि **सज्जनसिंगा**चें बोलणें झाल्यावर **सज्जनसिंग** आला त्याच वाटेनें परत छावणींत गेला, आणि पहिल्याप्रमाणें खांद्यावर बंदूक घेऊन पहारा करूं लागला. पुढें थोड्याच वेळानें उजाडलें आणि ते सर्व लोक उठून तेथून पुढें मार्गस्थ झाले. त्या वेळीं **सुंदरलाला**चा लोखंडी मोठा पिंजरा बैलाच्या गाड्यावर चढविला होता, आणि सभोंवतीं नग्न तरवारी घेऊन स्वार चालले होते. पलीकडच्या बाजूनें तो दुष्ट **शेखमोहिदीन** शेंदोनशें लोकांसहित चालला होता. **सुंदरलाला**चे रक्षणार्थ सुमारें चारशें

साडेचारशें लोक होते. असो, याप्रमाणें ते दरकूच दरमजला घेऊन **जोधपूर** शहर जवळ करूं लागले.

एके दिवशीं **शेखमोहिदीना**ची स्वारी एका निबिड दाट झाडींत संध्याकाळीं मुक्कामास उतरली होती. तेथें उतरल्यावर **सुंदरलाला**चा पिंजरा एके बाजूस ठेवून चालीप्रमाणें तेथें बंदोबस्त केला होता. पुढें छावणींतील लोक कोणी स्वयंपाक करूं लागले, कोणी नदीवर गेले, कैक आपलीं हत्यारें साफ करीत बसले, कोणी आपल्या घोड्याच्या आकडींत व त्याच्या चाकरीच्या नादांत दंग आहेत, कित्येक हुक्का ओढीत मोठ्या डौलानें हाताखालच्या मंडळीसुद्धां बसले आहेत. याप्रमाणें **सुंदरलाला**बरोबर जे हजार पांचशें लोक रखवालीस होते ते अगदीं बेफाम व अस्ताव्यस्त उतरले होते. कित्येकांनीं तर तोळा तोळा अफिणीचा स्वीकार केला होता. अशा वेळीं एकदम चहूंकडून जो वायु सुटला तो अगदीं सांगतां सोय नाहीं. प्रलय—काळच होतो कीं काय असें वाटूं लागलें. वायु—जोरामुळें चहूंकडून वायधूळ उडूं लागली. ती इतकी जोरानें चहूंकडे भरली कीं, कैकांचीं धोंत्रेंपात्रें त्याबरोबर उडून जाऊन डोळ्यांत, नाकांत, तोंडांत, कानांत चहूंकडे अगदीं धूळ भरून लोक फार घाबरे झाले. सर्वांनीं आपापले हात डोळ्यांस लाविले होते, तरी कानांत व नाकांत पराकाष्ठेची माती गेली. जमिनीपासून तों वर आकाकाशापर्यंत चहूंकडे धुळीवांचून कांहीं दिसेना, आणि वाऱ्यानें तर कानठाळ्या बसून गेल्या. चहूंकडे मेघगर्जनेसारखा ध्वनि होऊं लागला. खरोखरी त्या वेळीं मेघराजही आपल्या लष्करासहित त्याच स्थळीं मुक्कामास येतात असें वाटूं लागलें. आधींच संध्याकाळामुळें चहूंकडे अंधार पडला होता. त्यांत धूळ, व तशांत वाऱ्याच्या जोरानें हजारों मोठमोठे वृक्ष मूळापासून उपटून पडूं लागले. मग काय? कल्पांतप्रलयच तो! कित्येक त्या योगानें अगदीं बेशुद्ध होऊन पडले. कित्येक वृक्षांच्या तडाख्यानें मोक्ष पावून अक्षय मोक्षास गेले. कित्येक अर्धमेले झाले. **मेहरबश** सरकार, याप्रमाणें होऊन दोन घटकांनीं लागलींच मेघराजाची स्वारी येऊन ठेपली. आरंभीं, ' गाड गाड गाड असा विद्युल्लतेचा अवाज भरून राहिला, नंतर जिकडे तिकडे एकदम हत्तीच्या शुंडेप्रमाणें धारा सुरू झाल्या. त्याही नुस्त्या नव्हेत. शुंडेसारख्या धारांत मोठमोठ्या गारा पडूं लागल्या. घटकेंत

पूर्व दिशेस, घटकेंत पश्चिम दिशेस व घटकेंत उत्तर दिशेस विद्युल्लतेनें आपलें खेळणें चालविलें. हाय हाय! ती पर्जन्यवृष्टि पाहून कोणाला बरें भीति वाटणार नाहीं? सर्व मनुष्यांची अगदीं त्रेधा त्रेधा झाली. आजच जलमय पृथ्वी होते कीं काय असें वाटूं लागलें. अरेरे!! काय तो प्रसंग सांगावा! ज्यावर प्रत्यक्ष प्रसंग गुजरतो त्यालाच तो अनुभव! अरण्यामध्यें अशा पर्जन्यवृष्टींत जर प्राणी सांपडले तर त्यांनीं काय उपाय योजावा, बिचाऱ्या त्या लष्करास आश्रय मिळेना. जिकडे तिकडे पाणी झालें. बिचाऱ्या स्वारांची तर फारच दुर्दशा झाली. घोडे मोकळे सुटून चहूंकडे चार गेले. त्यांच्या अंगावरील कपडा तर पैशाएवढा कोरडा राहिला नाहीं. तशांत त्यांना थंडीनें व्याकूळ केलें. म्हणून सर्वजण कुडकुड करूं लागले. अहो, निवाऱ्याची जागा नाहीं, अंगावर कोरडें वस्त्र नाहीं, याप्रमाणें दशा होऊन गेली. अशा धांदलींत कोण कोणीकडे आहे आणि कोण काय करतो आहे याचा पत्ता नाहीं. सर्व दाणादाण झाली. त्या लोकांना कधीं अजन्मांत असा प्रसंग आला नव्हता. असो, याप्रमाणें त्या रात्रीं रात्रभर मोठा कहर गुदरून गेला, इतक्यांत उजाडलें. मग थोडा थोडा पाऊस कमी होऊन चहूंकडे आकाश स्वच्छ झालें. तसाच, वारा अगदीं बंद झाला आणि सूर्य-प्रकाश पडल्यामुळें स्वच्छ दिसूं लागलें. याप्रमाणें त्या वेळीं लष्करांतील निमे शिमे लोक तर ठार झाले. बाकी राहिलेल्या लोकांची बहुतकरून शक्ति गेली होती. त्यांना जागचेंही हालवेना अशी दशा झाली. अशा वेळीं बिचारा गरीब **सज्जनसिंग** एका वृक्षाखालीं थंडीनें आंखडून पडला होता व कांहीं वेळ कडक ऊन लागेपर्यंत त्याला शुद्धिही नव्हती. पुढें सुमारें प्रहर दीड प्रहर दिवस आल्यावर **सज्जनसिंगा**नें डोळे उघडले, आणि बारकाईनें चहूंकडे न्याहाळूं लागला तों **सुंदरलाला**चा पिंजरा कोठेंच नाहीं मग काय, त्याची जी मित्राकरतां स्थिति झाली ती वर्णन करवत नाहीं. इतक्या सर्व लोकांत माझा **सुंदरलाल** दृष्टीं पडत नाहीं, हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. आतां काय करूं? **सुंदरलाला**चा पिंजरा कसा नाहींसा झाला? बाकी सर्व येथेंच कण्हत पडले आहेत; परंतु **सुंदरलाल** पिंजऱ्यासुद्धां कसा नाहींसा झाला? असें म्हणून तो तसाच उठला, आणि अवसान नव्हतें तरी तसाच तो आसपास शोध करूं लागला. पुढें बारीक तपास करतां असें दिसून आलें

कीं, तो दुष्ट **शेखमोहिदीन** व **सुंदरलालाचा** पिंजरा असे दोन्हेही नाहींत. **शेखमोहिदीनानें सुंदरलालास** खास मारण्याकरितां म्हणजे बळी देण्याकरितां नेलें यांत संशय नाहीं, अशी त्याच्या मनाची खात्री झाली, व तो धायधाय रडूं लागला. **सज्जनसिंग** मनांत म्हणूं लागला कीं, हर हर ! माझे श्रम व्यर्थ गेले ! आतां काय करूं ? बिचाऱ्याचीं वृद्ध मातापितरें तर अगदीं मरणोन्मुख झालीं असतील. आपण जी प्रतिज्ञा केली कीं, " आपल्या **सुंदरलालास** सोडवून त्याच्या त्या **चंद्रावती** बायकोस ठार मारून टाकूं. " तें सर्व व्यर्थ गेलें. अरेरे ! **सुंदरलालासारखा** स्नेही आतां मला पुनः मिळणार नाहीं. मी इतका लांब येऊन आतां **सुंदरलालाशिवाय** रिकाम्या हातें परत जाऊं काय ? बिचाऱ्यावर **कांचनवर** राजानें जर विचारलें, कीं बा **सज्जनसिंगा**, इतके दिवस कोठें गेला होतास ? माझ्या बाळाच्या शोधासाठीं काय ? तर मग या तोंडानें त्यांना मीं उत्तर काय द्यावें ? " अरेरे ! बा **सुंदरलाला**, शेवटीं अंतरलासना ? मी इतका जपत असून शेवट प्रसंगांत एकटाच सांपडलासना ? हाय हाय ! आतां काय करूं ? तुला कोणीकडे नेलें आहे हें मला माहीत नाहींरे ! नाहींतर आतां धांवत आलों असतों. त्या पर्जन्यांतून तरी कशाला जगलों ! मेलों असतों तर उत्तम झालें असतें. आतां जगून काय तुझा विरह सोसूं मी ? " असें ह्मणत चोहोंकडे **सज्जनसिंग** त्या सर्व रानांत शोध करीत धांवूं लागला. त्यानें **सुंदरलालास** मोठ्यानें आरोळ्या माराव्यात, परंतु उपयोग काय ? तेथें याला ' ओ ' कोण देतें ? असो. याप्रमाणें **सज्जनसिंग** शोध करतां करतां दमला. शेवटीं त्यानें असा निश्चय केला कीं, आतां **सुंदरलाला**-ची आपली खास भेट होत नाहीं. मग व्यर्थ जगावें तरी कशाला ? आपणही प्राण द्यावा हें उत्तम, असा विचार करून **सज्जनसिंगानें** आपल्या जवळील तरवार बाहेर काढली, व एके बाजूस जाऊन ती आपल्या मानेवर ठेविली.

आपल्या हातानें आपली मान खालीं वांकवून **सज्जनसिंग** फटका मारून घेणार, इतक्यांत त्याला एका गोष्टीचें स्मरण झालें कीं, मी तर दुनियेंतून माझ्या **सुंदरलालाकरतां** जातों आहें, पण तिकडे **चंपावतीस** आपण काय वचन दिलें आहे ? ती आपली वाट पहात दिवस काढीत असेलना ? मीं सहस्त्र वाटेनें **सुंदरलालाची** तुझी भेट करवीन असें अभय

दिलं आहेना ? आणि या माझ्या अभयावरून तिनें रामकुंडावरील विचार सोडून दिलाना ? ती माझ्या यशस्वी आगमनाची वाट चकोरपक्ष्याप्रमाणें पहात असेलना ? आणि मी हें काय करतों ? **सुंदरलाल** नाहींसा झाला, व त्यामुळें आपण प्राण दिला, हें वर्तमान तरी त्या माउलीला कोण सांगेल ? अरेरे ! एखाद्याला अभय देऊन अशी वाट पहात बसवूं नये; त्यापेक्षां असें करावें कीं, येथें जो जीव द्यायचा, तोच तेथें **रत्नपुरास** जाऊन द्यावा; ह्मणजे आलेलें वर्तमान **चंपावतीला** सांगून नंतर प्राण द्यावा हें बरें, आणि कदाचित् तीही मग मजबरोबर समदुःखी होईल यांत संशय नाहीं. तेव्हां सारांश इतकाच कीं, **रत्नपुरास** जाऊन **चंपावतीसह सुंदरलालाचे** अक्षय भेटीस जावें हें योग्य, आणि हल्लीं येथें मरून जावें हें अयोग्य. असा विचार करून त्यानें मानेवरील हत्यार काढिलें आणि पुनः **सुंदरलालाचा** शोध करूं लागला.

इतकी गोष्ट सांगून **किश्वरसिता** म्हणाला, कां **मेहरबश** सरकार पुरुषजात इमानी व कोमलांतःकरणी कशी असते याची खात्री झाली ना ? **सज्जनसिंगाच्या** आचरणावरून आपला संशय फिटला असेल. पहा, स्नेह्याकरितां तो किती दुःख सोशीत होता ? शेवट जीव देऊं लागला, परंतु **चंपावतीस** भरंवसा दिल्याचें स्मरण झाल्याबरोबर त्याच्या अंःकरणांत तेव्हां फेर पडला. तेव्हां या सर्व पुरुषांच्या आचरणावरून त्यांच्या एकंदरींत गुणाचा आपण विचार करा कीं, पुरुष इमानी किंवा बेइमानी ते. बरें, त्या **चंद्रावतीचेंही** कृत्य **सज्जनसिंगाच्या** मुखानें झालें तें आपण ऐकिलेंत. तेव्हां यावरून स्त्रियांच्या आचरणाविषयीं व दोषाविषयीं आपली खात्री आलीच असेल. त्याबद्दल पृथक् वेगळें बोलणें मला बोललें पाहिजे असें नाहीं. " तेव्हां या सर्व प्रकारांवरून आपण योग्य विचार करा, व घातक प्रतिज्ञा सोडून देऊन एकवार जो दुर्मिळ मनुष्यजन्म प्राप्त झाला आहे त्याचें सार्थक करा, इतकेंच माझें मागणें आहे. **किश्वरसिताची** ही गोष्ट व हीं हृदयभेदक भाषणें ऐकून **मेहरबशाच्या** मनास अतिशय द्रव फुटला, व तिची वृत्ति पालटली. परंतु गोष्टीचा चटका लागल्यामुळें ती ह्मणाली, **किश्वरसिता**—महाराज, आपण सांगितलेल्या प्रकारावरून आतां मात्र माझी खात्री झाली; व मागें केलेल्या कर्मांचा पश्चात्तापही झाला; परंतु याबद्दल योग्य विचार करणें

तो उदयिक करूं. प्रस्तुत जी तुम्ही गोष्ट सांगत आहां हीच पुरी करा पाहूं. मग पुढें काय झालें? **सज्जनसिंगा**ची आणि **सुंदरला**ची पुनः गांठच पडली नाहीं काय? व तो माघारा **चंपावती**कडे येऊन त्या दोघांनींही स्नेहाकरितां जीव दिला काय? सांगाहो सांगा. त्या **चंपावतीनें सुंदरलाल** व **सज्जनसिंग जोधपूरास** गेल्यावर मागें दिवस कसे काढले? तसेंच **जोधपुर**च्या राजाची कन्या कोणास प्राप्त झाली? त्या **दुष्ट शेखमोहिदिनास** मिळाली कीं काय कोण जाणे. तें सारें असो, पण अगोदर हें सांगा कीं, **सुंदरलालास शेखमोहिदिनानें पिऱ्या** मांगाच्या काळकाईस दिलें कीं काय? अरेरे! बिचाऱ्याची फार दशा झाली असेल. ज्या वेळीं **सज्जनसिंगानें** केलेला शोक आपण मुखानें सांगितलात, त्या वेळीं खरोखरीं मला रडें आलें आणि तें कांहीं केल्यानें आंवरेना. असो, एकंदरींत आपली वाणीच रसिक. ज्या वेळीं आपण गोष्ट सांगण्यांत हास्यरसाचा प्रकार आणतां, त्या वेळीं खरोखर मला पोट धरधरून हंसूं येतें. तसाच, जेव्हां शृंगारवर्णन करतां, तेव्हां तर जी माझी अवस्था होते ती बोलतां येत नाहीं. बरें, शोकरस सांगूं लालांत ह्मणजे मला रडें आंवरत नाहीं. तेव्हां एकंदरींत आपण चतुर आहांत यांत संशय नाहीं. असो. आतां अजून नेमाप्रमाणें रात्र बरीच आहे ह्मणून तेवढी गोष्ट पुरी होऊं द्या."

**मेहरबश**चा आग्रह पाहून **किउबरसिता** पुढें गोष्ट सांगूं लागला. तो म्हणाला:—

"सूर्योदय होऊन सूर्य बराच वर आला होता. चहूंकडे सर्व शहरांत लग्नास जाण्याची धांदल उडाली आहे. जो तो उंची पोषाक करून व शेले शालजोड्या पांघरून मोठ्या थाटानें लग्नमंडपांत जात येत आहे. राणा **सुंदरसिंग** ( **जोधपुर**चा राजा ) फार दिलगीर होऊन कचेरींत एका अंगास बसून मोठ्या दीर्घ विचारांत आहे. आजपर्यंत सहस्रावधि राजपुत्र हतवीर्य होऊन बंदींत पडले असून एक यःकश्चित् गलेलठ्ठ मुसलमान **पद्मावतीनें** घातलेल्या प्रश्नाचीं उत्तरें सांगणार, व तिला पणांत जिंकणार असा पुकारा झाल्यावरून आमंत्रण नसतांही शहरांतील बरेच लोक त्या ठिकाणीं जमले होते. फार कशाला, वृद्ध व रोगानें अगदीं जमिनीवर पडलेले एवढे मात्र काय ते शहरांत राहिले असतील; बाकी सर्व

रि , त्या समारंभास हजर झाले होते. लग्नमंडपाचे बाहेरले बाजूस दोन कोसपर्यंत सर्व लष्कर उभें राहिलें आहे. हत्तींशीं हत्ती आणि घोंड्यांशीं घोडे असे अतिशय दाटीनें, परंतु एकसारखे दोरीसूत शृंगार करून उभे राहिले होते. तशाच लग्नास आलेल्या थोर लोकांच्या बग्या, कोणाचे घोडे, कोणाचे म्याने, असे अलंकारांसहित उभे राहिले होते. चहूंकडेच एकच गर्दी झाली होती. लग्नमंडपाजवळ जाण्यास तर मुळींच रस्ता नाहीं. कित्येक गरीब लोक धक्काबुक्कीनें बेजार झाले, परंतु प्रश्नोत्तरें ऐकण्यास तसाच पुढें जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. चहूंकडे चवधडे झडत होते. आणि ताशे, करंढोल, सरकारी बाज्या, तुतारे, नौबदी, शिंगें, हलकाऱ्या, डंके इत्यादि वाद्यांनीं दिशा भरून गेल्या. लग्नमंडप तर केवळ इंद्रभुवनतुल्य केला होता. त्यांत मोत्यांच्या झालरी लाविल्या असून मध्यें सहस्त्रावधि कांचेच्या हंड्या, झाडें, आरसे वगैरे लाविले होते. तशीच खालीं मश्रूची बिछायत पाय ठेविल्याबरोबर तो गुडघ्याइतका आंत जावा अशी घातली होती. अशा लग्नमंडपांत एके बाजूस राजेरजवाडे व सरदार लोक अपल्या मानाप्रमाणें बसले होते, व दुसऱ्या बाजूस शेटसावकार, तशीच गांवांतील आमंत्रणाची मंडळी बसली होती. मंडपाचे वरल्या बाजूस मजले केले होते. त्यांत राजस्त्रिया व दुसऱ्या गांवांतील सभ्य स्त्रिया अशा बसल्या होत्या. एके बाजूस रत्नहारादि जडावाचे दागिने घालून **पद्मावती** **जोधपुराच्या** राजाची कन्या बसली होती. परंतु तिनें खालीं मान घातली असून ती अतिशय रडत होती. अहाहा ! **पद्मावतीचें** स्वरूप मी किती वर्णन करूं ? बरें, जशी ती रूपवती होती, तशीच गुणानें व चतुराईनें परिपूर्ण भरलेली होती. असो, तिनें जेव्हां आपला भ्रतार चिकाच्या पडद्यांतून अवलोकन केला, तेव्हां तिला एकदम रडें कोसळलें व ती आपणाशींच ह्मणूं लागली कीं, " ईश्वरा, आतां काय करूं ? अरे, आपल्याच हातानें मीं आपल्या पायावर दगड पाडून घेतला ! आतां हा दोष कोणावर देऊं ? आजपर्यंत सहस्त्रावधि उत्तम व तरुण असे राजपुत्र माझ्या इच्छेनें फार लांबून येथें आले; परंतु म्यां दुष्टेनें त्यांस शहाणपणाचा तोरा दाखविला म्हणजे शहाणपणाच्या अभिमानानें त्यांस प्रश्नाची अट घातली ? अरेरे ! इतकेंच करून कोठें स्वस्थ राहिलें ! तर ज्यांनीं प्रश्नोत्तरें सांगितलीं नाहींत, त्यांना अद्यापपर्यंत बंदींत ठेविलें आहे. हाय हाय ! त्यां-

च्याच शापानें त्यांचा आणि त्यांच्या आईबापांचा वियोग केला म्हणून त्यांच्या आईबापांच्या शापानें आज मला असा कुरूप नवरा मिळते आहे. ईश्वरा, इतके सुस्वरूप राजपुत्र सोडून प्रश्नोत्तरांची प्रेरणा या मेल्यासच कशी केलीस ? अरेरे ! हा दोष तुजकडे काय देऊं ? माझें कर्मच तसें ! म्यां दुष्टेनें लग्न करण्यास प्रश्नाची अट कशास लाविली ? तसें नसतें तर आज हा प्रसंग कशास आला असता ? आतां काय करूं ? माझ्या बुद्धीस कसा भ्रम झाला ? या मेल्याच्या तोंडाकडे पाहिलें कीं मला भय वाटतें, आणि याशीं आतां जन्मगांठ पडणार काय ? नको नको ! यापेक्षां मरण बरें. आई जगदंबे, याची वाचाच कां बंद करिनास ? तुला द्रव येऊन तूं तसें केलेंस तर मी लक्ष सुवासिनींस इच्छित वायनें देईन. नको नको ! मला हा नवरा नको ! अगे पद्मावती, तूं कशाला घाबरतेस ? त्या मेल्याचीं उत्तरें देण्याची कोठें वकूब दिसत आहे? इतक्या ह्या इंद्रतुल्य सभेंत या द्वाडाची काय पुण्याई आहे, कीं न घाबरतांना उत्तरें देईल ? माझीं उत्तरें देण्यास मोठा गंभीर, चतुर, आणि सभाधीट असा वक्ता पाहिजे. तेव्हां या मेल्याच्या तर तोंडावरील माशी उडत नाहीं, आणि हा उत्तरें काय देतो धूळ ! [ पुनः मनाशींच ] पण त्याचा काय नेम ? दिलींच तर मग माळ तर घातली पाहिजे. कारण तसें न करीन, तर मग प्रतिज्ञा ती काय ? आणि पृथ्वीवर केवढी अपकीर्ति होईल ? म्हणून माळ तर घातलीच पाहिजे. एवंच चोहोंकडून अडचणींत सांपडलें. आतां काय करूं ? आई जगदंबे, त्याच्या बुद्धीसच भ्रम कर म्हणजे झालें. " असो, **पद्मावती** असा विचार करते आहे इतक्यांत कचेरींत सर्व सिद्धता झाली, व त्या **शेखमोहिदिनास** मध्यस्थानीं बसविलें. नंतर सर्व लोकांची प्रश्नाकडे दृष्टि लागून राहिली आहे. **शेखमोहिदिना**च्या समोर चिकाचा पडदा बांधून त्याच्या आड **पद्मावतीस** बसविलें. तेव्हां सर्व लोकांस आश्चर्य व दुःख एकदम झालें. अशी सुंदर **पद्मावती** कुरूप्याच्या गळ्यांत पडत आहे, म्हणून सर्वांस दुःख वाटलें आणि असा हा यःकश्चित् मनुष्य प्रश्नोत्तरें सांगणार म्हणूनही आश्चर्य वाटलें. राणा **सुंदरसिंग** ( **पद्मावतीचा** बाप ) तर फारच दुःखी झाला होता. तो मनांत म्हणूं लागला कीं काय माझें प्रारब्ध ! मला मरणकालपर्यंत सुखच लागणें नाहीं काय ! पोटीं पुत्र नाहीं म्हणून **पद्मावतीच्या**

जिवावर खुशाल होतों, परंतु तिनेंही कळस केला. आजपर्यंत पुष्कळ सुस्वरूप व गुणी राजपुत्र आले, परंतु कन्येनें जो आपल्या मनाचा हट्ट घेतला होता तो शेवटास नेला. आपली जात कोण, धर्म कोण, कर्म कोण याचा विचार न करितां शेवट अंधास पद्मीण, मूर्खास शास्त्र, बधिरास गायन आणि षंढास तरुणी, असा प्रकार झाला. अरेरे ! पुष्कळ वेळ सांगितलें कीं तूं हा पण सोडून दे. आपणांस प्रश्नांशीं काय कर्तव्य आहे ? पण कानींनें ऐकिलें नाहीं, आणि आज हा प्रसंग आणला ! असो, ईश्वराची इच्छा. याप्रमाणें **शेकमोहिदीनास पद्मावती** मिळते म्हणून पुष्कळांस वाईट वाटलें. असो; मागें सांगितल्याप्रमाणें लग्नमंडपांत संपूर्ण तयारी झाल्यावर **पद्मावती**ला प्रश्न करण्याची वेळ आली. तिनें तें चुकविण्याकरितां पुष्कळ टाळाटाळ केली, परंतु उपयोग काय ? प्रश्न नाहीं केले, तर नाचक्की होते, असा विचार करून **पद्मावतीनें** मनाचा निश्चय केला कीं, जें होणें असेल तें होवो; परंतु आतां मागें घ्यावयाचें नाहीं. नंतर सर्व सभा अगदीं स्तब्ध झाली होती; व **शेकमोहिदीन** मनांत मांडे खात होता कीं काय माझें भाग्य ! आज सर्व राजेरजवाड्यांच्या मध्यस्थानीं मी बसलों आहें; सर्व लोक आदबीनें मला मुजरे करीत आहेत; आणि आतां घटकेनें **पद्मावती**सारखी सुंदर बायको मला मिळणार आहे. अहाहा ! आज लवकर दिवस मावळून रात्र होईल तर बरें. रात्र झाल्यावर मग काय माझी बहार ! मी **पद्मावती**च्या रंगमहालांत गेल्यावर प्रथम काय बोलूं ! माझा सुंदर देह एकांतांत पाहिल्यावर ती किती खुष होईल ! परंतु मी होऊन कधीं अगोदर भाषण करणार नाहीं. ती जेव्हां अगदीं पायां पडूं लागेल, चुकलें चुकलें म्हणेल, तेव्हां मग जवळ घेतली तर घेईन. एकूण आज रात्रीं बहार होणार खरी. आतां येथील आपलें कार्य झालें कीं अगोदर **पिऱ्यास** हत्तीच्या अंबारींत बसवून आणूं; नंतर काय तो विचार. कारण, **पिऱ्या** मांगामुळें आज हा दिवस आपल्या दृष्टीस पडला. नाहींतर जन्मांत तरी अशी गोष्ट झाली असती काय ? तें सारें असो. पण **पिऱ्याच्या** काळकाईची अगोदर जत्रा केली पाहिजे. कारण, तिच्याकडून आपणास प्रश्नोत्तरें मिळालीं. पण वास्तविक पाहिलें असतां आतां काय तिच्या बापाचें आपण लागतों ! बत्तीसलक्षणी राजपुत्र तर आणून दिला. आतां काय भय ? बहुधा त्या **पिऱ्यानें** त्याला काळकाईस दिलाही असे–

ल. तो आज सकाळींच त्याचा समाचार घेणार होता. असो, एवढें मात्र पक्कें ध्यनांत ठेवायचें कीं, मूळ माझ्या **चंद्रावती** दोस्तदारणीनें हें सर्व काम केलें. म्हणजे तिनें आपल्या नवऱ्यास जर स्वाधीन करून दिलें नसतें तर काळकाईनें तरी कशीं प्रश्नोत्तरें सांगितलीं असतीं ! तेव्हां सर्व उपकार काय तो **चंद्रावतीचा**. पहा, जिनें माझ्या प्रीतीकरतां आपल्या लग्नाच्या नवऱ्यासही जीवानिशीं दिला, तिचा उपकार किती स्मरूं ? सारांश, जरी ही **पद्मावती** तिजपेक्षां सहस्रपट सुंदर आहे, तरी **चंद्रावतीशीं** बैमानपणा करून तिला अंतर देणें नाहीं. असो, **शेकमोहिदीन** असा मनांत विचार करतो आहे, इतक्यांत **पद्मावतीनें** प्रश्न केले. ती ह्मणालीः–" अहो सभासदहो, मी यःकश्चित् स्त्री आहें, व माझी प्रतिज्ञा सर्वांस माहीत आहेच. आतां हे जवळ बसलेले गृहस्थ मजकरितां तसदी घेऊन येथपर्यंत आले आहेत, म्हणून मी त्यांची फार अभारी आहें. परंतु इतकेंच त्यांच्याकडून मागणें मागतें कीं, त्यांनीं मेहरबानी करून माझ्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावींत. माझ्या प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न हाच कीं " प्रीतीचें मोल काय ? " दुसरा " काळजीचें स्वरूप काय ? " तिसरा " मनाचा मालक कोण ? " चवथा " कुकर्माचें फळ काय ? " आणि पांचवा सर्वांत काय पाहिजे ? " असे हे पांच प्रश्न आहेत, तेव्हां मेहेरबानी करून माझी इच्छा धारण करणारांनीं या प्रश्नांचीं उत्तरें द्यावींत, आणि माझ्या स्त्रीजातीय अल्प समजुतीचें समाधान करावें. नंतर ही दासी अंकित होण्यास तयार आहे.

**पद्मावतीचे** प्रश्न ऐकून **शेकमोहिदीन** उत्तरें सांगण्याला पुढें सरसावला. त्यानें विचार केला कीं, आतां विलंब कां लावावा ? **पिऱ्या** मांगानें सांगितल्याप्रमाणें उत्तरें द्यावींत. म्हणजे प्रथम पहिल्या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं नाहीं कीं, प्रीति लय सवंग जेव्हां असती, तेव्हां घा शंभर दिल्या कीं लागल कितकी मिळती. परंतु महाग झाल्यावर मात्र इस शंभरा रुपये द्यावे लागत्यात. हेंच पहिल्या प्रश्नाचें उत्तर **पिऱ्यानें** सांगितलें कीं नाहीं ? हेंच. तर मग देतों आतां उत्तर असें म्हणून **शेकमोहिदीनानें** वर लिहिल्याप्रमाणें उत्तर दिलें, तेव्हां मग काय विचारावें, सर्व सभा एकदम पोट धरधरून हंसूं लागलीं, **पद्मावतीला** तर अगदीं बेसुमार राग येऊन गेला आणि ह्मणाली " मूर्खा, समजली तुझी अक्कल ! एका प्रश्नाच्या उत्तरावरून सर्व

खातरी झाली. व्यर्थ आव आणून माझ्या बाबांस व या सर्व मंडळीस येथ-पर्यंत येण्याची तसदी मात्र दिलीस! चला! कोण आहेरे तेथें? करा कैद याला." असें म्हटल्याबरोबर नग्न तरवारींच्या संत्र्यांचा त्याच्या भोंवती गराडा पडला. मग काय त्या वेळीं सर्व सभा अगदीं गप्प बसली होती. असो, इतकें झाल्यावर तेथें एका बाजूस एक गरीब भिकाऱ्याचा वेष धारण केलेला व शोकानें अगदीं क्षीण झालेला असा मनुष्य मोठ्यानें हांक मारून म्हणाला, "अहो, कृपाळू सभासदहो, क्षणभर स्थिर बसाल तर **पद्मावती**च्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर मी देतों. तें जर योग्य मिळालें असें सर्वांस वाटलें, तर पुढील चार प्रश्नांचीं उत्तरें मी आपल्या धन्याकडून देववीन. आतां आणखी एक अशी विनंति आहे कीं, पहिल्या प्रश्नाचें उत्तर सांगून मला ह्मणजे **पद्मावती**ची आशा आहे अशी गोष्ट नाहीं. कारण, **पद्मावतीस** वरण्यासारखा मी अधिकारी पुरुष नव्हें. **पद्मावती**च्या चतुरपणास व स्वरूपास माझा एक धनीच ब्रह्मदेवानें नेमिला असावा यांत संशय नाहीं. आतां धनी कोण व मी कोण हा सर्व प्रकार पहिल्या प्रश्नाचें उत्तर दिल्यावर मी सांगेन. तोंपर्यंत इतकी मात्र मेहेरबानी करा कीं, कैद केलेल्या मनुष्यास याहीपेक्षां जपवेल तितकें जपा." असें ह्मणून प्रश्नोत्तर देण्यास पुढें सरसावला, आणि मोठ्यानें सर्वांस ऐकूं येईल असें व नीट गळ्यावर त्यानें उत्तर दिलें.—
"लाख नही और करोड नही, नही प्रीतनका मोल, आख फिरे वहा घाय हुवे एही प्रीतनका मोल."

इतकी गोष्ट सांगून **किश्वरासिता मेहरबश**ला म्हणाला, "कां सरकार उत्तर दिलेला मनुष्य कोण हें तुम्हीं ओळखलेंच असेल. पहा, यावरून पुरुषजात स्नेह करण्यास किती योग्य असते ती! अहो, पुरुष जीवास जीव खचीतच देतील. इतकेंच काय? किती सद्गुणांची वस्ती पुरुषांकडे आहे याचें वर्णन करवत नाहीं. आणि स्त्रियांकडे दोष मात्र कंबरा बांधून उभे. त्या **चंद्रावती**ची हकीकत तुम्हीं ऐकलीच, व **सज्जनसिंगा**चा धन्याकरितां प्रयत्न, तसाच विश्वासूपणा, स्नेहाकडे माया, खरी प्रीति, चातुर्य इत्यादि प्रकार तुम्हीं ऐकिलेतच. तेव्हां यावरूनच विचार करून मला सांगा कीं, स्त्रिया कोणत्या उत्तम कारणानें तुम्ही योग्य ह्मणतां? अहो, फार कशास? **सज्जनसिंगा**चा प्रकार तुम्ही राहूं द्या एकीकडे;

परंतु तो **शेखमोहिदीनच** पहा, इतका दुष्ट व मगरूर होता, तरी सभेंत जेव्हां मध्यस्थानीं बसला होता, तेव्हां **चंद्रावती**विषयीं तो मनांत काय विचार करीत होता? व त्याच्या मनाचा ग्रह स्त्रियांविषयीं किती कोमल होता! सरकार, या सर्व कारणांवरून व या गोष्टीवरून आतां आपणच सांगा कीं, योग्य कोण? स्त्री किंवा पुरुष?"

**किश्वरसिताचें** भाषण ऐकून **मेहरवश** क्षणभर स्थिर झाली, व नंतर म्हणाली कीं, "महाराज, आपण ह्मणतां हींच गोष्ट खरी. परंतु गोष्ट पुरी ऐकल्यावांचून माझ्यानें निश्चय सांगवणार नाहीं. गोष्टींत मी फार गुंगलें आहें. याकरतां तेवढी पुरी सांगा. अहो, ही गोष्ट अर्धीच राहिली तर मला चैन पडणार नाहीं. सांगा हो सांगा. एकून आमच्या जातीपेक्षां हिंदूंतही फार मनोल्हादक गोष्टी घडतात. अहाहा! पहिल्यानें आपल्या जातीची गोष्ट सांगितलीत त्यापेक्षां ही फारच सुंदर आहे. वः! एकूण हिंदुस्थानांतही बरीच चतुर विद्वानांची वस्ती असेल असें या गोष्टीवरून दिसतें. असो, एकंदरींत या हिंदूच्या गोष्टीकडे माझें चित्त फार लागलें; याकरतां गोष्ट तेवढी पुरी सांगा. मोठी गंमतच वाटते. मीं ती ऐकण्याविषयीं उत्सुक आहें. ज्या मनुष्यानें पहिल्या प्रश्नाचें उत्तर दिलें तो **सज्जनसिंग** असावा असें मला वाटतें. पण कांहो? तो तर **सुंदरलाला**चा शोध करीत अरण्यांतून हिंडत होता; मग त्या सभेंत गेला कसा? हा माझा सर्व संशय तसाच राहिला; दुसरें मोठ्या पावसाच्या व वादळाच्या सपाट्यांतून **सुंदरलाल** व तो दुष्ट **शेखमोहिदीन** हे नाहींसे कसे झाले? बरें पुढें एकदम **शेखमोहिदिनास** तर तुम्हीं सभेंत नेऊन सोडिलेंत, परंतु **सुंदरलाला**ची दशा काय झाली ती बिलकुल सांगितली नाहींत हें काय? **शेखमोहिदिनानें**च त्यास ठार मारलें, किंवा **पिऱ्या** मांगाजवळ त्याला दिलें हें कळलें नाहीं. तसाच, तिकडील **चंपावती**चा समाचार पुनः सांगितला नाहींत. तें सर्व असो, परंतु **सुंदरलाला**च्या वृद्ध **आईबापां**कडील हकीकत पुनः तुम्हीं कांहींच सांगितली नाहींत, तेव्हां हें काय असें? संपूर्ण गोष्ट सांगून माझा संशय दूर करा; ह्मणजे मग मी खचीत ही दुष्ट प्रतिज्ञा सोडून देऊन सुंदर पुरुषाशीं लग्न करीन."

**मेहरवशचें** भाषण ऐकून **किश्वरसिता** म्हणाला "सरकार, या

हिंदूच्या गोष्टींत मजा जी कांहीं आहे ती सर्व अजून पुढेंच आहे. परंतु उगीच तुह्मांस मध्येंच प्रश्न केला. असो, आतां तुमचा सर्व संशय मी खंडण करतों." असें ह्मणून पुढें गोष्ट सांगूं लागला; परंतु तितक्यांत दिल्लीदरवाज्यावरील दोनप्रहर रात्रीचा मोठा प्रचंड डंका ऐकूं आला; तेव्हां गोष्ट तहकूब राहून तीं दोघेंही आपापल्या महालांत निद्रिस्थ झालीं.



